एका शुष्क होऊं लागलेल्या तळ्यांत दोन कमळिनी
उमलल्या. त्या सुंदर होत्या, सुगंधानें
परिपूरित होत्या.

पण—

जाऊं द्या ! ती सगळीच कहाणी हृदयद्रावक आहे.
माझी गुरु, अभिन्नहृदय मार्गदर्शक थोरली बहीण

*कै. सौ. माई सुपेकर*

आणि माझी लाडकी धाकटी बहीण :

*सौ. कमल पाटील*

या दोघींना त्यांच्या दरिद्री भावाकडून
हें समर्पण !

*गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर*

# निवेदन

गतवर्षी मी बंगालमध्यें जाऊन आलों. सर्वश्री शरद्‌बाबूंचा बंगाल, म्हणून मला बंगालविषयीं विशेष कुतूहल होतें. तेथील माझ्या वास्तव्यांत मला बंगाली समाजांतली अनेक चित्रें अभ्यासायला मिळालीं. विशेषतः तेथील स्त्री-जीवनानें माझ्या मनावर एक खोल ठसा उमटविला. शरद्‌बाबूंनीं रंगविलेलें स्त्री-जीवन माझ्यासमोर होतेंच. अनेक आपत्तींशीं झगडूनही तेथील स्त्रियांनीं भारतीय संस्कृतीचा जो वारसा सांभाळून ठेवला आहे, त्याच्या प्रभावानें माझा एकंदर भारतीय स्त्री-जीवनाविषयींचा आदर दुणावला.

पण त्याबरोबरच तेथील सामाजिक जीवनानें स्त्रियांच्या भोंवतीं जीं नाना प्रकारचीं बंधनें निर्माण केलीं आहेत, त्या बंधनांचा विचार करतां मात्र माझें मन कासावीस झालें. तसें पाहूं गेलें, तर आजचें सबंध भारतांतीलच स्त्री-जीवन कांहीं फारसें सुखाचें नाहीं. पूर्वीचें आदर्श स्त्री-जीवन वारंवार आळवून गौरविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आज जरी कांहीं सुशिक्षित स्त्रिया परिस्थितीशीं झगडत झगडत त्या आवेशाच्या भरांत मर्यादेच्या पलीकडेही एखादें पाऊल टाकीत असल्या, तरी त्या मूठभर स्त्रिया, त्यांच्या सभा, समित्या, मंडळें, हें कांहीं भारतीय स्त्री-जीवनाचें प्रातिनिधिक स्वरूप नव्हे.

सर्वश्री मैथिलीशरणांनीं एका वाक्यांतच भारतीय स्त्री-जीवनाची सगळी वेदना प्रगटविली आहे–

*अबला–जीवन हाय ! तेरी यही कहानी–*
*आँचलमें है दूध और आँखोंमें पानी !*

या वेदनेचा प्रकर्ष मला बंगालमध्यें पहायला मिळाला. तेथील दुर्दैवी स्त्रियांच्या पुढें या बंधनांतून मुक्त होण्याचा एकच मार्ग समाजानें मोकळा ठेवला आहे. तो म्हणजे समाजांतून बाहेर पडणें !

या दीर्घ कथेंत मला कदाचित् बंगाली वातावरण चित्रित करतां आलें नसेल. पण ही कथा वाचून सहृदय वाचकांच्या मनांत स्त्री-जीवनाविषयीं यत्किंचित्‌ही सानुकंप न्यायबुद्धि निर्माण झाली, तर माझे प्रयत्न सफल झाले, असें मी समजेन. तसेंच या कथेंत लालित्य, अर्थसौन्दर्य, चटकदारपणा इत्यादि गुण आहेत, अशी प्रतिज्ञाही मी मुळींच करीत नाहीं. मात्र ही कथा लिहीत असतां अनेक वेळां माझे दुर्बळ नेत्र भरून आले आहेत. शरद्‌बाबूंच्या ' विराज बौ ' च्या शेवटाशीं या कादंबरीच्या शेवटाचें थोडेंसें साम्य आहे. पण तें अभावितपणें निर्माण झालेलें आहे.

मला वाटतें, इतकें पुरें.

*गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर*

●

## पुढील प्रकाशनें

१ **हिंदोळ्यावर**

—विभावरी शिरूरकर

२ **१८ ते ३८**

—द. श्री. मराठे

३ **संस्कार**

—वामन चोरघडे

●

# १

‘ टण् टण् टण् टण् टण् ’

घंटीचा आवाज झाला. मजूर खाणीच्या आवारांतून बाहेर पडूं लागले. माणसांनीं भरलेलें तें आवार मोकळें झालेलें पाहून बनबिहारी बाबूंनींही विचार केला, कीं आतां आपल्या टेबलावरील हे कागद, हीं रजिस्टरें, या फाइली, यांची उद्यांपर्यंत रजा घेण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. त्यांनीं भराभर त्या सर्वांच्या तीन राशी रचल्या, आणि त्यांवर शुद्ध स्वदेशी पेपर-वेट म्हणजे तीन दगड ठेवून देऊन आळस देत ते उठले.

त्यांनीं टेबलाखालीं काढून ठेवलेल्या आपल्या सपाता पायांत अडकविल्या. खरें बोलायचें तर त्यांनीं आपले पाय त्यांच्यांत अडकविले. त्या सपाता जुन्या होऊन एक वर्षाहून अधिक काळ लोटला होता. पण खोलू मोचीच्या हातें तीन चार वेळां त्यांना जीवदान मिळालें असल्यामुळें पायांत अडक-विण्याचें एक साधन, या दृष्टीनें अजून कांहीं दिवस त्यांचा उपयोग होणार होता.

मधुबाबूंच्या, म्हणजे खाणीच्या मॅनेजरांच्या ऑफिसवरून पुढें जातांना बनबिहारींनीं आपल्या पायांना थोडी अधिक गति दिली. कारण मधुबाबूंची हांक ऐकूं आल्यावर ती टाळून जाणें शक्यच नव्हतें. खाणीचे नोकर, हे चोवीस तास ‘ नौकर ’ आहेत, ही गोष्ट मधुबाबू वारंवार नोकरांच्या मनावर ठसवून देण्याचा प्रयत्न करीत असत. त्यामुळें कोणत्याही क्षणीं त्यांच्या हांकेला ओ देणें, हें त्या खाणींतील नोकरांचें एक पवित्रतम कर्तव्य मानलें जात असे. आतां स्वतः मधुबाबू हा नियम आपणास लागू करत नसत, ही गोष्ट वेगळी.

मोट्या फाटकांतून बाहेर पडल्यावर बनबिहारीबाबू घाईघाईनें घराकडे चालूं लागले. घरीं तसें कांहीं मोठें आकर्षण होतें, अशांतला भाग मुळींच नव्हे. त्यांचें लग्न होऊन आतां चोवीस वर्षे होऊन गेलीं होतीं. सर्वेश्वराच्या कृपेनें बंगाली कारकुनांना म्हणजे मध्यम वर्गाला जो पुष्कळ मुली होण्याचा वर मिळाला आहे, त्या वराच्या यादींत बनबिहारींचेंही नांव बऱ्याच वर नोंदलें गेलें होतें. त्यांना एकीपाठोपाठ एक, अशा सात कन्यारत्नांचा लाभ झाला. आणि त्यानंतर आठव्या पाळीला त्यांची पत्नी हरिमती एक पुत्ररत्न प्रसवती झाली. अशा अष्टविध संततीपैकीं दोन मुलींनीं परलोकीं गमन केलें असल्यामुळें तूर्त त्यांच्या कुटुंबांत पांच मुली, एक मुलगा व स्वत: पति-पत्नी अशीं आठ माणसें होतीं. बनबिहारींना खाणींत कारकुनाचें काम केल्याबद्दल जें विपुल वेतन मिळत असे, त्याचा तपशील असा : चाळीस रुपये मूळ पगार; सात रुपये नऊ आणे पांच पै, इतका महागाई भत्ता. एवढ्या या विपुल वेतनांत बनबिहारींचें कुटुंब या महागाईच्या दिवसांत कसें मजेंत कालक्रमणा करीत असेल, याची कोणालाही सहज कल्पना करतां येईल !

तरी पण आज बनबिहारीबाबू घाईघाईनें घरीं निघाले होते, याचें कारण, त्यांचा धाकटा मुलगा बिपिन, हा बंगालवर अविरत राज्य करणाऱ्या राजाधिराज मलेरियाच्या कृपेनें सात दिवसांपासून अंथरुणाशीं कुस्ती खेळत होता.

घरीं आल्याबरोबर त्यांनीं सपाता काढून ठेवल्या आणि बिपिनच्या अंथरुणाजवळ जाऊन त्याच्या डोक्यावर हात ठेवला. घरांत चहूंकडे ओल होती. त्या ओलीपासून आजारी माणसाचें रक्षण करण्याकरितां खालीं दोन फाटक्या चटया एकमेकींचीं भोंकें चुकवून टाकल्या असून त्यांवर रोग्याचें अंथरुण टाकलें होतें. एक मळकी उशी, आणि जी अंगावर पांघरली असतां तिला पडलेल्या गवाक्षांतून हातपाय खुशाल बाहेर काढतां येतील, अशी एक चादर, एवंविध उपकरणांनीं रोग्याचा बिछाना सुशोभित केला होता.

त्या बिछान्यावर पडल्या पडल्या बिपिन बनबिहारी सरकार, वय वर्षें सात, हे एका फाटक्या पत्त्यांच्या डावांतील अंतर्धान पावलेली बदामची राणी त्या पत्त्यांच्या पसाऱ्यांतून हुडकून काढण्याचा प्रयत्न करीत पालथे पडलेले होते.

'बेटा, आतां बरें वाटतें का ?' बनबिहारी बाबूंनीं बिपिनचा कृश हात आपल्या हातांत घेऊन त्याची नाडी पहात प्रश्न केला. त्यांना नाडींतलें कांहीं कळत होतें, असें मुळींच नव्हे. पण एकुलत्या एका मुलाला औषधोपचार करायची असमर्थता लपविण्याकरितां ते उगीचच आपल्याला त्याच्या प्रकृतिमानांत बरेंच गम्य असल्याचा आव आणीत त्याची नाडी पहात असत.

'बाबूजी,' त्यांच्या प्रश्नाचें उत्तर न देतां क्षीण आवाजांत बिपिननें आपली तक्रार पुढें मांडली, 'आमची बदामची राणी, कुठें सांपडत नाहीं ! हेमूनें हरवली वाटतें कुठें तरी ! बदामची राणी बाबूजी ! ! '

'हेमूनें हरवली ? ती गाढव आहेच तशी द्वाड ! हेमू ! हेमलता ! कार्टी कुठें धडपडते आहे कोण जाणे ! असूं दे, आपण दुसरी आणूं हां ! ' बनबिहारींनीं बिपिनची समजूत काढली.

तोंच या खटल्यांतील आरोपी, बनबिहारींची पांचव्या अनुक्रमाची कन्या हेमलता न्यायाधीशासमोर हजर झाली. ती जेव्हां पश्चिमेकडे पहात असे तेव्हां तिला उत्तरेचें दर्शन घडत असे म्हणजे तिची दृष्टि तिरळी होती. काळसर रंगाची ती नऊ वर्षांची काटकुळी पोर रंगभूमीवर अवतीर्ण झाली, तीच मुळीं एक तक्रार घेऊन.

तिची साडी फाटून पार चिंध्या होण्याच्या मार्गास लागली होती. बनबिहारीबाबूंनीं जवळ जवळ दीड महिन्यापासून तिच्याकरितां नवी साडी आणायचा वायदा केला होता. ज्या दिवशीं त्यांनीं हा वायदा केला, त्या दिवशीं त्या फाटक्या साडीबद्दल चिडविणाऱ्या तिच्या मैत्रिणीस हेमू गर्वानें फुगून जाऊन म्हणाली होती, 'उल्के, एवढी कांहीं मिजास नकोस सांगूं ! माझे बाबूजीही मला नवी साडी आणून देणार आहेत ! '

पण आतां या वायद्याची पूर्ति केव्हां होणार ? दीड महिना व्हायला आला. ती पोर वारंवार आपल्या त्या फाटक्या साडीनें शरीर झांकायचा प्रयत्न करीत तिचे बाबूजी तिच्याकरितां आणणार असलेल्या साडीचें गुणवर्णन करीत असे. आज मात्र तिच्या शेजारीं राहणाऱ्या बसूंच्या उल्केनें तिच्याशीं मस्ती करीत, तिला चकणी म्हणून चिडवीत तिच्या फाटक्या साडींत हात घालून ती येथपासून तेथपर्यंत टरकावून टाकली होती. हेमा सगळ्या पोरींवर जळफळत, रडत, शिव्या देत आणि आतांपर्यंत आपणास

साडी न आणणाऱ्या आपल्या बापावर रागावत घरांत आली होती. बनबिहारी आल्याचें कळतांच ती तावातावानें त्यांच्याकडे आली.

आल्याबरोबर बापाच्या गळ्यांत पडून डोळ्यांतलीं आंसवें पुशीत ती म्हणाली, 'बाबूजी, मी आज तुमच्याशीं बोलणार नाहीं, जेवणार नाहीं, झोंपणार नाहीं, खेळणार नाहीं--'

'पण तूं अगोदर सांग, आमच्या बिपिनबाबूंची बदामची-बदामचीच ना रे ? तर ती बदामची राणी कां हरवून टाकलीस ?'

'हरवीन. बदामचीच कां ? चौकटची हरवीन, इस्पीकची हरवीन, किलवरची –'

'पण गाढवी, कां तें सांगशील कीं नाहीं ? '

'मग तुम्ही आम्हांला साडी कां आणली नाहीं ? '

साडीचें नांव ऐकतांच बनबिहारींचा आवेश थंड पडला. ते मनांत विचार करूं लागले, 'खरेंच पोरीला साडी आणायला पाहिजे होती. पण कुठून आणायची ? या पोराच्या औषधालाच तर पैसे नाहींत. पगार आल्याबरोबर चार दिवसांत संपून जातो. तसें पाहिलें तर विपिनचेही सदरे आतां जुने झाले. मलाही धोतरजोडी घ्यायला पाहिजे. पण कुठून आणूं ? मधुबाबू मर्सराइज्ड् धोतरें नेसतात ! देव त्यांना देतो. मला कां नाहीं देत ? मला काय पोरें नाहींत ? त्यांना काय कपडे लागत नाहींत ? आमच्या मालकांनाही तर पोरें आहेत ! जाऊं द्या. आपापल्या दैवानें घ्यावें.'

तोंच हेमूनें परत तक्रार पुढें चालू केली, 'अन् आज बाबूजी, उल्कीनें मेलीनें माझी साडी पार फाडून टाकली ! आतां मी ही कशी नेसूं ? पहा बरें ! '

हेमूनें आपली ती विदीर्ण साडी बनबिहारींना दाखविली. आतां ती साडी केवळ पोतेरें घालायच्या किंवा बूट पुसायच्या योग्यतेची राहिली आहे, याविषयीं बनबिहारींसही कांहीं शंका उरली नाहीं. त्यांनीं हेमूला जवळ घेतलें आणि म्हणाले, 'असूं दे पोरी. आतां मात्र साडी आणायचीच हां ! उद्यांच आणूं या. तूं चलशील का माझ्याबरोबर दुकानांत ? '

'हो ! येईन हां बाबूजी ! पण हीच साडी नेसून येऊं दुकानांत ? '

तिला कांहीं तरी उत्तर देणार, तोंच बनबिहारींपुढें आणखी एक तंटा

तोडण्याचा प्रसंग निर्माण झाला. बनविहारींची पत्नी हरिमती आपल्या तृतीय कन्यकेला, मृणालिनीला केरसुणीनें बडवीत आंत येऊन पोंचली.

वय अंदाजें अडतीस, किडकिडीत बांधा, गौरवर्ण, समोरचे दांत पुढें आलेले, लांब सडक नाक, नेहमीं मलेरियाच्या कृपेमुळें आजारीपण सुरू, त्यामुळें गौरवर्णावर पिवळ्या रंगानें आपला शिक्का उमटविलेला, अशी हरिमती आणि वय तेरा वर्षें, शरीराचा बांधा वगैरे सर्व आईसारखेंच, अशी मृणालिनी, हीं सुरू झालेल्या प्रवेशांतील पात्रें.

आंत आल्यावरही केरसुणीचे रट्टे सुरू ठेवीत हरिमती म्हणाली, 'थांब ! आज तुझी पाठ फोडूनच काढतें ! तुझी धडगत नाहीं आतां ! कारटे ! सांग ! कां गेली होतीस बसूंकडे ? तीं पोरटीं रसगुल्ले खात होतीं बोटें चाटीत, तर कां त्यांच्या तोंडाकडे टुकत बघत बसलीस ? कां बसलीस सांग.'

तडाखे चुकवीत आणि रडत मृणालिनीनें आपली कैफियत मांडली, 'मी गेलें होतें का आपण होऊन ? उल्कीनेंच तर बोलविलें होतें मला !'

'नाहीं, पण तूं कां गेलीस या वेळीं ? हजारदां सांगितलें तुम्हांला, लोकांकडे खायच्या वेळेस जाऊं नये म्हणून. साग कां गेलीस ?'

असें म्हणत हरिमतीनें मार चुकवीत असलेल्या मृणालिनीच्या पाठीवर केरसुणीच्या बुडख्याचे दोन तडाखे आणखी मारले. ते रट्टे बरगडयांवर लागले. कळवळून मृणालिनी खालीं पडली, आणि ओक्साबोक्शीं रडूं लागली. आतां मात्र बनविहारींच्यानें केवळ प्रेक्षक या नात्यानें तो अभिनय बघणें होईना. हेमूला मांडीवरून उठवीत आणि मृणालिनीजवळ जात ते म्हणाले, 'पुरे नाहीं का झालें आतां ? कीं मारून टाकणार आहेस ?'

मृणालिनीला मारून मारून हरिमती अगोदरच थकली होती. तिनें हातांतली केरसुणी फेकून दिली, आणि खालीं बसत ती हताश स्वरांत म्हणाली, 'तर ! तेवढ्याकरतांच तर जन्म दिला आहे या पोरींना ! आतां असें तरी करा ! अफू आणून द्या दोन रुपयांची. पाण्यांत कोळून पिऊन जाऊं सगळ्याजणी !'

'कां बोलतेस हें भलतेंसलतें ? हौस का आली आहे तुला मरायची ? देवानें सोन्यासारखीं पोरें दिलीं—— '

'सोन्यासारखीं ? पोरें दिलीं तर मग खायला कां देत नाहीं सोन्यासारखें?'

'अग पण नसेल आपल्या दैवांत, तर देवानें तरी कुठून द्यावें ?'

'अन् हा पोरवडा होता का दैवांत ? तीं तरी पोरें असायला पाहिजे होतीं; पोरीच लिहिल्या होत्या आमच्या दैवांत. एवढ्या पोरी दिल्या तुमच्या देवानें तर घरीं गडगंज खायला प्यायला तरी द्यायचें होतें ! महिने अन् महिने निघून जातात; पण पोरींच्या तोंडाला कधीं गोड लागत नाहीं ! तो मेला मगा धीवर रोज सगळ्या गांवांत माशांचा रतीब घालतो ! सगळ्या घरीं चटकदार कालवणें होतात माशांचीं ! सगळे लोक मिटक्या मारीत ओरपीत असतात ! चाटीत असतात आपले बरबटलेले हात ! अन् मग आमच्याच नशिबांत कां असूं नये ? नक्षत्रासारख्या पोरी माझ्या, कां त्यांना लोकांच्या तोंडाकडे पहायची पाळी यावी? कां कुणीं आपल्या पोरांबरोबर माझ्याही पोरींच्या हातावर एवढेंसें ठेवूं नये ?'

रडत रडत हरिमती मृणालिनीजवळ गेली, अन् तिची पाठ पहात अन् तिच्यावरून आपला हात फिरवीत म्हणाली, 'मारलें मीं माझ्या पोरीला ! काय करूं ? त्या बसूकडे गेली होती. उल्कीनें बोलविलें होतें म्हणे. आपल्या पोरांना ओऽ म्हणस्तोंवर गुलाबजाम खायला घातले; पण एवढी पोर तिथें बसली होती तिला कांहीं असें म्हणविलें नाहीं, कीं एवढेंसें तूंही खा म्हणून ! आई गऽ ! जळले माझे हात! केवढा वळ उठला आहे बरगडीवर! गिरिबाले, ए पोरी, ती चुलीवर एका गाडग्यांत कुठेंशी आंबेहळद आहे, ती आण बरें उगाळून ! उगी हो पोरी ! आतां नाहीं मारणार ! कशाला जावें बरें लोकांच्या घरीं ? आतां नाहीं जाणार ना !'

थोड्याच वेळांत या रंगभूमीवर आणखी एक व्यक्ति येऊन पोंचली. हातांत उगाळलेल्या आंबेहळदीची वाटी घेऊन या नाटकांतलें प्रधान पात्र, गिरिबाला येऊन हजर झाली.

वय वर्षें सतरा. सडपातळ बांधा. कुणालाही हेवा वाटेल, असें उंच कपाळ. सरळ नाक. किंचित् उभट चेहरा. डाव्या दंडावर चांगला तळहाताएवढा हिरवा डाग. उजव्या गालावर एक तीळ. भरपूर लांब सडक केंस. म्हटलें तर सुंदर आहे, म्हटलें तर नाहीं. सुंदर नाहीं असें म्हणायचें कारण तिच्या रूपाला, तिच्या ठेवणीला साजेसे कपडे, दागिने, यांपैकीं एकाशींही तिची ओळख

नसल्यामुळें कोंदणावांचून मातींत लोळत पडलेल्या ओबडधोबड हिऱ्यासारखें तिचें सौंदर्य दृष्टींत भरत नाहीं. या सगळया बाह्य आवरणापलीकडे जो बघूं शकेल, त्याच्या दृष्टीला ती सुंदर आहे. तिची मुद्राच असें सांगते, कीं ही मुलगी अति संयमी, अत्यंत खोल आहे.

गिरिबाला आली, आणि तिनें मृणालिनीच्या बरगडीवर आंबेहळदीचा लेप दिला. तिच्या साडीकडे पहात बनबिहारी म्हणाले, 'गिरिबाले, तुझीही साडी फाटून चालली कीं ग!'

'नाहीं, बाबूजी. ती शिवायची राहिली. अजून जाईल दोन तीन महिने तरी.'

'छे छे! दोन तीन महिने कशाची जाते आहे? आमचें चालेल कसें तरी. पण तुला तरी साडी आणलीच पाहिजे. या पगारावर वाण्याला पैसे देतच नाहीं. सांगतों दोन महिने थांब म्हणून. अन् अगोदर तुला अन् हेमूला साडया आणतों दोन.'

'अन् मला नवे पत्ते बाबूजी!' बिपिननें यादींत दुरुस्ती सुचवली.

'हो! तुला नवे पत्ते बरें बेटा!' बनबिहारींनीं बजेट मान्य केलें.

'आई, तांदूळ किती घेऊं ग? दुपारचा भात आहे शिल्लक थोडासा.' गिरिबालेनें विचारलें.

'घे तुझ्या अंदाजानें.' हरिमती म्हणाली. गिरिबाला आंबेहळदीची वाटी उचलून शेजारच्या स्वयंपाकघरांत गेली. ती गेली हें पाहून हरिमती हलक्या आवाजांत बनबिहारींस म्हणाली,

'ऐकलेंत?'

'काय?'

'अहो, तुम्ही असे हातावर हात टाकून काय बसलांत?'

'कां? काय झालें?'

'झालें माझें कपाळ! आतां पोरीला किती दिवस घरांत ठेवणार? गांवांत तोंड काढायची सोय उरली नाहीं! सगळया बायका आजपर्यंत मागें निंदा करीत. आतां अगदीं तोंडावर म्हणायला कमी करीत नाहींत! सकाळीं तळयावर गेलें, तशी मुकर्जींची हेमांगिनी एखाद्या आजीबाईसारखी कमरेवर हात ठेवून म्हणते काय, 'बाई बाई! हरिमती, शर्थ झाली हो तुझी!

आतां काय पोरीचें स्वयंवर मांडणार आहेस कीं तिला मड्डम करणार आहेस? स्वयंवर करायला घरीं काय आहे म्हणा! दोन्ही वेळ पोटभर जेवायची मारामार! मड्डम करायला शिकवावें लागतें पोरीला! तेंही नाहीं आपल्याजवळ! मग आतां वाढवणार आहेस किती दिवस? एखादे दिवशीं कुणाचा तरी हात धरून जाईल पोरगी पळून, तेव्हां कळेल काय तें!' अन् एकटी तीच नव्हे, तर आणखीही जमल्या होत्या गांवभरच्या! सगळ्यांदेखत ती मला हें म्हणाली! असा राग आला! वाटलें एकदां, कीं सांगावें तिला, कांहीं तुझ्या जिवावर वाढवली नाहीं पोरगी. पण मग म्हटलें, आपल्याच घरांत दुखणें, अन् लोकांच्या नांवानें खडे फोडून काय होतें? तर कांहीं बघाल कीं नाहीं?'

'हो ग. मला कांहीं समजत का नाहीं? मीही इकडे तिकडे दगड मारून पहातोंय्. पण हातांत पैसा पाहिजे ना? लग्नाचें काम. दोन तीन हजार हुंडाच दिला पाहिजे. वरखर्च लागेल गेला बाजार पांचशें रुपये. हातीं कांहीं असल्याशिवाय कशाच्या जोरावर पोरगी बाजारांत उभी करायची?'

'पण आतां किती दिवस वाट पहायची? घरचें घर विकलें तुमच्या बंधुराजांनीं. पै तरी दाखविली आहे का त्याच्यांतली? मागत कां नाहीं त्यांच्याजवळ? सगळें ठरवावें अन् जाऊन दारांत उभें रहावें. म्हणावें कीं पैसे टाका. लग्न ठरलें, त्याकरितां पाहिजेत. पण तुमच्याच्यानें व्हायचें नाहीं तें. माझ्यासारखी पाहिजे होती. मग पाहिलें असतें कसे पैसे देत नाहींत ते. तुम्ही पडलां शंभू महादेव!'

'अग हो हो! पाहूं, हळूहळू सगळे करूं आपण!'

'बस् सगळें करूं आपण! केव्हां? तोंडाला काळोखी फांसली जाईल तेव्हां? परवां शेजारची थेरडी चन्द्रबाला भेटली रस्त्यांत. आम्हीं जात होतों देवीला. तर गिरिबालेची हनुवटी उचलून म्हणते काय, 'पोरी, वर्षं कितवें लागलें तुला?' वाटलें एकदां, कीं सत्तरावें लागलें, तुझ्याहून तीन वर्षें अधिक म्हणून सांगावें. पण लोकांना बोलून काय होतें? मारल्याची जखम बुजून जाते; बोलल्याचा घाव तसाच रहातो काळजांत! आतां नाहीं धीर निघत माझ्याच्यानें. पाहीन पाहीन, अन् तुम्हीं जर कांहींच हातपाय हलविले नाहींत, तर मग एखादे दिवशीं उठेन, अन् तळ्यांत घेईन उडी!'

'अरे पण ! असें कांहीं तरी काय बोलतेस ? '

'हें कांहीं तरी झालें ? तर मग रीतीचें बोलणें म्हणजे काय तें सांगा पाहूं ! किती दिवस ठेवणार मुलीला ? आतां येत्या हिवाळ्यांत तिला सतरावें संपून अठरावें वर्ष लागेल. तिचीही कांहीं मनःस्थिति ओळखाल कीं नाहीं ? एकोणिसाव्या वर्षी मला एक मूल होऊन दुसऱ्या वेळेस मी गर्भारशी होतें. कीं आपले कान पाडून अन् डोळे झांकून बसलें रहावें ? तें कांहीं नाहीं. उद्यांपासून कामाला लागलें पाहिजे तुम्हांला. पाहिजे तर चार दिवस सुट्टी घेऊन कुठें बाहेर जा. '

'सुट्टी घेऊन जा म्हणणें सोपें आहे. पण ती बिनपगारी मिळेल ! घेऊं मग ? '

'हो ! घ्या ! चार दिवस भात कमी खाऊं ! नाहीं तर मी उपास करीन चार आठ दिवस. पण तुम्ही आपलें कुठें तरी पहा एखादें स्थळ अन् पोरीला घरांतून काढा म्हणजे झालें. ती आमच्या तोंडाला डांबर फांसून जाण्याच्या आंत करा एवढें, म्हणजे मिळविलीत ! ' हरिमती बोलण्याच्या आवेगांत भान न रहातां मोठ्यानें बोलून गेली.

'अग, हळू ! पोर पलीकडे स्वयंपाक करतेय ! ऐकेल ना ती ! '

अन् हें सगळें गिरिबालेनें ऐकलेंन् ! या चर्चेस प्रारंभ झाला, तेव्हांपासूनच हें सगळें तिच्या कानांवर जात होतें. इच्छा नसूनसुद्धां मोठ्या माणसांचें बोलणें ऐकूं नये हा पूर्वापार चालत आलेला नियम तिला माहीत होता. पण हें सगळें बोलणें इतकें जवळ चाललें होतें, कीं तें ऐकल्याशिवाय दुसरें गत्यंतरच नव्हतें. तिला अनिच्छेनें तें सगळें ऐकावें लागलें. अगदीं शेवटलें बनविहारींचें बोलणेंसुद्धां !

ज्या वेळीं तिच्या आईनें तोंडाला डांबर फासायची गोष्ट काढली, तेव्हां ती तांदूळ ओसरीत होती. आईचा तो आपणावरील आरोप ऐकून ती मटकन चुलीसमोर खालीं बसली. शून्य दृष्टीनें ती चुलीकडे बघूं लागली. केंविलवाणेपणें ती मनांतल्या मनांत म्हणाली,

'आईनेंही हेंच म्हणावें ना ? लोक म्हणतात, म्हणूं देत; आयाबाया बोलतात, बोलूं देत; त्यांना कळत नाहीं, त्या अजाण आहेत. पण आईनेंही तसेंच बोलावें ? काय चुकलें माझ्याकडून ? कधीं मी वर डोळा उचलून कुणाकडे

बघितलें तरी आहे का ? कधीं उच्छृंखलपणें वागतें का मी ? माझा एवढा भार कां झाला यांना ?

'पण आई तरी काय करील ? लोकांचीं बोलणीं तिला सहन होत नाहींत. ती माझ्याकरितां उपास करायला निघाली ! मी नाहीं करूं द्यायची तिला उपास. मी कमी खाईन, बाबूजींनीं हातपाय न हलविले, तर ती जीव देईन म्हणाली ! माझ्याकरितां का जीव देईल ती ?

'काय करूं मी ? कसें वागूं ? कशी राहूं ? मला कांहीं कळत नाहीं !

'कुणी सांगेल का मला ? चहूंकडे अंधार दिसतोय् ! या अंधारांतून कुणी पलीकडील प्रकाश दाखवील का मला ? या अंधारांत चांचपडतें आहें मी! कुणीं माझा हात धरून मला बाहेर काढील का ? '

तिला उत्तर मिळालें नाहीं. भाताचा कढ चुलींत जाऊन चूल विझली. पण विचारांच्या धुंदींत ती तशीच बसून राहिली.

● ● ●

## २

बनबिहारीबाबूंनीं आपल्या अस्तित्वानें ज्या गांवास शोभा आणली होती त्याचें नांव गोलगांव. वीरभूम जिल्ह्यांतलें तें एक अडीच हजार वस्तीचें खेडें होतें. सपाट जमीन. तीन बाजूंस भाताचीं शेतें पसरलेलीं. पूर्वेकडे उमा नदी. नदींत पाणी कांहीं फारसें नव्हतें. पण पात्र खूप मोठें. मात्र तेवढेंच पाणी वर्षभर कायम असायचें. नदीच्या कांठीं आंब्याचीं झाडें, व पळसाचीं झुडपें. भातांच्या शेतांतून कुठें कुठें माडाचीं भलीं उंच, वाऱ्याबरोबर मंद झोके घेणारीं झाडें.

गांवाच्या चहूंबाजूंस दहावीस लहान लहान तलाव. गोलगांवची चिकण-माती म्हणजे शेजारीं पंधरा कोसांवर असलेल्या बरण्यांच्या कारखान्याचा कच्चा माल. कारखान्याचा मालक गोलगांवच्या जमीनदारास मातीबद्दल

मूल्य देऊन तिथून मातीच्या वाघणी भरून नेई. जमीनदारास दुहेरी लाभ. एक मातीची किंमत मिळे, आणि दुसरें जिथून कारखानदार माती खणून नेई, तिथें तलाव तयार होई. गोलगांवचे तलाव रोहू माशांकरितां प्रसिद्ध असत. हा नवा तलाव बनला, कीं त्याचा लिलांव होई. धीवरांत तो तलाव मक्त्यानें घेण्याची चढाओढ लागे. ते त्या तलावांत रोहू मासे आणून सोडीत, आणि चार सहा महिन्यांत त्या माशांचा वंश पल्लवित होई. धीवर त्यांत मासे धरीत, गांवांत श्रीमंतांच्या घरीं त्यांचे रतीब घालीत, बाकी मासे बाजारांत नेऊन विकीत, आलेल्या पैशांची ताडी पीत, बायकांना बडवीत, आणि हा दैनंदिन कार्यक्रम आटोपला, कीं परत दुसऱ्या दिवशीं सकाळीं जाळीं घेऊन बाहेर पडत.

गांवांत पांच सात घरें ब्राम्हणांचीं, दहावीस कायस्थांची, बाकी मग शेतकरी, धीवर, बारुई, मोची, इत्यादि. गांवच्या अगदीं शेजारीं एका उंचवट्यावर ज्या खाणींत बनबिहारीबाबू कारकुनाचें काम करीत, ती खाण होती. खाणीचा विस्तार जमिनीच्या पोटांत पांच सात एकर अंतरांत पसरला होता खाणींतून निघणारा कोळसा कांहीं फारसा चांगला नसे.

खाणीचे मालक बोलपूरला आपल्या बंगल्यांत रहात असत. खाणीचा सर्व व्यवहार तिचे मॅनेजर श्री. मधुबाबू बोस हेच पहात असत. जरा वेगळ्या शब्दांत बोलायचें झाल्यास मधुबाबू हेच खाणीचे सर्वेसर्वा, गांवांतले सर्वांत श्रीमंत गृहस्थ, खाणींतल्या मजुरांच्या जीवनवेतनाचे सूत्रधार होते.

प्रशस्त शरीर, कोळशाच्या खाणींत शोभून दिसणारा रंग, बटबटीत नाक, मिशांना चाट दिलेली, भलें विस्तृत पोट, अंगांत एक मलमलीचा शर्ट, उंची धोतर, पायांत मूल्यवान् सपाता, एवंगुणविशिष्ट मधुबाबू स्वतःस श्रीरामकृष्णपरमहंसांचे एकनिष्ठ भक्त म्हणवीत असत. त्यामुळें रामकृष्णांच्या वेदांतपरंपरेचा वारसा सांभाळण्याचा मधुबाबू मोठ्या कसोशीनें प्रयत्न करीत.

सर्वत्र हरीच हरी भरलेला आहे, जग मुळीं कधींच अस्तित्वांत आलें नव्हतें, इतकेंही असून डोळ्यांपुढें दिसणारें दृश्य हा परब्रह्मावर झालेला अध्यास आहे, आणि म्हणूनच तो मिथ्या आहे, सदसद्विलक्षण, अनिर्वचनीय आहे, इत्यादि वाक्यें मधुबाबूंनीं खाणींतल्या मजुरांना व कारकुनांना इतक्या वेळां ऐकविलीं होतीं, कीं ज्यांची आणि मातुश्री सरस्वतीची गांठभेट सबंध जन्मांत

कधींही होऊं शकली नाहीं, अशा खाणींत काम करणाऱ्या पाटीवाल्या बायांना जरी झोपेंतून उठवून ‘ जग कसें आहे, ’ असा प्रश्न केला असता, तरी त्यांनीं या कुशीवरून त्या कुशीवर वळत आणि आपली फाटकी वाकळ यत्न-पूर्वक अंगाभोवतीं लपेटून घेत ‘ तो भ्रम आहे, ’ असें उत्तर दिलें असतें !

खाणींत एकूण पाऊणशें ऐंशी मजूर, चार कारकून, एक इंजिनिअर, दोन मुकादम आणि चारसहा हरकाम्ये, असा जवळ जवळ शंभर माणसांचा जमाव काम करीत असे. खाणींत कोळसा जवळच लागल्यामुळें अधिक खोल खणावें लागलें नव्हतें. पंचवीस तीस फूट खोल खड्डा घेऊन तिथून मग जागोजाग खांब टाकीत आडवें खणून कोळसा काढीत असत. खणाईचें काम कांहीं मजुरांकडून व कांहीं मशीनकडून होत असे.

चार कारकुनांपैकीं एकाची जागा वनबिहारीबाबूंनीं भूषविली होती. इतर तीन जागांपैकीं एकीवर कुणी राय, दुसरीवर ठाकुर आणि तिसरीवर एक बिहारीबाबू असे आसनस्थ होते.

दोघां मुकादमांपैकीं एकाचें नांव अघोरनाथ घोष. अघोरनाथावर मधु-बाबूंचा मोठा लोभ होता. अघोरनाथ कांहीं वेदांती नव्हता. वेदांताचें आणि त्याचें अहिनकुलवत् सरळ होतें. अघोरनाथ मोठा भक्त आहे, अशीही त्याची कीर्ति कोणी सांगत नसे. त्याची खाणीच्या मजूरवर्गांत जी प्रसिद्धि होती ती अशाबद्दल कीं, साडेपांच फूट उंची, मांजरीसारखे डोळे, आंखूड नाक, वनेल मुद्रा, प्रशस्त शरीर, एवंगुणधर्मविशिष्ट हा मनुष्य मजुरांचा काळ आहे. अनेक मजुरांचीं गृहजीवनें नासविणारा हा नीच आहे. ज्यावर याची अवकृपा झाली त्या मजुराच्या संसाराचे बारा वाजायला मुळींच उशीर नाहीं. इतकेंही असून याच्या दोन चार लठैत संवगड्यांमुळें खाणीं-तल्या मजुरांपैकीं कुणाचीही याचेविरुद्ध ब्र काढण्याची प्राज्ञा नसे.

शिवाय या त्याच्या गुण्डगिरीमुळें मधुबाबूही त्याच्यावर प्रसन्न असत. अघोरनाथ अनुकूल असल्यावर मग मजुरांच्या असंतोषाची किंवा विग्रहाची चिंता करण्याचें यत्किमपि कारण नसे. कधीं कधीं संतापला म्हणजे अघोर-नाथ आपले बटबटीत घारे डोळे गरगर फिरवीत असें म्हणे, ‘ या अघोर-नाथ घोषाच्या इशाऱ्यावर खाणी चालतात, अनेकांचे संसार वसतात, आणि अनेकांचे उजाडतात ! जगाचा परमेश्वर कोण असेल तो असो. या खाणीचा परमेश्वर मात्र वेगळा आहे, त्याचें नांव अघोरनाथ घोष ! ’

त्याचा हा अभिमान अगदीं निरर्थकही नव्हता. दांडग्या शरीरसंपत्ती-बरोबर देवानें त्याला कपटनीतींत कुशल अशी बुद्धिमत्ताही दिली होती. मधुबाबूंच्याविषयीं त्याच्या मनात मुळींच प्रेम नव्हतें. उलटा तो मधुबाबूंचा द्वेषच करीत असे. पण मधुबाबूंस सन्तुष्ट ठेवल्यानें मजुरांवरील आपली राजवट निर्वेधपणें चालूं शकते, हें त्यानें चांगलें ओळखलें होतें.

व्यसनांच्या बाबतींत अघोरनाथास कसलाच विधिनिषेध नव्हता. इतकेंच नव्हे तर अनेकानेक मादक पदार्थांच्या सेवनानंतरही त्याची प्रज्ञा पूर्वींसार-खेंच काम करीत असे. मादक पदार्थ पचवून टाकण्याच्या बाबतींत त्यानें आपलें अघोरनाथ हें नांव सार्थ केलें होतें.

चाळीस वर्षांच्या अघोरनाथाचें लग्न कधींकाळीं झालें होतें कीं नव्हतें, हें कोणीही प्रतिज्ञेवर सांगूं शकत नव्हता. कारण त्याच्या घरीं त्याची पत्नी दिसत नव्हती; तरी अनेक रात्रींतून लोकांनीं त्याच्या घरीं बांगडयांचा ध्वनि मात्र ऐकला होता. अघोरनाथास पगार किती मिळत असे, याविषयींही निरनिराळे प्रवाद ऐकूं येत. खाणींतल्या अशिक्षित मजुरांनीं तर त्याच्या पगाराचें मान एक हजार रुपयांवर नेऊन ठेवलें होतें. हळूच फुसफुसत ते म्हणत, 'अहो, हें तुम्हांला म्हणून सांगतों, खरे मॅनेजर तर अघोरनाथबाबूच आहेत. मधुबाबू केवळ नावाला!'

खाणींत कधीं कधीं अघोरनाथाच्या बरोबर तर कधीं कधीं स्वतंत्रपणें मजुरांच्या पाठींत लाथा घालीत आणि त्यांच्या मातापितरांची कीर्ति उज्ज्वल करीत हिंडणाऱ्या एका व्यक्तीचा परिचय करणें अत्यावश्यक आहे. वय वर्षें वीस, चेहरा चिनी थाटाचा त्रिकोणी, बटबटीत डोळे, डोळयांभोंवतीं काळीं वर्तुळें, अशक्त शरीरप्रकृति, पोलो शर्ट, हाफ् पँट, केस मागें फिरविलेले, दाढीमिशांचें मुंडन प्रतिदिवशीं केल्यामुळें काळचा मुद्रेवर हिरवटपणा आलेला. अशा या व्यक्तीचें नांव राखाल मधु बोस. महानवसासायासांनीं झालेले, आणि ग्ल्युकोज, मेलिन्स फूड, ग्लॅक्सो, इत्यादि खाद्य पदार्थांवर मोठे झालेले हे श्री. मधुबाबूंचे एकुलते एक चिरंजीव. खाणीच्या मॅनेजरांचे सुपुत्र असल्यामुळें यांचा मजुरांस वाटेल तसे लाथाडण्याचा आणि शिव्या देण्याचा हक्क कोणी-ही नाकारूं शकत नव्हता. तो आपला जन्मजात, अनादि कालापासून चालत आलेला हक्क पुरेपूर बजावण्याची पूर्ण खबरदारी राखालबाबू घेत असत.

धूर्त अघोरनाथानें राखालला आपल्या अगदीं कह्यांत ठेवलें होतें. व्यसनांच्या बाबतींतही अघोरनाथानें राखालच्या हातांत गंडा बांधून त्या शास्त्रांत त्याला प्रारंभिक पाठ देण्यास प्रारंभ केला होता. कारण अगदीं उघड होतें. अघोरनाथाच्या व्यसनांस लागणाऱ्या द्रव्याचा पुरवठा अविच्छिन्न-पणें राखालच्या म्हणजे पर्यायानें मधुबाबूंच्या पैशांच्या पाकिटांतून होत असे.

लोक असें बोलत कीं, अघोरनाथ आपल्या चैनीस पैसे पुरे पाडण्याकरितां एका घोर उपायाचा अवलंब करीत असे. खाणींतील मजुरांपैकीं एखाद्याची बायको जरा दिसायला साधारण बरी असली कीं, कांहीं दिवस अघोरनाथ तिच्याकडे अधिक लक्ष पुरवीत असे. आणि एखादे दिवशीं अचानक ती बिचारी या रंगपटांतून अन्तर्धान पावायची. अघोरनाथाच्या मित्रांपैकीं कोणीतरी एकजण तिच्याबरोबरच दिसेनासा होई, आणि मग चार सहा दिवसांनीं परत उगवे. बिचारा त्या स्त्रीचा पति आरडाओरडा करी, रडे, संतापे आणि दहापंधरा दिवसांनीं पहिली बायको गेली म्हणून दुसरी शोधण्यास निघे.

अघोरनाथ आणि राखाल यांच्या वयांत असलेला फरक त्यांच्या मित्र-पणाच्या आड कधींच आला नाहीं. राजरोसपणें अघोरनाथाच्या खोलीवर भांग, गांजा, इत्यादि शांभवी पदार्थांचें सेवन करण्यापासून तों तहत रात्रीं चोरून पांढरा घोडाछाप बाटल्या फोडीपर्यंत सगळ्या कामांत राखाल आपल्या या गुरु आणि मित्राकडे आदरानें पहात त्याच्या मार्गाचें अनुकरण करीत असे.

बनबिहारीबाबूंना पैशांची नेहमींच तूट पडते, त्यांचा संसार फारसा सुखाचा नाहीं, हें अघोरनाथ चांगलें जाणून होता. एक दोनदां मोठा मायाळु-पणाचा आव आणून त्यानें बनबिहारींना कांहीं पैशांची मदत देऊं केलीही होती. अर्थात् ही मदत देतांना अघोरनाथाचें लक्ष बनबिहारींच्या उपवर कन्येकडे नव्हतें, असें मुळींच नव्हे. एकदां तर त्यानें अप्रत्यक्षपणें बनबिहारीं-जवळ गोष्टही काढली होती. पण पापभीरु बनबिहारींनीं त्याला त्याच वेळीं झिटकारून टाकून त्याची पैशाची मदतही नाकारली. त्यामुळें अघोरनाथ बनबिहारींवर खार खाऊन होता.

पहिल्या प्रकरणांतील प्रसंगानंतर आठ दिवसांची गोष्ट. अजून खाणीची सुट्टी व्हायला एक तासाचा अवधि होता. बनबिहारीबाबू आपल्या समोरील फायलींत कोळशाचीं बिलें लावून ठेवीत होते. तोंच चट्टक् पट्टक् असा सपातांचा आवाज करीत मधुबाबू येऊन त्यांच्या खोलींत दाखल झाले आणि बनबिहारींच्या शेजारीं बसलेल्या रायबाबूंना म्हणाले,

'ऐकलेंस राय् ? त्या ब्रुटस् कंपनीला लिहून टाक, तूर्त कोळसा पुरवितां येत नाहीं म्हणून. नको, नको ! आतांच नको ! उद्यां लिहिलेंस तरी चालेल. तूं मोठा चलाख मनुष्य आहेस. गुरुजींनीं 'तें ब्रह्म तूं आहेस' असा उपदेश केल्याबरोबर शिष्याची अविद्या निरस्त व्हावी, त्याचें चैतन्य ब्रह्मांत मिळून जावें, तसें तुझें आहे. अन् हो ! त्या दामोदर एण्ड को. ला लिही, एवढ्या दरांत आम्हाला कोळसा परवडत नाहीं म्हणून ! '

'पण आपण तर अगोदर त्यांना देतों म्हणून—' राय कान खाजवीत म्हणाले.

'आहेस; कच्चा आहेस अजून. अरे, सगळें जगच जर मिथ्या आहे, तर आपला होकार आणि नकार तरी खरे कुठून असणार ? तें असूं दे. तूं आपला मी सांगतों तें कर. बनबिहारीबाबू, तुमचें तें काम आटोपलें म्हणजे ठाकुरांना पगाराचे तक्ते करायला मदत करा तुम्हीं. '

एवढें फर्मावून मधुबाबू निघून जाऊं लागले, तोंच बनबिहारींनीं उभें राहिल्यासारखें केलें. तें पाहून मधुबाबू म्हणाले,

'कां ? कांहीं सांगायचें आहे ? '

'होय ! जरासें. '

'जरासें कां ? पुष्कळसें सांगा. बोला. '

'आपल्याशीं जरा—!'

'हो. खुशाल बोला. काय आज्ञा आहे ? '

'इथें नाहीं. घरीं येईन मी. '

'ठीक आहे. घरीं या. '

'मग आज येऊं ? '

'हो. या ना ! '

खाण सुटल्यावर नित्याप्रमाणें टेबलावर फाइलींचा ढीग घालून, बन-

बिहारीबाबू सपातांत पाय अडकवून बाहेर पडले. आज त्यांच्या मनांत उत्सुकता, भीति, शका, आशा, या विकारांनीं दाटी करून सोडली होती. एकदां त्यांना वाटे, मधुबाबूंकडे जाऊं नये. हें एवढें ठिकाण आपल्याला झेंपणार नाहीं. पण पुनः वाटे, राखाल श्रीमंताचा मुलगा असेल; पण माझी पोर काय वाईट आहे? अशी नक्षत्रासारखी पोर शंभरजणींत मिळायची नाहीं. राखाल फारसा शिकला नाहीं. न का शिकेना. मॅनेजरचा मुलगा आहे. लवकरच कुठें तरी खाणींत असिस्टंट मॅनेजर म्हणून लागेल, पहातां पहातां मॅनेजर होऊन जाईल. हां, एक गोष्ट आहे, तो थोडासा व्यसनी आहे.

पण व्यसनें कुणाला नसतात? अन् आपल्याला गरिबाला एवढा चोखंदळपणा काय करायचा! त्यांत आपली पोर शहाणी आहे. ती करील त्याचीं व्यसनें कमी. त्यांत पुरुषाच्या जातीला सगळें कांहीं शोभून जातें.

शेवटीं मनाचा धडा करून वनविहारी मधुबाबूंच्या आवारांत शिरले. मधुबाबू व्हरांड्यांत आरामखुर्चीवर हातपाय फैलावून बसले होते. बनबिहारींना पहातांच ते न हालतां म्हणाले, ' या सरकार! '

नम्रपणें सपाता एका बाजूस काढून ठेवून बनबिहारी समोर पसरलेल्या चटईवर बसले. एक जांभई देत आणि शिवोऽहं, शिवः केवलोऽहं, या नेहमींच्या मंत्राचा ध्वनि करीत मधुबाबू म्हणाले,

' बोला, पगाराविषयीं कांहीं म्हणायचें आहे? त्याविषयीं मी कुणाकुणाचें ऐकूं? जो येतो, तो तीच तक्रार करतो. म्हणतो, महागाई वाढली आहे! हो बाबा, वाढली आहे. पण ती काय मी वाढविली! सगळ्या लोकांचे पगार, मशीनची मोडतोड, हें सगळें भागून मालकाला कांहीं थोडासा तर फायदा उरला पाहिजे कीं नाहीं? आतां मी कुणाकुणाची शिफारस करूं? हे करुणामय प्रभो, तूं सर्वत्र व्यापक असल्यामुळें पाहतो आहेस, कीं मी कधीं कुणाचें नुकसान--'

या भडिमारामुळें गवंजून जाऊन बनबिहारी व्याकुळपणें हळूच पुढें सरत म्हणाले, ' तें नव्हे मी वेगळें म्हणत होतों--'

' हें नव्हे काय? जगच्चालक! तूं दयाळु आहेस! एका संकटांतून सुटलों. तर मग आतां बोला काय आज्ञा आहे? '

बनबिहारीबाबूंनीं मधुबाबूंकडे येतांना बोलण्यास प्रारंभ कसा करावयाचा

तें ठरवून व घोटून ठेवलें होतें. पण या मध्येंच उद्‌भवलेल्या भडिमारामुळें ते तें सगळें विसरून गेले. म्हणून परत मनांत मजकूर जुळवीत ते म्हणाले,

'मी म्हणत होतों, आपले चिरंजीव--'

'काय केलें त्यानें ?'

'कांहीं केलें नाहीं. पण ते--'

'होय अजून लहान आहे तो. त्यामुळें कुण्या मजुराला कधीं कधीं टाकून बोलतो एखादे वेळीं.'

'छे छे ! लहान कशाचे ? ते मोठेच आहेत-- !'

'अहो मोठा कशाचा ? लहानच आहे अजून. आणि त्याच्याकडे तुमच्या-सारख्या मोठ्या माणसानें दुर्लक्षच करायला हवें ! काय समजलांत ?'

आवेशाच्या भरांत मधुबाबू सरळ बसले. बनबिहारींना कांहीं उमजच पडेना. शेवटीं हिय्या करून ते म्हणाले,

'मी त्यांच्या लग्नाविषयीं म्हणत--'

'ओः !' आवेश ओसरून जाऊन मधुबाबू म्हणाले, 'काय म्हणत होतां ?'

'माझी मुलगी गिरिबाला-- '

जोराजोरानें हंसत आणि हातपाय पूर्वीसारखे पसरवीत मधुबाबू म्हणाले,

'आहे ! मी वेगळेंच समजत होतों. तर तुमची मुलगी गिरिबाला-कोणती हो ? ती गोरटीलीशी, नाकबीक सरळ आहे ती ?'

'हो !' पुलकित होऊन बनबिहारी म्हणाले.

'पोरगी बरी आहे तशी. पण याही बाबतींत मी मोठा गोंधळून गेलों आहें ! अहो, किती तरी मुली सांगून येताहेत त्याला, मोठमोठ्यांच्या. परवां ते मित्तर आले बोलपूरचे, ते म्हणाले, 'तुम्ही मागाल तो हुंडा !' हां, एक होतें. त्यांची पोरगी कांहीं तेवढीशी चांगली नव्हती. पण तुम्ही असें पहा, बनबिहारीबाबू, हें तर प्रत्येकाच्या दृष्टीवर अवलंबून आहे. अरे पण हो, या बाबतींत तुम्हांला राखालच्या जन्मदात्रीशींच बोललें पाहिजे. ऐकलेंत काय हो ? अहो राखालची आई--'

आंतून कर्कश स्वरांत 'आलें,' अशी हांक आली, आणि त्या हांकेची आणि राखालची जन्मदात्री डोईवरचा पदर अजून खालीं ओढीत येऊन दारांत उभी राहिली. तिच्या डोळ्यांवर जरी पदर होता, तरी तिच्या सुटलेल्या

शरीरास शोभेल इतकें मोठें नाक व त्यांत लटकणारी भली मोठी नथ एवढ्या गोष्टी स्पष्ट दिसत होत्या. राखालच्या आईचे लोकांसमोर लाजायचे दिवस जाऊन जवळ जवळ दीड तप व्हायला आलें होतें. आणि दुसरी गोष्ट ती मॅनेजरची धर्मपत्नी असल्यामुळें आपल्या तोलाच्या लोकांशिवाय इतरांसमोर फारसा पडदा करीत नसे.

‘ मला बोलावलेंत ? ’

‘ हो ! अहो, तुमच्या राखालला मुलगी सांगून आली आहे. ’

‘ कुणाची ? ’

‘ हे बनबिहारी सरकार आहेत ना आमच्या खाणींत ? त्यांची ती गोरटे-लीशी मुलगी ! ’ बनबिहारींचें नांव ऐकतांक्षणींच अंबिकेच्या कपाळावर आंठ्या पडल्या. ती म्हणाली, ‘ हुंडा काय देणार आहेत ? ’

बनबिहारीबाबू आशाळपणें एकदां मधुबाबूंकडे व एकदां अंबिकेकडे बघत बोलूं लागले,

‘ मी गरीब मनुष्य आहें, हुंडा देण्याचें माझें सामर्थ्य नाहीं. तरी मी पांचशें रुपयांपर्यन्त मजल मारीन. माझी मुलगी सद्‌गुणी आहे. ती ज्या घरांत पडेल, तें घर शोभायमान होईल. बावनकशी सोनेंच आहे म्हणा ना ! हुंडा जरी कमी असला — ’

‘ आपल्यासारखाच कुणी कारकुंडा पहा आणि त्याच्या गळ्यांत बांधा तें बावनकशी सोनें ! पांचशें रुपयांत बंगाल्यांत खरजुला कुत्राही मिळायचा नाहीं ! राखालला मुलगी द्यायला निघाले ! पांच हजारपर्यंत हुंडा सांगून आला माझ्या पोराला ! आणि तुम्हीं तरी अगदीं हेच आहांत ! उगीच हांक मारलीत मला ! चांगली देवीचें स्तोत्र वाचीत होतें ! ’

एवढें बोलून अंबिका फणकाऱ्यानें शरीर घुसळवीत आली तशी अंतर्धान पावली. मधुबाबू परत हातपाय ताणीत म्हणाले, ‘ ऐकलेंत सरकार, कसें तिखट काम आहे तें ? पण तिच्या मुलाच्या बाबतींत सर्वाधिकारी तीच आहे बघा ! मी नुसता चैतन्यासारखा निष्क्रिय ! कर्ती करविती सगळी ती माया ! काय समजलांत ? ’

विद्ध मृगासारखे बनबिहारी धडपडत उठले. मॅनेजरची अनुज्ञा घेण्याचा शिष्टाचारही ते विसरले, आणि भ्रमिष्टासारखे अंधारांत घरची वाट चालूं लागले.

● ● ●

# ३

राखाल अलीकडे कधींही मधुबाबूंचे बरोबर जेवत नसे. त्या दिवशीं रात्रींही तो नित्याप्रमाणें उशिरा घरीं परत आला. आज त्यानें अघोरनाथाचे घरीं केवळ भांगच घेतली असल्यामुळें तो बराच शुद्धीवर होता. घरीं आल्याबरोबर त्यानें डोक्यावरची हॅट खुंटीवर ठेवली, आणि शीळ घालीत घालीत स्वयंपाक-घरांत गेला. स्वयंपाकघरांत त्याची जननी अंबिका डोळ्यांना चष्मा लावून दिव्याजवळ कालीरक्षा स्तोत्र वाचीत बसली होती. राखालला पहातांच ती म्हणाली,

'किती उशीर करावा रे रोज ? हे जेवून झोंपलेसुद्धां. कध्धीं कध्धीं वेळेवर घरीं परत यायचा नाहीं ! '

नाटकांतल्या नायकासारखा तिच्यापुढें उभा राहून अभिनय करीत राखाल म्हणाला,

'अरेरे ! कोण बोलतंय् हें ? माझी आईच का ? जिनें आजपर्यंत अत्यंत स्नेहानें–जाऊं द्या. तर आई, तुला कल्पना नाहीं मी किती कामांत होतों तो! अघोरनाथांकडे—'

'चल ! नांव घेऊं नकोस त्या मेल्याचें ! दारुडा मेला ! '

'ऊं ! तुम्ही जुन्या बायका केवळ त्यांचें दारू पिणें पहातां! त्यांचे गुण–'

'जळले मेल्याचे गुण ! माझ्या सोन्यासारख्या पोराला मेल्यानें दारू कां बरांडी काय तें प्यायला शिकविलेंन् ! आज नाहीं झाली वाटतें बरांडी कीं फरांडी काय ती ? कांहीं दिसत नाहीं. '

अंबिका उठली, व तिनें राखालचें पान मांडलें. जेवायला बसत राखाल म्हणाला,

'अग आई, मी काय ? तूं पैसे दिलेस तर रोजसुद्धां पिईन ! तुला माहीत नाहीं. मोठमोठे साहेबही रोज नियमानें ब्रांडी घेतात. प्रकृति अशी दणकट राहते म्हणतेस त्यानें ! '

'आहे ठाऊक ! कांहीं सांगूं नकोस. अरे ! तुला सांगायचें विसरलेंच!'

' काय तें ? ' ठसका लागल्यामुळें पाणी पीत राखाल म्हणाला.

' अरे, तो बनबिहारी आहे ना खाणींतला ? '

' त्याचें काय झालें ? '

' तो आज घरीं आला होता यांच्याकडे. '

' कशाला ? आला असेल साला महागाईचें रडगाणें गात. सगळे साले एक जात चोर आहेत. काम करायला नको पैचें ! बाबूजीही कांहीं बोलत नाहींत. मी सारखा फिरत असतों दिवसभर म्हणून बरें आहे. '

' नव्हे रे ! जळली तुझी महागाई ! '

' मग कशाला आला होता ? '

' तुला मुलगी सांगून आला होता. '

राखालचा घास हातांतच राहिला. तो डोळे विस्फारून आईकडे पाहूं लागला. क्षणभरानें त्यानें विचारलें, ' कोणती मुलगी ? ती थोरली ? काय तिचें नांव–? हेमबाला–! नव्हे, गिरिबाला. ती ? '

' होय तीच. तुला बरीं नांवें माहीत आहेत रे सगळ्यांचीं ? '

' नांवें ? अग तुला आपल्या गांवांतल्या सगळ्या तरुण मुलींचीं नांवें म्हणून दाखवितों पाहिजे तर ! ती गिरिबाला ! झालेंच तर ती पलीकडली सत्यवती, तिच्या शेजारची मुजुमदारांची सुचेता ! तें असूं दे. पण मग तुम्ही काय सांगितलेंत ? हो म्हणालांत ना ?'

' हूं : ! ' राखालच्या पानांत सागुतीच्या कालवणांतल्या दोन नळ्या वाढीत अंबिका म्हणाली, ' हो कसें म्हणायचें ? मेला जन्मदरिद्री कारकुंडा ! चालला मॅनेजरशीं अंग घासायला ! हुंडा किती देशील म्हणून विचारलें, तर म्हणे पांचशें रुपड्या ! '

एरवीं राखालला बकऱ्याचें मांस अत्यंत आवडत असे. पण आतां त्याला सगळें जेवण अरुचिकर वाटूं लागलें. तो तसाच हात धरून म्हणाला,

' आमचे बाबूजी आणि आई, दोघेंही पैशांचीं अशीं लोभी आहेत ! रस्त्यावर पै पडली असेल कुणाची, तर उचलून आणतील ! माहीत आहे ? ती गिरिबाला कशी सुंदर आणि सद्‌गुणी आहे ! तुझ्या गांवांत एक मिळायची नाहीं तसली ! अघोरनाथ तर म्हणतही असतात, ती पोर मला साजेशी आहे म्हणून ! तुम्ही नाहीं म्हणालां असाल ? आतां उद्यां मला ही

चूक दुरुस्त केली पाहिजे. ' असें म्हणत राखाल जेवण संपवून तसाच उठला. अंबिका आश्चर्यचकित होऊन म्हणाली,

' हें रे काय ? किती चांगलें कालवण केलें आहे, तुला आवडतें म्हणून. कच्चा मसाला वाटून घातला आहे. अन् टाकून काय उठलास ? '

कसेंतरी राखाल हात धुवीत म्हणाला, ' मला नको तुझा कच्चा मसाला ! समळें काम बिघडवून टाकलेंस, अन् म्हणे कच्चा मसाला ! '

' नको तर नको ! सगळ्या आळीभर वास पसरला होता कालवणाचा. शेजारची मेना येऊन विचारूनही गेली मला, मसाल्यांत काय काय घातलें तें. ' असें बडबडत अंबिकेनें आपलें पान वाढून घेतलें, आणि एवढें चांगलें कालवण टाकून उठल्याबद्दल राखालला शिव्या देत व खडाखड नळचा आपटीत कालवण भुरकूं लागली.

राखालनें एक सेलर्स ओन् पेटविली, आणि तो आपल्या अंथरुणावर जाऊन पडला. पडल्या पडल्या तो विचार करूं लागला,

' कसा चांगला योग जुळून आला होता अनायासें ! नाहीं तरी अघोरनाथ मला म्हणतच असतात, तूं मोठा भाग्यशाली आहेस म्हणून. परवां त्या ज्योतिषानें नाहीं का प्रतिज्ञेवर सांगितलेंन्.

' तें असूं दे. तर काय म्हणत होतों, गिरिबालेचा बाप आपण होऊन आला होता घरीं.काय झालें होतें थेरडीला हो म्हणायला? सगळ्या मुलखाची कंजूष ! परवां पन्नास रुपये मागितले कलकत्त्याला जाऊन नाटक पहाण्याकरितां, तर सगळे पंचवीसच हातावर ठेवलेन् !

' तर गिरिबाला सांगून आली होती मला ! अहा ! काय सुंदर पोरगी आहे ! चांगली गुणवानही आहे म्हणतात ! त्या दिवशीं पाहिली तिला. कुणा आजीबाईला खाण दाखवायला आली होती तेव्हां. मी म्हटलें आपण जावें खाण दाखवायला, तर बाबूजी असे आहेत दुष्ट. कांहींतरी काम सांगितलें मला ! वेळ काळ कळत नाहीं तो मनुष्य कशाचा ?

' तर गिरिबालेचा बाप आला होता. आतांच जाऊं का त्याच्या घरीं ? सांगूं का त्याला, मला तुझी पोरगी पसंत आहे म्हणून ?

' कीं अघोरनाथांना जाऊन सांगूं लगेच ? ते युक्ति काढतील कांहीं तरी!

' पण नको. उद्यां सकाळीं त्या पोरीलाच जाऊन गांठतों तळ्यावर, आणि

विचारतों, तुला मी पसंत आहे कीं नाहीं ! होच म्हणेल ती अन् मग लगेच जुळवून टाकूं आणि शिकार अशी हातीं आल्यावर मगच अघोरनाथांना जाऊन सांगावें. '

शेवटीं हाच विचार पक्का झाला. रात्रभर राखालला स्वप्नेंदेखील हींच पडत होतीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो लवकर उठला. शौच व चहा उरकल्यावर त्यानें स्टँडपुढें उभें राहून आपलें मुखकमल त्यांत पहात आणि मुरुमाच्या पुटकुळ्या फोडीत दाढी केली. नोकराला शिव्या देत बॅगेंतला रेशमी शर्ट काढवला. धोतर, शर्ट, असा खास देशी पोशाख करून आणि गळ्याभोंवतीं मफलर गुंडाळून त्यानें पायांत पंप शू चढविले. मग स्वारी तळ्याचे रोखानें चालूं लागली.

हें तळें कायस्थांचें आणि ब्राह्मणांचें, म्हणजे त्यांच्या उपयोगाकरितां राखून ठेवलेलें होतें. इतर कोणी या तळ्यावर येत नसत. वेगवेगळ्या लोकांकरितां वेगवेगळालीं तळीं जणूं काय कोणी वांटूनच दिलीं होतीं.

तळ्यावर येऊन राखालनें पाहिलें, अजून कोणी आलेलें नव्हतें. कांहीं धीवरांचीं पोरें मात्र छोट्या छोट्या जाळ्यांनीं चिंगळ्या पकडीत होतीं. राखाल एका आंब्याच्या बुडाशीं जाऊन बसला. कांहीं थोड्या अंतरावर त्यानें मासे धरण्याकरितां पाण्यांत एक माची बांधवून घेतली होती. पण आतां गळ आणला नसल्यानें त्यानें खिशांतून सिगारेटची पेटी काढून फट्कन् उघडली, तिच्यांतून एक सिगारेट काढून निष्काळजीपणानें तोंडांत धरली, आणि फर्रदिशीं काडी ओढून सिगारेट पेटविली. माजोऱ्यासारखा तोंडांतून धूर काढीत तो गिरिबालेची वाट पहात बसून राहिला.

थोड्या वेळानें एक लहानशी मुलगी आपल्या आजीबरोबर येऊन स्नान करून गेली. राखालला माहीत होतें, कीं एवढ्या लवकर म्हाताऱ्या बायकांशिवाय दुसरें कुणी स्नानाकरितां येत नाहीं. तो मनांतल्या मनांत गांवांतल्या सगळ्या बायांवर या त्यांच्या स्वभावाबद्दल चरफडला. त्याच्या समोर एक खंड्या पक्षी आकाशांत आपले पंख विजेच्या गतीनें फडफडवीत तळ्यांतल्या माशांवर किरण साधून टपून होता. राखालनें चिडून जाऊन त्याच्याकडे एक दगड भिरकावला. मग शिव्या देऊन त्या धीवरांच्या पोरांना तिथून पळवून लावलें. जवळ जवळ अर्धा पाऊण तास तळ्यावर कोणीही

आलें नाहीं. बसून बसूनही राखाल कंटाळला. म्हणून उठून तो फेऱ्या घालूं लागला.

पण थोड्याच वेळांत त्यानें असें पाहिलें, कीं गिरिबाला व हेमवती दोघी-जणी दोन घागरी व साड्या घेऊन तळ्याकडे येत आहेत. खुशींत येऊन त्यानें एक सिगारेट पेटविली.

गिरिबालाही या वेळीं कधीं तळ्यावर येत नसे. पण हरिमतीला आज परत तापानें पछाडलें होतें. सकाळीं नेहमींप्रमाणें गिरिबाला उठली, व पहाते तों आई चांगली मोठमोठ्यानें कण्हत होती. ती आईजवळ गेली, आणि तिनें तिच्या अंगास हात लावून पाहिला. तोंच बनबिहारीबाबूही शौचमुख-मार्जन उरकून येऊन हरिमतीजवळ बसले.

'आई, केव्हां भरला ग ताप ?'

'भरला पहांटे पहांटे.'

'काय नशीब आहे पहा ! ' सचिंत बनबिहारीबाबू म्हणाले, 'काय ग ? रात्रीं मधुबाबूंकडील हकीगत सांगितली तुला, त्याचा परिणाम कीं काय हा ?'

'ऊं हूं ! असल्या हकिगती ऐकून त्यांचा परिणाम करून घेऊन गरिबांचें कसें चालतें ? गेल्याच पाळीला साफ निघाला नव्हता अंगांतून. त्यानें पछाडलें परत.'

पण हरिमती कांहीं फारसें खरें बोलत नाहीं, हें दोघांनीही ताडलें. तिची उशी रात्रभर रडून रडून ओली गच्च झाली होती. गिरिबालेला मधुबाबूंकडे बनविहारी कशाला जाणार, याचा अंधुक पत्ता लागला होता. पण त्याची अधिक चिकित्सा करणें एक तर तिच्या स्वभावांत बसत नव्हतें आणि पृच्छा करण्यास योग्य अशी ही वेळही नव्हती.

व्यग्र अंतःकरणानें ती उठली, केरवारे आवरले, मुलींच्या वेण्या उर-कल्या, चूल पेटूं घातली आणि दोन घागरी घेऊन हेमवतीला बरोबर घेत तळ्याकडे निघाली.

वाटेंत हेमवतीनें तिला एकटी पाहून आपलें काम साधायचें ठरविलें. ती चालतांचालतां गिरिबालेचा हात धरून म्हणाली, 'दीदी, किनई चंपेनें आपल्या भावलीला किती छान साडी नेसविली आहे ! अन् गळ्यांत किती चांगला साज घातला आहे !'

'हूं ! ' गिरिबालेनें कांहींतरी उत्तर द्यायचें म्हणून दिलें.

ती म्हणाली, 'आरोबिंदानें गेल्या दिवाळींत तिला ओवाळणी—हें काय ग दीदी! तूं रडत्येस कां ? '

'नाहीं ! डोळ्यांत कचरा गेला, म्हणून पाणी आलें. ' गिरिबालेनें साफ खोटें सांगितलें. तिच्या हृदयांत दुःख मावत नव्हतें. पण ती त्या दुःखाला मोकळी वाटही करून देऊं शकत नव्हती. तिनें वारंवार भरून येणारे आपले डोळे पुसून टाकले. तिला माहीत होतें कीं, बनबिहारी तिच्याकरितांच काल मधुबाबूंकडे गेले होते. तिथें कांहींतरी अपमानास्पद घटना घडून आली असली पाहिजे, हें अनुमान ती आईच्या भिजलेल्या उशीवरून सहज करूं शकली. पण आई आजारी पडल्यामुळें तिला पोटभर रडून घेण्याइतकीही फुरसत नव्हती.

त्या दोघी तळ्याजवळ आल्या. तळ्यावर दुसरें कोणीही नव्हतें. त्यांनीं राखालला पाहिलें नाहीं. दोन्ही घागरी घासून झाल्या. त्या विसळून ठेवून त्या दोघी तळ्यांत शिरल्या. निःसंकोच मनानें त्यांनीं स्नान उरकलें आणि आतां बाहेर पडणार, तोंच राखाल समोर येऊन हजर झाला !

त्याला पाहतांक्षणीं लज्जा, क्रोध, यांनीं गिरिबालेचें मन व्याप्त झालें. ती तशीच मागें सरत गळ्याइतक्या पाण्यांत जाऊन उभी राहिली. तिच्याकडे अतृप्त नेत्रांनीं बघत हंसत हंसत राखाल म्हणाला,

'मी राखाल. मॅनेजरसाहेबांचा मुलगा. तुमच्याशीं कांहीं काम आहे माझें. काल रात्रीं तुमचा गैरसमज झाला आहे. तो मला दूर करायचा आहे. मी म्हणत होतों—'

'हेमू ! ' आपल्या संतापाला शक्य तितकें आवरण घालीत गिरिबाला म्हणाली, 'त्यांना म्हणावें, दूर जा ! '

'अहो बाबू ! दीदी म्हणते, दूर जा. ' हेमवतीनें आज्ञेची पाळणूक केली.

'अरे ! लाजतांय् तुम्ही ? लाजायचें कांहीं कारण नाहीं ! म्हणजे मी तुमचाच आहें, घरचाच आहें ! बरें. तुम्ही कपडे घाला. तोंवर मी दूर जातों. आपल्या माणसाशीं कसली बुवा लाज ? असूं दे ! थोड्या वेळानें येतों मी. ' असें म्हणत हंसत हंसत राखाल आंब्याच्या पलीकडे गेला.

तो आंब्याच्या आड दिसेनासा झाला, हें पाहून गिरिबाला पाण्यांतून

बाहेर आली, व घाईघाईनें तिनें वस्त्र बदललें. तिला राखालचा विलक्षण संताप आला होता. एकटी तरुण मुलगी तळयांत स्नान करून ओल्या वस्त्रांनिशीं बाहेर येत असतां निर्लज्जपणें दांत काढीत पुढें येऊन आपला परिचय करून देत संबंध जोडूं पाहणाऱ्या मूर्ख राखालला काय करावें हें तिला कांहीं उमजलें नाहीं. पण त्याबरोबरच तिला त्याची भीतिही वाटली. तिनें पटकन् आपलें ओलें वस्त्र पिळलें, घागरी भरल्या, आणि त्या दोघी घराकडे निघणार तोंच परत राखाल समोर येऊन उभा राहिला.

मनाशीं एक निश्चय करून त्याला बाजूस टाकीत गिरिबाला घराकडे निघाली. हें पाहून राखाल तिच्याबरोबर चालूं लागला आणि म्हणाला,

‘ हें काय ? तुम्ही निघालांत ? आणि आपलें बोलणें तसेंच राहिलें ! तर रात्रीं माझ्या आईनें जरी तुमच्याविषयीं नाहीं म्हणून सांगितलें असलें-तरी तुम्ही मला आवडतां. मी तुम्हाला आवडतों ना ? हो. स्पष्ट स्पष्ट अगोदरच होऊन गेलेले बरें. एकदां लग्न झाल्यावर मग पुढें खटखट करीत बसणें, हा माझा स्वभाव नाहीं. मला तशी संवय नाहीं. मग काय ? अरे ! तुम्ही तर झपाट्यानें निघालांत घराकडे ! वा: ! आज सकाळपासून मी तुमची वाट पहात इथें बसलों आहे, तो काय उगीच ? सगळें ठरल्याशिवाय मी तुम्हांला जाऊं देणार नाहीं. ’

राखाल गिरिबालेच्या समोर हात पसरून उभा राहिला. काय करावें, हें तिला कळेना. मोठ्यानें ओरडूनही कांहीं लाभ नव्हता. कारण जवळपास कोणी मनुष्य दिसत नव्हता. तिचें अंतःकरण अति क्षुब्ध झालें. ती हेमवतीला म्हणाली,

‘ हेमू, त्यांना म्हणावें, गरिबांनाही लाज, लज्जा, मानापमान हें सगळें असतें ! ’

हेमवतीला बोलूं देण्याच्या अगोदर राखालच म्हणाला,

‘ वा वा ! गरिबाला मानापमान नसतो, असें कुणी म्हटलें ? मी मुळींच म्हटलें नाहीं तसें. तें असूं दे. इथेंच निर्णय झाला पाहिजे. हुंड्याबिंड्याचा कांहीं मोठासा प्रश्न नाहीं. आमची म्हातारी आणि म्हातारा पैशाचे लोभी आहेत खरे; पण एकदां आपलें लग्न झाल्यावर मग ते कांहीं म्हणणार नाहींत. मग मी तुम्हांला आवडतों कीं नाहीं ? ’

'हेमू, त्यांना म्हणावें— '

'हेमू कशाला पाहिजे मध्यें ? हा मी इथें उभा आहें. प्रश्न अगदीं सरळ आहे. तुम्ही मला आवडतां तर मी तुम्हांला आवडतों कीं नाहीं ? सकाळपासून तुमची वाट पहात बसून माझ्या पाठीचा कणा दुखायला लागला. आतां उत्तर मिळाल्याशिवाय मी इथून हलायचा नाहीं. हो म्हणून टाका, म्हणजे पुढील तजविजींना लागण्यास बरें. '

आतां मात्र त्या मूर्खाविषयींचा गिरिबालेचा संताप अनावर झाला. ती जळजळीत नेत्रांनीं त्याच्याकडे निर्भयपणें पहात त्याला म्हणाली, 'कसलें उत्तर पाहिजे तुम्हांला ?'

'अजून समजला नाहीं प्रश्न ? किती सोपा आणि सरळ आहे ! तुम्ही माझ्याशीं लग्न करणार कीं नाहीं ? '

या वेळीं निश्चय करून त्याच्या अंगावरून पुढें जात गिरिबाला क्षुब्ध स्वरांत म्हणाली, 'या जन्मीं तरी माझा तसा कांहीं विचार नाहीं ! '

राखालच्या अंगांतलें मॅनेजरच्या मुलाचें भूत जागें झालें. त्याला आठवलें कीं आपण आपल्या खाणींतील कारकुनाच्या मुलीशीं बोलत आहोंत. तो ओरडला,

'असें का ? तर मग तुझा बाप कशाला आला होता आमच्या घरीं पाया पडत ? कशाला नाक घाशीत आला होता 'आमची मुलगी करून घ्या ' म्हणून विनवणी करायला ? '

'मला हें माहीत नव्हतें. अगोदर कळतें, तर मी त्यांना जाऊं नका म्हणून सांगितलें असतें. '

'असें का ? एवढी घमेंड आहे हं ? बरें ! ठीक आहे. आमच्याच खाणींत काम करतो तुझा बाप ! पाहून घेईन ! जातेस कुठें ? '

गिरिबाला क्षणभर थांबली आणि मग आपला आवेग दाबीत ती राखालकडे पाहून म्हणाली,

'मधूबाबूंच्या एकुलत्या पुत्राला हें असलें लोकांच्या पोरींना वाटेंत अडविणें आणि नाहीं नाहीं तें बोलणें शोभत नाहीं. '

'बरें बरें ! तुझा उपदेश नको आहे मला. माझें मी पाहून घेईन काय करायचें तें. ' तारस्वरांत ओरडत राखाल म्हणाला.

तोंच त्या वाटेनें तळ्याकडे चट्टोपाध्यायांची करुणा येत होती, ती या दोघांचें मोठमोठ्यानें बोलणें ऐकून धाईधाईनें गिरिबालेजवळ येऊन उभी राहिली. करुणा गिरिबालेची शाळूमैत्रीण होती. मुलखाची भांडखोर, म्हणून जरी तिची प्रसिद्धि होती, तरी गिरिबालेचें आणि तिचें खूप सूत जमत असे. तिच्या तोंडाच्या तोफखान्यास तोंड देण्यास सहसा कुणी धजावत नसे. ओंडलच्या यतीश बानर्जींशीं तिचा विवाह ठरलेला होता. यंदा तिच्या भावी पतीस वर्ष चांगलें नसल्यामुळें तो विवाह पुढील सालीं करायचें निश्चित झालें होतें.

करुणेनें गिरिबालेच्या खांद्यावर हात ठेवला आणि तिला म्हणाली,

' काय झालें ग गिरिबाले ? '

ती आपली सखी जवळ येऊन खांद्यावर हात ठेवीत विचारते आहे, हे पाहून गिरिबालेनें एवढा वेळ दाबून ठेवलेला आवेग एकदम बांध फुटल्यागत बाहेर पडला. ती करुणेच्या खांद्यावर मान टाकून ढसढसां रडूं लागली. तिला धरून हलवीत करुणा म्हणाली,

' मग सावकाश रडलीस तरी चालेल. अगोदर काय झालें तें सांग. हा राखाल कांहीं बोलला वाटतें तुला ? '

' काय सांगूं ग करुणे ! माणूस गरीब झालें, म्हणून काय कोणींही लाथाडावें का ग त्याला ? मी स्नान करीत होते, तों येऊन हे मला नाहीं नाहीं तें विचारूं लागले ! '

करुणेला पाहून राखाल निघून जाऊं लागला होता. कारण मागें एकदां करुणेची खोडी काढल्याबद्दल करुणेनें त्याला असें चमकाविलें होतें कीं अजून तो ती जुनी आठवण विसरला नव्हता. तो निसटतोय् असें पाहून करुणा पदर खोचीत पुढें झाली अन् ओरडून त्याला म्हणाली,

' अहो राखाल बोस ! पहिली आठवण विसरलांत वाटतें ? गिरिबाला गरीब पडली, म्हणून तिची खोडी काढतोस; होय रे ? तुला काय वाटलें ? तिच्या बाजूनें भांडणार कोणीच नाहीं ? आतां पुनः तर नांव घे तिचें ! तुझ्या आईवडिलांदेखत घरीं येऊन तुझी फटफजिती ना केली, तर माझें नांव करुणा तें काय ?'

राखाल एका शब्दानेंही प्रत्युत्तर न करतां निघून गेला. आपणाकडून

चुकी झाल्याबद्दल त्याचें मन त्याला ग्वाही देऊं लागलें. तिला स्नान करतांना जाऊन भेटलों, ही खरोखरच आपली चूक झाली. स्नान झाल्यावर भेटलों असतों, तर काय बिघडलें असतें? असा विचार करीत तो एकदां अघोरनाथाला हा प्रकार सांगण्याच्या उद्देशानें खाणीकडे वळला. पण आपला हा पराभव लोकांस सांगणें बरें नव्हे, असें वाटून तो घरींच गेला.

घरांत शिरल्याबरोबर आई मासे चिरीत बसली होती, तिच्याकडे जाऊन तो म्हणाला,

'आई, तूं केलेंस तेंच बरोबर होतें.'

'काय रे ?' हातांतील माशांचे खवले झटकीत अंबिका म्हणाली.

'अशा दरिद्री माणसाच्या मुलीशीं लग्न न करणेंच अधिक बरें.'



# ४

जवळ जवळ वर्षभर निरनिराळ्या गांवीं खेटे घालून बनबिहारीबाबू आतां अगदीं दमून गेले होते. त्यांच्या पायांतल्या सपाता त्यानंतर दोनदां खोलू मोचीनें दुरुस्त करून दिल्या. पण दुसऱ्या पाळीस सपाता देतांना त्यानें स्पष्टच करून टाकलें कीं, आतां मात्र दुरुस्त करण्याजोगें त्यांच्यांत कांहीं राहिलें नाहीं. म्हणून मग बनबिहारीबाबूंनीं सपातांशिवायच हिंडायचें ठरविलें. त्यांच्या पायांना जाळवात होता. पायांवर धूळ बसली कीं मोठमोठ्या भेगा पडत. तरीपण हिंडल्याशिवाय गत्यंतर नव्हतें.

रविवारीं खाणीला सुट्टी असे. ते शनिवारची सुट्टी घेऊन शुक्रवारीं सायंकाळीं बाहेर पडत, ते रविवारीं सायंकाळीं घरीं परत येत. त्यांना ज्या ज्या स्थळांचा पत्ता लागला, तीं सर्व स्थळें त्यांनीं पाहून टाकलीं. एकदां तर एका स्थळाकरितां ते कलकत्त्यासही जाऊन आले.

एके दिवशीं हरिमती म्हणाली, 'तुम्हांला काय म्हणावें आतां ? एकदां

तारिणीकडे जाऊन त्याच्याकडे खडखडून पैसे मागत कां नाहीं ? घर काय त्याचें एकट्याचें होतें काय ? तुम्ही तुमच्या वडिलांचे कोणी नव्हतां ? सरळ रस्त्यावर उभें रहावें आणि मोठ्यानें हांकारून पैसे मागावे. कसा देत नाहीं, पाहूं या बरें ! '

' अग ! त्याच्याही पाठीमागें बायका पोरें आहेत, व्यवहार आहे. झालेंच तर वडिलांचें नांव चालवितो आहे तो ! श्राद्धें तो करतो, पक्ष तो करतो, शास्त्री, पंडित येतात ते त्याच्या घरीं उतरतात-- '

' मग तुम्हीं काय वडिलांचें नांव बुडविलें आहे काय ? हें मोठें आश्चर्यच आहे ! घर विकलें एवढें मोठें; पांच हजार रुपये आले. ते सगळेच्या सगळे त्यानेंच खाऊन बसावें ? एवढें कसें तुम्हांला कळत नाहीं? पोर उराशीं येऊन बसली. तिच्या लग्नाकरितांही भावाजवळ मागणार नाहीं तुम्हीं ?'

' त्रास नको देऊंस बुवा ! पाहिजे तर जातों या शुक्रवारीं. '

शुक्रवारीं रात्रीं आठ वाजतां बनबिहारी जेव्हां शिवडीला त्यांचे थोरले भाऊ तारिणीबाबू सरकार यांचेकडे जाऊन पोंचले तेव्हां तारिणीबाबू समोर बसलेल्या पुत्तू बारूयाला चमकावीत होते !

' तर काय समजलास ? जगांत कोणी कोणाचा नाहीं. न कोणाचा भाऊ, न कोणाचा मित्र ! जें काय आहे तें पैसा ! पैसा असला तर अलीकडे सर, नसला तर पलीकडे हो ! काय समजलास ? तर मग केव्हां आणून देतोस रुपये ? पांचशें रुपये नेले होतेस, आतां त्यांचे झाले सवासहाशें ! '

तोंच बनविहारीबाबू त्यांच्या दृष्टीस पडले. त्यांना पाहून तारिणीबाबू म्हणाले,

' अरे ! तूं केव्हां आलास बनबिहारी ? या आतांच्या गाडीनें आलास वाटतें ? अग ए मधुची आई ! हा तुझा दीर आला बघ. जा आंत. पायबीय धू. '

रात्रीं जेवतांना बनबिहारीबाबूंनीं भीत भीत गोष्ट काढली,

' भय्या, गिरिबाला मोठी झाली. तिचें लग्न उरकून टाकलें पाहिजे आतां! '

' होय तर ! उरकून टाकलेंच पाहिजे. तूं तिला एवढी मोठी वाढविलीस, हेंच मला आवडलें नाहीं. आमची पप्पूही आतां आलीच म्हणायची बेतांत. अग, ते बारूआ म्हणत होते, त्यांच्या गांवीं एक छान स्थळ आहे म्हणून .'

'मग जाऊन पहावें कीं नाहीं ? आत्तांपासून ठरवून टाकलेलें बरें. उगीच मुली घोडया करून ठेवायच्या ! ' कढी वाढीत वाढीत बनबिहारींकडे खोंचक नजरेनें पहात तारिणी–पत्नी म्हणाली.

तो टोमणा तसाच गिळून बनबिहारी म्हणाले,

'तर भय्या, एक दोन स्थळें मींही पाहिलीं आहेत.'

'मग टाक जुळवून अन् पाहतोस काय ? बाबा रे, पोरी एकदां त्यांच्या त्यांच्या घरीं जाऊन पोंचल्या, कीं मग बाप सुटले त्यांच्या ऋणांतून.'

'पण भय्या—'

'पण काय आतां ? या वर्षीं लागतील तेवढे मुहूर्त आहेत. एखादा जवळ-चाच पहा अन् उरकून टाका. स्थळें बरीं आहेत ना ?'

'हो. स्थळें बरीं आहेत. पण गाडें येऊन अडलें आहे हुंड्यापाशीं !'

'उघडच आहे ! तूं तुझ्या बिपिनचा हुंडा नाहीं घेणार ? चांगला वाजवून घेशील चारपांच हजार रुपये. मग देतांना कां रे बाबा कुरकुर करतो आहेस? रीतीचें सगळें केलेंच पाहिजे !'

'तेवढ्याकरितांच तर आलों होतों मी. रीतीचें करायला मीही कुठें नाहीं म्हणतोय् ?'

'मजकडे कां आलास बाबा ? इथें कोणता असा पैशांचा प्रवाह व्हात चालला आहे ? आमचें आम्हांलाच भागतां भागतां मारामार पडते आहे ! आतां हें पप्पूचें लग्न आहेच म्हणेनास डोक्यावर ! त्याची नको मला कांहीं काळजी करायला ?'

'मी म्हणत होतों, घराचे पैसे—'

'बस् ! घराचे पैसे ! तेवढेंच एक दिसतें तुला अन् जगाला ! पण वडि-लांनीं देणीं किती करून ठेवलीं होतीं, किती जणांचें ऋण काढलें होतें, तें कुठें दिसतें ? ते अनुपम मोशाय, तसेच ते दुसरे—जाऊं दे. हिशेबच दाख-वितों तुला जेवण झाल्यावर सगळा ! पण हिशेब तरी कशाला दाखवायला पाहिजे ? विचार कुणालाही. सगळी आळी, सगळा गांव सांगेल, कीं तारिणी सरकारनें बापाचें ऋण फेडून टाकलें. एवढेंच नव्हे, तर आज तो आपल्या वडिलांचें नांव राखून आहे ! कधीं कुणी याचक माझ्या दारून वंचित मुखानें

गेला आहे ? हां ! आतां एक आहे. मी कुण्या लुच्च्या लफंग्याला कांहीं देत नाहीं. पण चांगले याचक येतच नाहींत, हा काय माझा दोष आहे ?'

या शब्दवर्षावाखालीं बनबिहारी अगदीं दडपून गेले. मुकाट्यानें त्यांनीं जेवण संपविलें. सबंध गांवाचा पुरावा हजर केल्यावर आतां हिशेब पहायची जरूर राहिली नाहीं, हें त्यांनाही पटलें. शेवटीं आपल्या हिश्शाचे न का मिळेनात, भावानें कर्जाऊ रक्कम दिली तर पहावें, अशा उद्देशानें त्यांनीं शेवटचा भात घेतां घेतां परत बोलायचें साहस केलें,

' भय्या ! तें मानलें मीं. कांहीं शिल्लक राहिलीच नसेल; तुम्ही द्याल तरी कोठून ! पण निदान कर्जाऊ तरी ? '

' हरि हरि ! प्रभो ! तूं साक्षी आहेस. अरे बनबिहारी मी काय सावकार, काय लक्षाधीश, काय कोटचधीश, कीं माझ्या फर्मस् आहेत कलकत्त्याला ? कोणाला काय मागावें, याचेंही ताळतंत्र नको माणसाला ? माझेंच मला पुरतां पुरत नाहीं. तुला कर्ज कुठून देऊं बाबा ? कीं माझ्या ओळखीचा कोणी सावकार नाहीं तुझ्याकरितां भीड घालायला. नाहीं तरी कां म्हणा ? उगीच खोटें कशाला बोलावें ? आत्तां पेठेंत जाऊन उभा राहीन कुणाच्याही दुकानांत, तर पैशांनीं पुरून काढीन तुला. माझ्या नुसत्या वचनावर हजारों रुपये गुंतविणारे लोक आहेत आज कलकत्त्याला ! अरे पण तारण काय ? तुला कशाच्या आधारावर पैसे द्यायचे ? तीस कीं पसतीस रुपये पगार मिळणार तुला--'

' नव्हे. चाळीस. ' बनबिहारी मध्येंच म्हणाले.

' बरें, मानून चाला, चाळीस रुपये. पांच तुला मुली. एक मुलगा. तूं, तुझी बायको, शिवाय आला आहे, गेला आहे, हें आहे, तें आहे, तर सांग बघूं ? तूंच असतास सावकार, आणि असा कोणी ऋणको तुझ्याकडे आला असता, तर तूं दिले असतेस त्याला रुपये ? '

अशाच प्रकारचे अनेक बोधामृताचे कवळ ग्रहण करीत बनबिहारींनीं ती रात्र तिथेंच काढली, व दुसऱ्या दिवशीं सकाळीं जेव्हां ते परत गोलगांवला निघाले, तेव्हां न्हाव्याकडून हजामत करवून घेत असलेले तारिणीबाबू म्हणाले,

' निघालास बनबिहारी ? तर लक्षांत ठेव. मुलीला आणखी घरांत ठेवूं नकोस. एखादें बरेंसें स्थळ पहा, आणि उजवून टाक एकदांची. वयाबियाकडे

फारसा चिकित्सेनें पहात बसूं नकोस मुलाच्या. बिजवर तिजवर असला तरी चालेल. पण एकदांचा मोकळा हो बाबा! सरकार घराण्याचें नांव उज्ज्वल राहिलें पाहिजे. काय समजलास ? आपल्या वाडवडिलांच्या नांवाला काळोखी लागतां उपयोगाची नाहीं. आलें का ध्यानांत ?'

'हो.'

'आणि हें पहा, तुझ्या गोलगांवकडे कचू बरे मिळतात. एक पांच सात शेर कचू पाठवून दे कोणाच्या तरी हातीं. पैसे नंतर धाडीन मी बरें का ?'

'हो.'

बनबिहारी खिन्न मनानें घरीं येण्यास निघाले. त्यांचें दारिद्र्य ही तर एक उघड गोष्ट होती. पण तारिणीबाबूंनीं त्या दारिद्र्यावर जे चटके दिले ते मात्र त्यांना असह्य झाले. पांचसात शेर कचू पाठवून देऊन ते मिळाल्यानंतर पैसे धाडणाऱ्या भावाविषयीं त्यांच्या मनांत तिरस्कार उत्पन्न झाला. पण त्यांनीं विचार केला,

'माणसावर दैव फिरलें, म्हणजे मग सगळेंच फिरतें. भैयाचा तरी काय दोष त्यांत ? आपल्या दैवाला दोष द्यावा. कुणावर रागावून किंवा त्याचा तिरस्कार करून काय लाभ ?'

त्यांच्या मनांत एक नवीनच चिंता उभी राहिली. 'आतां हरिमतीला येथील वृत्त काय सांगावें ? तारिणीभैया कांहीं देणार नाहीं हें तर मी तिला सांगितलेंच होतें. पण त्यानें माझें दारिद्र्य जें माझ्यापुढें उकलून दाखविलें, एखाद्या मेलेल्या जनावराची करतात, तसली जी त्याची चीरफाड केली, ती सगळी मीं मुकाट्यानें ऐकून घेतली, हें जर तिनें ऐकलें तर ती मला खायला उठेल ! काय होईल तें होवो ! आतां मी तरी कशाकशाला तोंड देऊं ?'

गाडींत बसल्या बसल्या त्यांचें डोकें विचार करीत होतें. गाडी स्टेशना-मागें स्टेशनें मागें टाकीत होती. शेवटीं कष्टग्राम स्टेशन आलें. बनबिहारी खालीं उतरले आणि गांवाकडे चालूं लागले. चालतां चालतां त्यांना वाटलें, 'असें केलें तर ? हो, असेंच करावें. हरिमतीला सांगावें, मी तारिणीभय्याला खूप बोललों. खूप हजेरी घेतली त्याची ! हो हो ! हेंच करावें.'

आणि मग बायकोजवळ खोटें बोलण्याची एवढी सोपी युक्ति इतका वेळ आपणास न सुचल्याबद्दल त्यांना आश्चर्य वाटलें. त्यांचें विचारांनीं भरलेलें मनही थोडें मोकळें झालें आणि या आत्मवंचनेच्या आणि परवंचनेच्या नशेंत गुंगून ते झपाझप चालूं लागले.

घरीं आल्यावर त्यांची प्रसन्न मुद्रा बघून हरिमतीनें विचारलें,

'काय? मिळाले पैसे?'

'पैशांचें राहूं दे.' कपडे काढीत बनबिहारी म्हणाले, 'पण ऐशी फजिती केली आहे त्याची, कीं जन्मभर आठवण राहील! होऽ! कांहीं कसर केली नाहीं. मागचें पुढचें, सगळें उकरून काढलें, आणि त्याला सांगितलें कीं, आतां जर का मला न विचारतां किंवा पैसे न देतां घर विकलेंस, तर मग मात्र लक्षांत ठेव! माझें नांव बनबिहारी आहे!'

'त्यांना मारायबिरायला तर नाहीं धांवलांत ना?' सचिंत होऊन हरिमती म्हणाली.

'धांवलों तर काय!' बनबिहारी काय वाटेल ते सांगत सुटले, 'मारायला धांवलों! मारणारच होतों थोबाडींत; पण आपला तो हा मध्यें पडला म्हणून!'

'जळले माझें कर्म!' कपाळावर हात मारून हरिमती म्हणाली. 'कुठून मला बुद्धि झाली तुम्हांला त्यांच्याकडे पाठवायची! अहो! मी तुम्हांला त्यांना मारून या, असें का सांगितलें होतें?'

'कां?' घाबरून जाऊन बनबिहारी म्हणाले.

'कां काय? आतां ते फौजदारी करतील! अन् कांहीं झालें तरी त्यांची पुतणीच होती ही. लग्नांत कांहीं ना कांहीं तरी मदत लोकलाजेकरतां तरी त्यांनीं केली असती! देवा रे! कसें करूं मी आतां!' हरिमती खालीं बसत आणि खोकल्याशीं झुंज घेत म्हणाली.

बनबिहारी घाईघाईनें तिच्याजवळ गेले आणि तिच्या पाठीवरून हात फिरवीत ते म्हणाले, 'अग, मी कांहीं त्याला मारलें नाहीं!'

'मारायला तरी धांवलांत ना?'

'मारायला धांवलोंही नाहीं. त्याला बोललोंही नाहीं.' लाजेनें मान खालीं घालून बनबिहारी म्हणाले, 'एक अक्षरही बोललों नाहीं त्याला. त्यानेंच आकांडतांडव केलें तें ऐकलें आणि मुकाट्यानें उठून निघून आलों. आतां तर झालें ना?'

हरिमतीला आतां थोडा धीर आला. ती म्हणाली, 'बरें झालें. तुम्ही मला

बरें वाटावें, म्हणून खोटें सांगितलेंत ! त्याची कांहीं जरूर नव्हती. मी ओळखूनच होतें हें सगळें. पण मग आतां कसें करायचें हो ? '

तीं दोघेंजण परत गिरिबालेच्या लग्नाच्या चिंतेंत बुडून गेलीं. जितक्या ठिकाणीं बनबिहारी हिंडले, तितक्या सगळ्या जागीं सर्व प्रथम उत्तर मिळत असे, ' मुलगी मग पाहूं. अगोदर हुंडा किती देतां तें बोला.' विचारे बनबिहारी आपला पांचशें रुपयांचा आंकडा सांगत, आणि तो आंकडा ऐकून वरपक्षानें तुच्छतेनें त्यांच्याकडून तोंड वळविलें, कीं मग मुकाटयानें मान खालीं घालून उठून येत.

त्यानंतर दोनतीन दिवसांनीं बनविहारी दुपारीं जेवून खाणींत गेले. हरिमती जरा चटई टाकून आडवी झाली. गिरिबाला बिपिनचें फाटकें कुडतें शिवीत आणि ' आनंदमठ ' वाचीत बसली. पोरें शाळेंत गेलीं. तों म्हातारी चन्द्रबाला कमरेवर हात देऊन आपलें अवजड शरीर सांभाळीत घरांत शिरली आणि म्हणाली,

' काय करते आहेस ग हरिमती ? झोंपली आहेस वाटतें ? झोंप, झोंप. तसें कांहीं काम नाहीं. सहज आलें होतें तुझी प्रकृति बघायला.'

हरिमती उठून बसत गिरिबालेला म्हणाली, ' गिरी, ती ओंपऱ्यांतली चटई आण ग आत्याबाईला बसायला. '

गिरिबालेनें आणलेल्या चटईवर बसत आणि आपल्या बोचऱ्या तोंडाला आपल्या तळहाताचा आधार देत चंद्रबाला म्हणाली,

' जुळलें का ग कुठें हिचें ? '

' नाहीं हो अजून जुळलें ! हे खेटे घालून घालून दमले. पण जिथें तिथें आमचें दारिद्रय आडवें पडतें, त्याला कोण काय करणार ? तुम्हांला नाहीं का हो माहीत एखादें स्थळ ? गरीब असला तरी चालेल; पण हातापायांनीं धडधाकट असला कीं झालें. '

आपल्याविषयीं बोलणें सुरू झालें, हें पाहून गिरिबाला तिथून उठली, आणि शिवायचें सामान व कादंबरी घेऊन स्वयंपाकघरांत जाऊन बसली. ती गेली, असें पाहून जरा हरिमतीच्या जवळ सरकत आणि फुसफुस करीत चन्द्रबाला म्हणाली,

' अग, ! गरीब कशाला ? नक्षत्रासारखी तुझी पोर ! चांगला खाता-

पिता मिळेल कीं तिला. तेंच तर सांगायला आलें आहें तुला. शेजारचें वैताली गांव माहीत आहे ना तुला ? इथून चार कोस आहे. तिथले चन्द्र-नाथ मित्तर माहीत असतील तुला ऐकून. '

' आहेत तर काय झालें ? त्यांचें तिसरें लग्न इथेंच नाहीं का झालें ? काय ग बाई दुर्दैवी म्हातारा ! ती तिसरीही विहिरींत उडी टाकून मेली म्हणे ! त्यांचा कोणी पुतण्या आहे लग्नाचा ? मुलगा तर नाहींच बिचाऱ्याला ! '

' तूं तरी हरिमती कांहींच्याबाहींच बोलतेस ! चन्द्रबाबूंना म्हातारा म्हणायला काय झालें ? नुकतें कोठें त्रेपन्नावें वर्ष लागलें त्यांना. एवढी गड-गंज संपत्ति आहे; पण कोणी वारस नाहीं बघ त्याला ! सारखा तळमळतो आहे पोराकरतां ! '

शंकित होऊन हरिमती म्हणाली,

' मग तूं त्याची वकिली करायला आली आहेस कीं काय ? '

' छे ग बाई ! मी कशाला कुणाची वकिली करूं ? त्यानें मला निरोप पाठविला विचार म्हणून. तर मी नुसती विचारायला आलें. देतेस त्याला मुलगी ? बघ, कांहीं कमी पडायचें नाहीं जन्मभर ! '

संतापून हरिमती म्हणाली,

' तर काय त्या माकडाच्या गळ्यांत बांधू म्हणतेस माझी पोर ? दांत सगळे पडले. कवळी बसवली आहे थोबाडांत. दारुडा मेला ! त्यापेक्षां आडांत लोटून देईन मी माझी पोर ! '

' पहा बाई ! चांगलें हिताचें सांगायला आलें—'

' तुला कांहीं नको आमच्या हिताची काळजी ! आमचीं आम्ही समर्थ आहोंत आमचें हित पहायला ! '

उठत उठत चन्द्रबाला म्हणाली, ' म्हणतात तेंच खरें ग बाई ! कुणाचें बरें करूं नये जगांत ! '

हरिमती सुन्न होऊन पडून राहिली.

रात्रीं तिनें बनबिहारींस ही सगळी हकीगत सांगितली. बनबिहारी म्हणाले,

' जाऊं दे. लोक काय म्हणतात तिकडे लक्ष देऊं नये. मला एक चांगलें स्थळ सांगितलें आहे गुप्तांनीं. बीजगांवचा जगद्बंधूबाबू आहे ना, त्याचा

पुतण्या आहे लग्नाचा. बहुधा जुळेलच तें ठिकाण. येत्या शुक्रवारीं जातों बीजगांवला. आज जरा कसकसतेंच आहे माझें अंग. पण बसून भागायचें नाहीं.'

गिरिबाला पडल्या पडल्या हें सगळें ऐकत होती. तिनें गुपचुप देवाला हात जोडले आणि डोळ्यांतलीं टिपें पुशीत मनांतल्या मनांत म्हणाली,

'प्रभो ! इथें तरी बाबूजींना यश मिळूं दे ! आतां हे त्यांचे अन् आईचे कष्ट माझ्याच्यानें पहावत नाहींत !'

त्या दिवशींचा ताप बनबिहारीबाबूंच्या अंगांतून शुक्रवारींही निघाला नाहीं. ते जेव्हां बीजगांवला जायला निघाले, तेव्हां हरिमतीनें आज जाऊं नका म्हणून सांगितलें. गिरिबालाही जाऊं नका म्हणाली. पण न ऐकतां बनबिहारी तसेच निघाले.

ते बीजगांवीं जगद्‌बन्धूबाबूंच्या घरीं जाऊन पोंचले. जगद्‌बन्धू नुकतेच शेतांवरून चक्कर मारून घरीं आले होते. त्यांची थोडी जमीनदारी होती. बनबिहारी आणि जगद्‌बन्धू हे दोघे लहानपणापासून मित्र. बनबिहारींना पाहिल्याबरोबर जगद्‌बन्धू म्हणाले,

'ओ हो ! बनबिहारी ! अरे आज सूर्योदय पश्चिमेस झाला कीं काय ? '

'नव्हे रे ! ' बांकावर बसत बनबिहारी म्हणाले, ' बरेच दिवसांत आलों नव्हतों. विचार केला एकदां जाऊन यावें. '

रात्रीं जेवणें आटोपल्यावर दोघे मित्र दोन खाटांवर गप्पा मारायला बसले. बनबिहारी म्हणाले, 'अरे, त्रिभुवनकीर्ति चूर्ण आहे का थोडेंसें ? '

'कां ! ताप आहे वाटतें अंगांत ? '

'हो, आहे जरासा. '

'मग पांघरुण घेऊन बैस. अन् ताप होता तर आलास कशाला पायीं धडपडत ? '

'त्याचें असें झालें, ' बनबिहारींनीं सुरुवात केली आणि मग मुलगी मोठी झाल्याचें सांगून जगद्‌बंधूंच्या पुतण्याविषयीं प्रस्ताव पुढें मांडला. त्यांचें सगळें संपल्यावरही जगद्‌बंधू कांहीं बोलत नाहींत, हें पाहून बनबिहारी म्हणाले,

'कां ? तुला नाहीं पटलें माझें म्हणणें ?'

एक उसासा टाकून जगद्‌बंधु म्हणाले,

'खरें सांगू तुला, बनबिहारी, जर मला मुलगा असता लग्नाचा, तर मी तुझ्या पोरीला माझ्याच घरीं आणलें असतें. मग तुलाही विचारलें नसतें मी. गिरिबाला काय आहे, हें मीं चांगलें ओळखतों. पण तूं जें सुचविलेंस, त्या फंदांत पडू नयेस तूं. एकतर तूं गरीब आहेस. माझ्या भावाचा स्वभाव तुला माहीत नाहीं. तो विलक्षण आढ्यताखोर मनुष्य आहे. जन्मभर पोरीला तिथें जाच होईल. त्या होमकुंडांत डोळे उघडे ठेवून मी तरी कांहीं तुला पोरगी लोटूं द्यायचा नाहीं. दुसरें असें कीं त्याची उडी फार मोठी आहे. तूं पांचशें म्हणतोस, पांचेकशेंची मदत मी करीन. पण तें ठिकाण पांच हजारांच्या अलीकडील नाहीं. तो माझा भाऊ आहे, या विश्वासावर तूं आलास; पण माझ्या सांगण्याचा तिथें कांहीं उपयोग व्हायचा नाहीं. तेव्हां तूं आपलें दुसरें एखादें ठिकाण बघ. तें बरें. माझ्या लक्षांत नाहीं. नाहींतर मीं सुचविलें असतें.

'अरे, हा तर लोकांनीं सरळ बाजार मांडला आहे. जी वस्तु कमी, तिचें मूल्य अधिक. देवानें बंगालला अल्पपुत्रत्वाचा जो हा शाप दिला आहे, तो कशानें दूर होईल तो होवो. त्याला माझाही कांहीं उपाय नाहीं, तुझाही नाहीं. लोकांच्या या वणिकवृत्तीला आळा घालण्याचें सामर्थ्यही आमच्या अंगीं नाहीं ! '

दुसरे दिवशीं जेव्हां बनबिहारी ताप घेऊनच घरीं परत आले, तेव्हां ते सगळ्यांवरच संतापले होते. गिरिबाला, हरिमती, मधुबाबू, खाणींतले लोक, देशांतले मजूर, बंगाल, ईश्वर, त्यानें निर्माण केलेलें जग, या सर्वांवरच ते चिडले होते.

घरीं आल्याबरोबर त्यांनीं चटईच्या गुंडाळ्याला एक लाथ मारून तो उघडला. त्यावर त्यांनीं आपलें तें थकलेलें शरीर टाकून दिलें. हरिमतीनें येऊन सचित स्वरांत त्यांना विचारलें,

'काय झालें ? अगबाई, ताप आहेच वाटतें अजून अंगांत ! '

'झालें माझें कपाळ. तो ताप घेऊन जाईल तर सुटेन तरी. या पोरीही कां मरत नाहींत कोण जाणे एकदांच्या ! '

गिरिबाला आंत काम करीत होती. तिनें हे वडिलांच्या तोंडचे शब्द ऐकले. आजपर्यंत तिचे वडील एवढे कठोर कधींच झाले नव्हते. ते शब्द

विषाक्त बाणाप्रमाणें तिच्या हृदयांत जाऊन बसले. खळकन् तिच्या डोळयांतून दोन आंसवें गळून पडलीं.

• • •

# ५

त्या दिवशीं रात्रीं नेहमींप्रमाणें अंधारानें आपला काळाकुट्ट पडदा सगळ्या जगावर पसरविला. त्या जगन्मातेच्या पदराखालीं बहुधा सगळीं बाळें झोंपीं गेलीं. गोलगांवही त्याला अपवाद नव्हतें. रात्रीं शहरांतून गस्त घालीत हिंडणाऱ्या शिपायांप्रमाणें बेडूक आणि रातकिडे, हे मोठमोठ्यानें ओरडून जणूं काय हुशियार् अशी सादच घालीत होते.

बनबिहारींच्या घरावरही जगन्मातेचें तें काळें पांघरुण पसरलें होतें. सर्व पोरें थंडीमुळें पाय पोटाशीं घेऊन फाटक्या रजईखालीं झोंपलीं होतीं. चिन्तेच्या नशेंत गुंगून जाऊन उशीरा का होईना, बनबिहारी आणि हरिमतीही झोंपीं गेलीं.

झोंप आली नाहीं एका गिरिबालेला. बिपिन तिच्या शेजारींच झोंपला होता, तो कुशीवर वळला; थंडीमुळें त्यानें हातापायांचें मुटकुळें केलें. त्याच्या अंगावरील पांघरुण गिरिबालेनें सारखें केलें.

ती झोंपण्याचा प्रयत्न करीत होती; पण तिला झोंपच येईना. वडिलांचे ते विषानें माखलेले शब्द वारंवार उग्र स्वरूप धारण करून तिच्या अंतःचक्षूसमोर उभे रहात आणि त्यांच्या त्या विकराल स्वरूपामुळें तिची झोंप कित्येक कोस दूर पळत असे.

'या पोरीही मरत कां नाहींत एकदांच्या ! '

ती विचार करी,

'काय केलें आहे आम्हीं ?

'असा काय कुणाचा अपराध केला आहे, कीं त्याकरितां आम्ही मरावें ?

'सगळ्या जगाला जगण्याचा हक्क आहे. सगळें जग जगण्याकरितां धडपड करीत आहे. ज्यांनीं क्रूरपणें दुसऱ्यांचे खून केले आहेत, असे लोकही मरूं इच्छीत नाहींत. मग आम्हीच कां मरावें ? असा काय अपराध घडला आमचे हातून ?

'केवळ आम्ही दरिद्री आहोंत हा अपराध ? दारिद्र्य एवढा मोठा अपराध आहे ? हुंडा द्यायला पैसे जवळ नसणें याकरितां सख्खा बाप मरणाची शिक्षा सुनावूं शकतो ! तोसुद्धां प्राणापलीकडे प्रेम असणाऱ्या आपल्या पोरींना !

'आम्हांला हा दंड काय म्हणून ? आम्ही आमचा धर्म सोडूं इच्छीत नाहीं म्हणून ? आम्ही आमचें शील विघडवूं इच्छीत नाहीं म्हणून ? वेश्याही तर सुखानें, मजेंत जगतात. पहिल्या प्रतीचे बदमाषही ख्यालीखुशालींत दिवस काढतात. मग आम्ही पूर्वजांचा मार्ग सोडूं इच्छीत नाहीं, त्याचा त्याग करूं इच्छीत नाहीं, म्हणून आम्हांला एवढी मोठी शिक्षा ? '

'होय ! एवढी मोठी शिक्षा ! ' तिच्या अन्तर्मनानें उत्तर दिलें. ' तो मार्ग काय एवढा सोपा आहे ? एवढा स्वस्त आहे ? मुळींच नाहीं. त्या सनातन मार्गाचें मूल्य कितीतरी अधिक आहे.

'जगांत कोणीही जगूं शकतो. वाटेल तो व्यवसाय करण्याएवढा मनुष्य निर्लज्ज झाला, कीं तो लोकांत दिसायला तरी सुखानें जगतो. केवळ एक लोकलज्जाच कोळून पिऊन टाकली कीं कोणीही जगूं शकतो.

'पण तो शीलाचा, लौकिकाचा, पारलौकिकाचा मार्ग ! आज तो गंजून गेला आहे. आज त्यावर रूढीची घाण सांचली आहे. आज त्यांत शिष्टाचारांचीं कांटेरी झुडपें उगवलीं आहेत. त्यावर मतांच्या अभिनिवेशाचे खड्डे निर्माण झाले आहेत.

'तरी इहपरलोकीं कल्याण करणारा तोच एक मार्ग आहे. त्याकरितां, त्याच्यावरील ही घाण नाहींशी करण्याकरितां, हीं झुडपें तोडण्याकरितां, हे खड्ड भरून काढण्याकरितां तुलाच काय, तुझ्यासारख्या अनेकींना मेलें पाहिजे.

'अर्थ समजून घे या मरणाचा. हें मरणें म्हणजे जीव जाणें नव्हे. हें मरणें म्हणजे इथेंच, यांपैकीं एकाशीं लग्न लावून, त्याच्या दुर्गुणांशीं, त्याच्या स्वभावाशीं झुंजत, पळीपळी रक्त आटवीत तुला हा मार्ग स्वच्छ केला

पाहिजे. आपल्या चांगल्या कृतींच्या द्वारें जगाला ओरडून सांगितलें पाहिजे, कीं ' इथें या ! हा मार्ग सत्याचा ! हा मार्ग शीलाचा ! कांटयाकुटयांनीं भरला आहे हा ! पण हाच इहपरलोकीं कल्याण करणारा आहे. या माझ्या मदतीला ! आपण सगळे मिळून हा मार्ग स्वच्छ करूं ! कोणालाही जातां येईल असा ! कोणालाही प्रवास करतां येईल असा ! माझ्यासारखी कोणी मुलगी मग या मार्गानें प्रवास करतांना हुंड्याकरितां अडविली जाणार नाहीं ! कारण मग कोणी हुंडाच मागणार नाहींत ! मग सगळे माणुसकीनें जगतील ! मग अशीं उन्मत्त उत्तरें कोणी देणार नाहीं. सगळे एकमेकांशीं मिळून मिसळून, एकमेकांच्या उपयोगी पडत जगतील. या ! आपण सगळे मिळून असा सुखी समाज निर्माण करूं या ! '

' पण मी कुणाशीं लग्न करूं ? कोणीच तर माझ्याशीं लग्न करायला तयार नाहीं ! ' ती व्याकुळपणें आपल्या अन्तर्मनाला म्हणाली.

' कां ? राखाल आहे ना ? ' तिच्या अन्तर्मनानें उत्तर दिलें.

' हो ! ' ती म्हणाली, ' तो आहे खरा ! आपण होऊन तो मला विचारायला आला होता. मी परत त्याला विचारीन. तो दुर्गुणी आहे; असूं दे.

' पण तो आतां हो म्हणेल का ?

' कोण जाणे काय करील तें. पण मी त्यांच्या पाया पडेन. त्यांच्या गयावया करीन. दुसरा कांहीं इलाज नाहीं. बाबूजींचें आणि आईचें हे कष्ट आतां मला बघवत नाहींत. '

विचारांच्या निबिड गर्दीतून ती आतां जरा मोकळ्यावर आली. तिनें एकदां उठून तोंडावरून पाण्याचा हात फिरविला आणि शांतपणें मनोमन नमस्कार करीत ती अंथरुणावर पडली. थोड्या वेळानें तिला झोंप लागली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती उठली. नित्याचीं कामें आवरून तिनें स्वयंपाक केला. अलीकडे आईच्या दुखण्यामुळें तीच स्वयंपाक करीत असे. दुपारीं जेवणें उरकलीं. पोरें शाळेंत पळालीं. बनबिहारीबाबू येऊन जेवून परत खाणींत गेले. अंगांत ताप असला तरी त्यांना कामावर जाणें भाग होतें. हरिमतीही आडवी झाली.

घरांतलें सगळें उरकल्यावर गिरिबाला आईजवळ जाऊन तिला म्हणाली, ' आई, मी जरा करुणेकडून जाऊन येतें. '

‘ जा. ’

करुणेचें घर कांहीं फारसें लांब नव्हतें. गिरिबाला करुणेच्या घरीं पोंचली, तों करुणेचे वडील जेवत होते. त्यांनीं गिरिबालेस पाहून पत्नीला विचारलें,

‘ गिरिबाला काय ग ही ? ’

‘ हो. तिच्या मैत्रिणीकडे आली आहे वाटतें. ’

‘ अरे ! मी ओळखली नाहीं एकदम ! पोरीची वाढ फार झपाट्यानें होते बुवा ! ’

‘ असूं द्या. लोकांच्या पोरींशीं तुम्हांला काय करायचें आहे ? जा हो गिरिबाले माडीवर ! आत्तांच जेवून करुणा वर गेली आहे. वाचीत पडली असेल. ’

गिरिबाला पटकन् माडीवर गेली. करुणा तिला पहातांच उठून बसली आणि म्हणाली , ‘ यावें पर्वतकन्यके ! ’

गिरिबाला तिच्या पाठीवर थाप मारीत किंचित् स्मित करून तिच्या शेजारीं बसत म्हणाली,

‘ भारीच हो करुणे तूं तरी ! ’

‘ मी भारी कीं हलकी, याची चर्चा नंतर करूं. अगोदर गिरिबाला म्हणजे पर्वताची कन्या, असा अर्थ होतो कीं नाहीं तें सांग. कीं विसरलीस शब्दांचे अर्थ ? छडी घेऊ वाटतें ? ’

गिरिबालेचें रात्रीं किंचित् मोकळें झालेलें मन परत मेघाच्छन्न झालें होतें. ती गंभीरपणें करुणेला म्हणाली,

‘ मार ! तूंही मारून घे ! दैवानें मारलें, बाबूजी रात्रीं मारायला निघाले ! तूंच राहिली होतीस, तूंही मारून घे. ’ पटकन् तिच्या डोळ्यांत पाणी आलें.

करुणा तिच्या पाठीवर हात फिरवीत म्हणाली,

‘ काय झालें ग गिरिबाले ? रात्रीं बाबूजी मारायला निघाले ? काय म्हणून ? सांगना ! ’

पण गिरिबाला कांहीं बोलली नाहीं. आपल्या जिवलग सखीच्या शेजारीं बसून तिनें आतांपर्यन्त संचित असलेल्या आपल्या वेदनांस वाहण्यास मोकळी

वाट दिली. ती अत्यंत संयमी असल्यामुळें तिनें मुखावाटे हुंदका बाहेर फुटूं दिला नाहीं. पण तिच्या डोळ्यांतून मात्र अविरत अश्रुप्रवाह सुरू झाला.

गिरिबालेचें दुःख केवढें मोठें आहे, याची करुणेला कल्पना होती. तिचें जरी नुकतेंच लग्न झालें होतें, तरी विवाह ठरतांना मुलींच्या अंतःकरणाला होणाऱ्या वेदनांचा थोडासा भाग तिलाही अनुभवण्यास मिळाला होता. आतां ती बेडर मनाची असल्यामुळें तिनें त्या वेदनांना फारशी दाद दिली नाहीं, हें वेगळें.

थोड्या वेळानें करुणा म्हणाली,

' गिरी ! तूं इथें नुसती रडायलाच आली आहेस का ?तर मग थोडीशी बाजूला सर. पांघरूण घेऊन झोंपतें मी, अन् मग छानदार सूर धरून रड, म्हणजे मला झोंप तरी लागेल. चांगला छानदार गळा आहे तुझा. चांगली मजुळ रडशील. '

करुणेची ती थट्टा ऐकून गिरिबाला अश्रु ढाळीत असतां असतांच खुदकन् हंसली व म्हणाली,

' भारी बाई हो तूं करुणे ! तुला कांहीं काळवेळ कळत नाहीं. '

' वा : ! म्हणे मला काळवेळ कळत नाहीं ! पहिल्या पाळीला माहेरीं आलेली माहेरवाशीण मी. चांगलें छानदार बोलायचें, गप्पा मारायच्या, तें राहिलें कुणीकडे. बरें, बाबूजी रात्रीं कां मारायला निघाले म्हणून विचारलें, तर तूं आपल्या गळक्या घागरीसारखी डोळ्यांतून आंसवेंच गाळीत बसलीस! कांहीं सांगशील तर युक्ति तरी काढतां येईल ! '

मग गिरिबालेनें आपले डोळे पुसले आणि म्हणाली,

' करुणे ! मी एक निश्चय केला आहे. '

' कसला ? '

मरायचा. '

' वाः ! छान. आज सप्तमी, रविवार. परवां मंगळवारीं नवमीला मुहूर्त चांगला छान आहे बघ. त्या दिवशीं घबाडयोग—'

तिच्या तोंडावर हात ठेवीत गिरिबाला म्हणाली,

' तूं ऐकून घेणार आहेस, कीं थट्टाच करणार आहेस ? '

'थट्टा कशी करीन ? ब्राह्मणी चांगला मुहूर्त सांगतेय्, तर म्हणे थट्टा ! अन् आमच्या मागच्या तळ्यांत चांगलें भरपूर खोल पाणी आहे.---'

'मग मी उठून जातें कशी ! '

'बरें तर. ही बघ गप्प बसलें. ' करुणा तोंडाचा चंबू करीत म्हणाली.

तिला धरून हलवीत गिरिबाला म्हणाली,

'भारीच बाई द्वाड तूं हो ! मी तुला गप्प बैस असें कधीं म्हणालें ग ?'

'वा: ! मग उठून जाणार होतीस ती ? '

'मग तूं गंभीरपणें ऐकून कां घेत नाहींस ? '

'बरें. सांग काय तें. '

'रात्रीं बाबूजी घरीं आले. ते बीजगांवला गेले होते. कशाकरितां तें तुझ्या लक्षांत आलें असेलच. '

'आलें लक्षांत. पुढें सांग. '

'त्यांना आज चार पांच दिवसांपासून ताप येतोय् . तसेच ते बीजगांवला जायला निघाले. नका जाऊं म्हटलें तर म्हणाले, बसून भागायचें नाहीं, हिंडलेंच पाहिजे. काय सांगूं ग करुणे ! केवढें धिप्पाड शरीर होतें बाबूजींचें माझ्या लहानपणीं आम्ही शिवडीला होतों तेव्हां ! आळींतल्या आयाबाया म्हणत, दृष्ट लागेल बाबूजींना. आमच्या शेजारचे मुखर्जी काशीला गेले; येतांना काळभैरवाचा गंडा घेऊन आले अन् त्यांनीं तो बाबूजींच्या दंडांत बांधला. म्हणाले, ' हा असला, म्हणजे कुणाच्या करणीची भीति नाहीं. असली सोन्यासारखी काया. कोणी पापी कांहीं करायचादेखील !

'पण तेच बाबूजी एखाद्या चिपाडासारखे झाले आहेत ग ! कपडे काढले, म्हणजे बघवत नाहीं त्यांच्याकडे ! रात्रंदिवस चिंतेच्या खाईत जळताहेत सारखे ! तेच एकटे का ? नव्हे. सगळें घर ! बाबूजी, आई, दोघांनाही माझ्या लग्नापलीकडे कांहीं सुचत नाहीं दुसरें.

'ते दिवसेंदिवस वाळून चालले आहेत आणि मी मात्र जाडी होत चाललें बघ ! '

'तर ! तूं येत होतीस माडीवर, तेव्हांच म्हणालें मी, कीं एवढें वजनदार माणूस कोण येतें आहे ? माडी पडेल कीं काय वजनानें, अशी भीति वाटायला लागली आहे मघांपासून मला ! ' करुणा म्हणाली.

'पुरे ग! तर बाबूजी गेले होते बीजगांवला त्या एकाच कामाकरितां. रात्रंदिवस दुसरें कांहीं सुचत नाहीं बघ त्यांना. कशीं पापी जन्मलों ग आम्ही त्यांच्या पोटीं! रात्रंदिवस आमच्या चितेंत त्यांनीं झुरत असावें! असूं दे. तर काल तिथून परत आले. अंगांत ताप तसाच होता. आल्याबरोबर त्यांनीं चटई अंथरली अन् तीवर अंग टाकतां टाकतां ते म्हणाले,—

परत गिरिबालेला उमाळा आला. पण तो तसाच दाबून डोळ्यांतलीं आंसवें न पुसतां ती बोलली,

'ते म्हणाले, या पोरी मरत कां नाहींत एकदांच्या! काय सांगूं करुणे! ते असें कधीं म्हणाले नव्हते. एवढे कठोर ते कधीं झाले नव्हते!

'आई अनेक वेळां संतापायची. काय तोंडाला येईल तें बोलायची. आया-बायांनीं मारलेल्या टोंची तिला सहन होत नसत. म्हणून तो त्यांच्यावरील राग ती आमच्यावर काढायची. पण बाबूजी—

'ते एवढे निष्ठुर कधींच झाले नाहींत. नेहमीं सुखांत, दुःखांत, आपदांत, विपदांत ते एखाद्या पर्वतासारखे स्थिर असायचे. त्यांच्या स्नेहाळ छायेखालीं आम्ही हे आपत्तींतले दिवसही मोठ्या निश्चितपणें घालवीत होतों!

'पण काल रात्रीं—काल रात्रीं मला असें वाटलें, कीं तें आमच्यावरचें पांघरुण कोणी हिसकून घेऊन जात आहे. तो आमच्यावर छाया धरून असलेला वृक्ष उन्मळूं लागला आहे! ते कधीं एवढें कठोर बोलले नव्हते ग करुणे! त्यांना आतां हा भार असह्य झाला आहे.

'म्हणून मी ठरवलें आहे, कीं त्यांनीं मर म्हटलें ना, तर खरोखरीच मरायचें. दचकूं नकोस अशी. मी कांहीं जीव देणार नाहीं. देवानें दिलेलें हें दान आपण होऊन फेंकून देण्याइतकी मी अविचारी नाहीं. पण तरी मी मरणार आहें!'

'स्पष्ट सांग गडे गिरिबाले!' तिच्या खांद्यावर हात ठेवीत करुणा म्हणाली.

'मी राखालशीं लग्न करणार आहें.'

'हट्! ' करुणा चमकून दूर सरत म्हणाली. तिनें त्या दिवशींचा सर्व वृत्तांत गिरिबालेकडून ऐकला होता. 'अशी भांग प्याल्यासारखी काय बडबडतेस?'

'मुळींच नाहीं. मी पूर्ण शुद्धीवर आहें. माझें शुद्धीवर असणेंही एक आश्चर्य-जनक गोष्ट आहे खरी ! वस्तुत: आतां मीं एक तर वेडी व्हायला पाहिजे. पण मला कांहीं झालें नाहीं. मी चांगली शुद्धीत बोलतें आहें. मी खरोखरच त्यांच्याशीं लग्न करणार आहें ! '

तिच्याजवळ जाऊन तिची हनुवटी उचलीत आणि तिच्याकडे निरखून पहात करुणा म्हणाली,

'कोण गिरिबाले, तूंच कां बोलते आहेस ही ? त्या मूर्खाशीं लग्न करणार तूं ? ज्यानें एक वर्षापूर्वी तलावावर तुझा अपमान केला, त्या चहा-टळाशीं—'

आपल्या कानांवर हात ठेवीत गिरिबाला म्हणाली,

'ऊंहुं ऊंहूं करुणे ! माझे कान असे विटाळूं नकोस. ते कसेही असले तरी मी त्याच्याशींच विवाह करायचें ठरविलें आहे. माझ्या या गोमट्या रूपा-करितां मी त्यांना हवी आहें, मी त्यांच्याशींच लग्न करीन ! दुसरा उपाय नाहीं ग करुणे, दुसरा उपाय नाहीं ग ! आम्ही दरिद्री आहोंत ना ? बस् तर मग याहून दुसरा कांहीं उपाय नाहीं ! करुणाताई, काय करूं ग ? याहून दुसरा मार्ग नाहीं. '

या वेळीं मात्र गिरिबालेला आपला आवेग आवरणें अशक्य झालें. ती करुणेच्या कुशींत तोंड लपवून ढसढसां रडूं लागली. करुणेलाही तिचें तें दुःख पाहून गहिंवर आला. ती गिरिबालेपेक्षां सहा महिन्यांनीं लहान होती. तरी तिच्या पाठीवर थोपटीत आणि आपले डोळे पुशीत ती म्हणाली,

'असें काय करावें गडे गिरिबाले ! शहाणी नाहीं का तूं ? ऊठ माझी बाई ती ! ऊठ.' थोड्या वेळानें गिरिबाला उठून बसली. ती थोडी शांत झाली असें पाहून करुणा म्हणाली,

'गिरिबाले, माझे वडील म्हणतात, सहसा विदधीत न क्रियां अविवेक: परमापदां पदम् । विचार न करतां केलेली कोणतीही गोष्ट पुढें जन्मभर रडवायला पुरेशी होते. चांगला विचार केलास का तूं ? राखाल दारू पितो, इतरही व्यसनांत तो मागें नाहीं. '

'असूं दे. मी त्यांना सुधारण्याचा यत्न करीन. मला त्यांचे सगळे दुर्गुण

माहीत आहेत. खूप ऐकलें आहे मी त्यांच्याविषयीं. तरी मी त्यांच्याशींच लग्न करायचें ठरविलें आहे.'

'हें तूं ठरविलें आहेस. पण तो हो म्हणेल का आतां ? तूं आणि मी त्याला कसा पळवून लावला होता तें माझ्या अजून लक्षांत आहे.' करुणा म्हणाली.

'मी त्यांच्या पायां पडेन. त्यांच्यापुढें लोटांगण घेईन मी. त्यांना हात जोडून म्हणेन, माझा स्वीकार करा !' गिरिबालेनें उत्तर दिलें.

'पण त्याचा तो वेदांती लुच्चा म्हातारा अन् ती जाडी थेरडी हो म्हण-तील का ?'

'ते करतील कांहींतरी. गेल्या पाळीला ते असेंच कांहींतरी म्हणाले होते.'

'बघ बाई ! मला तर कांहीं कळत नाहीं याच्यांतलें. एवढें मात्र नक्की, कीं जें काय होतें आहे, तें बरें होतें आहे, असें कांहीं मला म्हणवत नाहीं.' करुणा म्हणाली.

'मग काय करूं करुणे मी ? काय खरोखरीच तळ्यांत जीव देऊं ?'

'तळ्यांत जीव देणें सोडून याच्यापलीकडे दुसरा मार्ग सुचत नाहीं तुला?'

'मुळींच नाहीं, करुणे ! बाबूजींच्या जिवाची तगमग आतां सहन होत नाहीं मला. त्यांच्या मनांत जी आग पेटली आहे, तिच्या चटक्यांनीं रात्रंदिवस मी होरपळून निघतें आहे. आईचें तें कणकण झिजणें आतां असह्य झालें आहे मला. खूप विचार केला मी. किती तरी रात्री विचारांत घालविल्या. बाबूजींचें आणि आईचें तें आत्मदहन आजपर्यन्त उघड्या डोळ्यांनीं पाहिलें. पण आतां मात्र अगदीं बघवेनासें झालें आहे मला. आम्ही गरीब आहोंत ना करुणे ! जर मला वांकडें पाऊल टाकायचें नसेल, तर मग याहून दुसरें साधन दिसत नाहीं मला. बाबूजींची या क्लेशांतून सुटका करण्याचा हाच एक उपाय आहे.

'मी हातांपायां पडून केलेली विनंती ते अमान्य करणार नाहींत. मला त्यांच्याशींच लग्न केले पाहिजे, त्यांच्या इच्छेलाच बळी पडलें पाहिजे !'

गिरिबाला केवढ्या जबरदस्त क्लेशाच्या ओझ्यानें दडपून जाऊन हें साहस करायला प्रवृत्त झाली आहे, हें करुणेला जाणवलें. तिची आर्त वेदना करु-णेच्या अंतःकरणास स्पर्श करून तें अंतःकरण व्यापून राहिली. तिनें गिरिबा-लेला जवळ ओढलें आणि म्हणाली,

'बाई गिरिबाले, मी तुझ्याहून वयानें लहान आहें, भांडखोर आहें. तोंडाळ म्हणून सगळ्या गांवभर माझी प्रसिद्धि आहे. तरी पण तूं हें साहस करायला प्रवृत्त झाली आहेस, त्यांत तुला यश मिळावें, अशी मीं कालीमातेला प्रार्थना करीन.

'मला सांगतां येत नाहीं, तुला तें यश कितपत मिळेल तें. पण तूं जो हा आपल्या गुणांचा, आपल्या रूपाचा अन् आपल्या चांगुलपणाचा राखालरूपी कुंडांत होम करायला निघाली आहेस, त्यांत ब्राह्मणी म्हणून मी आशीर्वाद देतें तुला ! '

गिरिबाला करुणेच्या कुशींत तोंड लपवून तशीच बसून राहिली.

• • •

# ६

राखालनें तळ्यावरचा प्रसंग अघोरनाथास सांगितला नाहीं. तो जरी मूर्ख होता, तरी त्याची सद्सद्विवेकबुद्धि त्याला संपूर्णपणें सोडून गेली नव्हती. घरीं परतल्यावर त्याला असें वाटूं लागलें, कीं खरोखरच गिरिबाला स्नान करीत असतां तिच्या समोर जाण्यांत आपण चूक केली. या चुकीबद्दल तो स्वतःवर रागावला. गिरिबालेचाही त्याला राग आला. अघोरनाथ, मधुबाबू, अंबिका, या सर्वांवरच तो चिडला. दोनचार दिवस तो कुणाशींच धड बोलला नाहीं. अघोरनाथाकडे जाणेंही त्यानें टाळलें. ते दोनचार दिवस त्यानें उगीच बाहेर भटकण्यांत घालविले.

अघोरनाथानें हें पाहिल्याबरोबर कुठें तरी कांहीं बिनसलें आहे, असें अनुमान बांधलें. राखालचें असें रुसणें हें कांहीं त्याच्या सोईचें नव्हतें. त्यामुळें कांहींही करून राखालला प्रसन्न करून घेणें त्याला आवश्यक होतें.

चारपांच दिवसांनीं अघोरनाथ सायंकाळीं राखालकडे आला आणि त्याला म्हणाला,

'ओ हो ! राखालमोशाय ! आज चार पांच दिवस प्रकृति ठीक नव्हती वाटतें ? दिसतेंच आहे ! औषध घेतलें कीं नाहीं ? बरें. तर काय म्हणत होतों मी ? हो ! आज रात्रीं गाण्याची बैठक आहे घरीं. कलकत्त्याचा प्रोफुल्ला रॉय आला आहे. असा छान गातो म्हणून सांगू ! त्यानें मुळीं स्पष्टच सांगितलें आहे, राखालमोशाय समोर असतील तर आपण गाऊं ! खरेंच आहे ! दर्दी मनुष्य भेटला, कीं गाणारालाही स्फुरण चढतें. तेव्हां प्रकृति ठीक नसली, तरी आलें पाहिजे स्वेटर, मफलर, चांगला बंदोबस्त करून या म्हणजे झालें. मी बाकी सगळी व्यवस्था करून ठेवली आहे.'

राखाला स्वतःला गाण्यांतला तज्ज्ञ समजत असे. त्याला स्तुतीची नशा चढली आणि तो प्रसन्न होऊन म्हणाला,

'हो हो ! येईन म्हणजे काय ! अवश्य येईन मी.'

जरा हळू आवाजांत इकडे तिकडे पहात अघोरनाथ म्हणाला, 'बरें कां !. आज सात ताराछाप असली फरेंच माल पैदा करणार आहें. पैसे थोडे कमी पडताहेत. आहेत का हाताशीं ?'

राखाल पटकन् उठून घरांत गेला आणि दहा दहाच्या दोन नोटा आणून अघोरनाथाच्या हातीं देत म्हणाला,

'पुरतील का एवढे ?'

'किती ? वीसच आहेत का ? बरें, असूं दे. मी पाहून घेईल बाकीचें. पण रात्रीं आठ वाजतांच या. विसरूं नका बरें का !'

अघोरनाथ गेल्यावर अंबिका बाहेर आली आणि म्हणाली,

'कोण होतारे ?'

'अघोरनाथबाबू होते.'

'कशाला आला होता मेला ?'

'ऊं ! तुला कीं नाहीं आई, माझा प्रत्येक मित्र दुर्गुणांनीं बुजबुजलेला दिसतो ! ते आले होते मला रात्रीं गाण्याला बोलवायला. कलकत्त्याचे रेडिओस्टार आले आहेत. माझ्याशिवाय गाणार नाहीं आहेत ते ! लोक माझी किंमत काय करतात ! आणि तुम्हांलाच मी भार झालों नुसता !'

'उगीच कांहीं तरी बोलूं नकोस राखाल ! मी केव्हां रे तुला भार म्हटलें ? किती तुझ्याकरतां कष्ट केलें, किती रात्रीं जागलें—'

आणि मग अंबिकेनें रडण्याचें दळण घातलें. राखाल तिच्याकडे लक्ष न देतां निघून गेला.

त्या रात्रीं अघोरनाथानें राखालला पुनः एकदां 'ठीक' केलें, आणि मग त्यांचा क्रम पूर्ववत् सुरू झाला. मात्र राखालनें तळ्यावरचा संग कांहीं अघोरनाथाला सांगितला नाहीं. अघोरनाथानेंही फारसा आग्रह केला नाहीं.

त्या सबंध वर्षांत राखालला कितीतरी मुली सांगून आल्या. पण राखालचा बाजारभाव अजून वाढता असल्यानें अंबिका नव्या नव्या गिऱ्हाइकांची वाट पहात राहिली. राखाल तिच्यावर जळफळत असायचा. पण किती केलें तरी तो दुर्बलाचा राग होता !

गिरिबालेचें आणि करुणेचें बोलणें झाल्यावर पांच सहा दिवसांची गोष्ट. सायंकाळीं साडेपांच वाजतां राखाल आपला मासे धरायचा गळ आणि पिशवी घेऊन तळ्यावर जायला निघाला. हिंवाळ्याचे दिवस असल्यामुळें तळें तुडुंब भरलेलें होतें. कमळांचीं भल्या मोठाल्या ताटाएवढालीं गोल पानें सबंध तळ्यांत पसरलीं होतीं. कुठें कुठें दहावीस कमळांचे अर्धवट उमललेले कळे वाऱ्याच्या झुळकीसरसे डुलत होते. तळ्यावरची बायांची गर्दी कमी होत होत जवळ जवळ नाहींशी झाली होती.

राखाल तळ्यावर पोंचला आणि तो आपल्या तळ्यांत बांधलेल्या माचीवर जाऊन बसला. त्यानें पिशवींतील भिजविलेली कणिक बाहेर काढली आणि तिची गोळी गळास लावून गळ पाण्यांत सोडला. छडी मांडीखालीं धरून त्यानें सिगरेट पेटविली आणि मग छडी हातांत घेऊन बसून राहिला.

थोड्या वेळानें गळावर लावलेलें मोरपीस बुडतेंसें पाहून त्यानें झटक्यांत गळ उचलला. पण तो झटका हाताला जाणवण्यापलीकडे दुसरा लाभ त्याच्या पदरांत पडला नाहीं. माशांनीं त्याला साफ फसविलें होतें. परत गळास कणिक लावून त्यानें गळ पाण्यांत सोडला.

सुमारें अर्ध्या तासानें त्यानें सहज गांवाकडे पाहिलें तों गिरिबाला हेमवतीसह हातांत घागरी घेऊन येतांना त्याला दिसली. तळ्यावर दुसरें कोणी नव्हतें. क्षणभर त्याचें अंग शिरशिरलें. पण त्यानें गिरिबालेकडे लक्ष द्यायचें नाहीं, असें ठरवून गळाकडे ध्यान लाविलें. तरी थोड्या वेळानें त्याची दृष्टि त्याचें न ऐकतां गिरिबालेकडे वळली. तिच्याकडे लक्ष द्यायचें नाहीं,

याचा अर्थ तिच्याकडे बघायचें नाहीं, असा मुळींच नव्हे, असें आपल्या मनाचें समाधान करीत राखाल तिच्याकडे बघूं लागला.

गिरिबाला व हेमवती पाणवठ्यावर आल्या. पाणवठ्यापासून राखालची माची चाळीस पावलांवर होती. गिरिबाला थोडा वेळ पाणवठ्यावर उभी राहिली. तिनें राखालला पाहिलें तिचें अंतःकरण धडधडूं लागलें. तिनें चहूंकडे बघितलें. गांवांतून कोणी तळ्यावर येतेंसें तिला दिसलें नाहीं. हिंवाळ्याचे दिवस असल्यानें सूर्य लवकर मावळत असे. संधिकाल होऊं लागला होता.

मग गिरिबालेनें निश्चय केला आणि ती घागरी तिथेंच ठेवून हेमवती-सह राखालकडे चालूं लागली. राखालच्या आश्चर्याला सीमा राहिली नाहीं. पाणवठा आणि राखालची माची, यांमध्यें जें आंब्याचें झाड होतें, त्याच्या-जवळ येऊन गिरिबाला थांबली. तिथें तिनें हेमवतीच्या कानांत कांहीं तरी सांगितलें. हेमवती एकटीच राखालच्या माचीजवळ आली आणि आपले तिरळे डोळे राखालवर स्थिर करीत त्याला म्हणाली,

'राखालबाबू, तुम्हांला दीदी बोलावते आहे.'

अधिकच आश्चर्यचकित होत राखाल म्हणाला,

'मला ?'

'हो ना ! तुम्हांलाच.'

पटकन् आपला गळ काढून माचीवर ठेवीत राखाल उठला आणि तिच्या मागोमाग आंब्याजवळ पोंहोचला.

'बेटी हेमू ! आपल्या घागरी कोणी नेणार तर नाहीं ना ? जा तर बेटी ! मग संध्याकाळीं मी तुझ्या भावलीला छानदार साडी देईन !'

'नक्की देशील ना ? नाहींतर फसवशील !'

'छे ! मुळींच नाहीं फंसवायची. जा तर बेटा !'

हेमवती त्या आनंदांत उड्या मारीत पाणवठ्याकडे गेली.

राखाल गिरिबालेकडे न्याहाळून पहात तिला म्हणाला,

'मला बोलावलें होतें तुम्हीं ?'

'हो.' गिरिबालेनें तळ्याकडे पहात उत्तर दिलें.

'कां ?'

गिरिबाला कांहीं बोलली नाहीं. थोड्या वेळानें राखाल म्हणाला,

'कशाला बोलावलें मला ? अन् ती तुमची तोंडाळ मैत्रीण कुठें आहे ? तिला नाहीं आणलेंत बरोबर ? म्हणजे दोघी मिळून चांगलें भांडतां आलें असतें ! पण या पाळीला कांहीं मी आलों नाहीं तुमच्याशीं बोलायला ! हो ! आपला स्वभाव आहे असा ! एकदां कुणीं नको म्हटलें, कीं मग त्याच्याशीं बोलायचें नाहीं. अगदीं आईशींसुद्धां—'

एकदम त्याच्याकडे दृष्टि वळवीत गिरिबाला दीनवाण्या स्वरानें म्हणाली,

'मी एक प्रार्थना करूं का तुम्हांला ?'

'कसली प्रार्थना ?'

'एवढी भीक घाला मला ! तें मागचें सगळें विसरून जा !'

'काय ? सगळें विसरून जाऊं ?'

'हो, सगळें.'

'म्हणजे—'

'हो. तुम्ही तळ्यावर मला भेटण्याकरितां आलां होतात आणि मग मी तुम्हांला अविचारीपणें बोललें, तें सगळें ! क्षमा करा मला. करवेल का एवढी कृपा ?'

'पण तूं तर त्या वेळीं म्हणाली होतीस कीं माझ्याशीं लग्न करण्याचा या जन्मीं तरी तुझा विचार नाहीं म्हणून !'

'होता ! तेंही पण विसरून जा ! मी वेडेपणानें तें तसें बोललें ! विचार केला नव्हता मीं ! मूर्खपणा झाला माझा ! विसराल का तें ? करतां येईल का मन एवढें मोठें ?'

'तें सगळें साफ विसरून जाऊं म्हणतेस ? आणि परत—'

'हो ! मला पदरांत घ्या !'

'काय म्हणतेस तरी काय ? खरोखरच का तूं माझ्याशीं लग्न करायला तयार आहेस ?' राखालनें खुशींत येऊन एक सिगरेट पेटवीत म्हटलें.

'हो, खरोखरीच.' गिरिबाला पदर अंगावर सारखा करीत आणि खालीं बघत म्हणाली.

'मी खरोखरीच आवडतों तुम्हांला ?'

गिरिबालेला एवढें खोटें एकदम बोलवलें नाहीं. तिच्या मनांतून एक चमक

उठून क्षणांत नाहींशी झाली. एकदां तिला वाटलें, कीं खरें बोलावें. पण तिनें संयमानें खरें बोलण्याची इच्छा दाबली आणि म्हणाली,

'हो. मी तुमची दासी होईन. तुमची सेवा करीन मी. तुम्ही प्रसन्न रहाल, अशी चिंता करीन. मग घ्याल का मला पदरांत ?'

'हो ! खुशीके साथ !' आनंदून जाऊन राखाल म्हणाला.

गिरिबालेला एक ओझें डोईवरून उतरल्यासारखें वाटलें. क्षणभर ती स्तब्ध राहिली. पण पुन: एका शंकेनें तिच्या मनांत अंधारून आलें.

'पण तुमच्या आई हो म्हणतील का ?'

'माझी म्हातारी ? ऊं: ! तिची चिंता नको करूंस तूं ! तूंच तयार झालीस, हें किती बरें झालें ! त्याच वेळीं तूं हो म्हणतीस तर नसतें का भागलें ? आतांपर्यन्त आपलें लग्न होऊन — ! जाऊं दे ! मी असा खूष झालों आहें या वेळीं !'

राखाल गिरिबालेकडे लालसापूर्ण दृष्टीनें पहात म्हणाला. गिरिबालेनें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

अंधार पडत चालला. हेमवती गिरिबालेला हांक मारीत म्हणाली,

'ए दीदी, चल कीं ग !'

'हो आलें. मग मी जाऊं ?' गिरिबालेनें राखालला विचारलें.

'जातेस ? थांबना थोडी !' असें म्हणत राखालनें एक पाऊल पुढें टाकलें. तिचा हात तो आपल्या हातीं घेऊं लागला. तो पुढें सरलेला पाहून गिरिबाला पटकन् चार पावलें मागें सरली आणि निषेधदर्शक स्वरांत म्हणाली,

'ऊं हूं ! आत्तां नाहीं ! देवांब्राह्मणांसमक्ष लग्न झाल्यावर मी तुमचीच होणार आहें. असा उतावीळपणा काय कामाचा बरें ?'

थोडा झेंपावून जाऊन राखाल म्हणाला,

'बरें आहे. असूं दे. तर आतां केव्हां भेटशील ?'

'केव्हां भेटूं ? तुम्ही आईवडिलांना विचारून केव्हां सांगाल ?'

'उद्यां सांगितलें तर चालेल ?'

'उद्यां सांगाल ?'

'हो. आहे काय म्हणा त्यांत. साफ सांगेन म्हातारडीला, मी गिरि-

बालेशीं लग्न करणार आहें म्हणून. बाबूजी तर माझ्या बाहेर जायचेच नाहींत. म्हातारीच तेवढी थोडीशी टुरटुर करील आणि राहील गप्प ! '

' पण जर त्या ' हो ' न म्हणाल्या तर ? ' परत गिरिबालेच्या शंकेनें डोकें उचललें.

' ती नको काळजी करूं तूं. मी तें सगळें ठीक करतों. तर उद्यां कुठें भेटूं ? '

' इथेंच. याच वेळीं येतें मी. '

गिरिबाला सपाट्यानें निघाली. राखाल अतृप्त मुद्रेनें तिच्याकडे पहात राहिला. तो कांहीं अंतःकरणाचा दुष्ट नव्हता. पण थोडा मूर्ख होता आणि थोडा लाडावलेला होता. त्याचें मन अनिर्वचनीय आनंदानें भरून आलें. बराच वेळ तो गिरिबालेकडे पहात उभा राहिला.

गिरिबाला हेमवतीजवळ आली आणि तिला म्हणाली,

' हेमू, चल बेटा ! पटकन् घे घागर भरून. '

' काय करीत होतीस ग दीदी एवढा वेळ ? किती उशीर झाला ! '

घागर भरून कमरेवर घेत आणि हेमवतीच्या डोक्यावर हात ठेवीत गिरिबाला म्हणाली,

' आपली आई अन् बाबूजी आजारी पडतात ना, त्यांच्याकरतां औषध मागत होतें. '

' हे राखालबाबू औषध देतात ? '

' हो. चांगलें छान औषध देतात ते. '

' पण मग गेल्या वर्षी तूं यांच्याशीं भांडलीस ग का ? '

' उगीच. माझी शहाणी बाई ती ! मागचें जसें घरीं सांगितलें नाहींस ना, तसें आजचेंही सांगायचें नाहीं बरें. मग मी छानदार मणी देईन तुझ्या भावलीकरतां ? '

' नाहीं सांगायची. पण मग केव्हां देशील ? '

' उद्यां देईन. '

' पण दीदी, हे राखाल डॉक्टर आपल्या घरीं कां नाहीं ग येत ? '

' येतील. पण लक्षांत राहील ना तुझ्या ? एक शब्दही कुठें बोलायचा नाहीं

यांतला. कुणीं विचारलें कीं कां उशीर झाला, तर सांगायचें करुणा भेटली होती, तिच्याशीं दीदी बोलत होती म्हणून.'

'अन् मग त्या डॉक्टरांना बोलावलें, हेंही मी नाहीं सांगायचें? आईला-सुद्धां?'

'ऊं हूं! सांगितलेंस तर मग मी कांहीं देणार नाहीं तुला.'

'हें ग काय, दीदी?' गाल फुगवून हेमवती म्हणाली, 'मीं कधीं नाहीं ऐकलें तुझें?'

'नाहीं ग. माझी बाई ती! शहाणी आहे हो! कधीं माझ्या बाहेर जात नाहीं!' असें म्हणत गिरिबालेनें आपला हात परत हेमवतीच्या डोक्यावर ठेवला. तें बालमन तेवढ्यानेंच हरखलें आणि परत आपली गोष्ट पक्की करून घेण्याच्या उद्देशानें ती गिरिबालेला म्हणाली,

'अन् मग दीदी, भावलीच्या गळ्यांत घालायला त्या पोतेंत हिरवे मणी देशील?'

'हो, देईन हो!'

त्या दोघी घरीं पोंचल्या, तोंवर अंधार पडला होता. हरिमती त्यांची वाट पहात होती. त्या पोंचल्याबरोबर हरिमती म्हणाली,

'काय करीत होतां ग इतका वेळ? केव्हांच्या गेल्या होतां तळ्यावर?'

पटकन् हेमवतीनें सांगितलें, 'किनई आई! करुणा भेटली होती वाटेंत. दीदी बोलत उभी राहिली तिच्याशीं.'

आपलें काम करून टाकून हेमवतीनें कृतार्थ दृष्टीनें आपल्या दीदीकडे पाहिलें. तिच्याकडे सानुग्रह दृष्टिक्षेप टाकीत गिरिबालेनें बोलणें पुढें चालविलें,

'आतां लवकरच जाईन म्हणाली सासरीं. झाला महिना तिला येऊन.'

सासरचें नांव ऐकतांच हरिमतीचें दुःख पुनः नवें झालें. ती कपाळावर हात देत म्हणाली,

'करुणा तुझ्यापेक्षां वर्षानें लहान. झालें, पोरींचीं लग्नें उरकलीं, सासर-माहेर करायलाही लागल्या. चार दिवसांनीं बाळंतपणाकरितां घरींसुद्धां येईल! आमच्याच नशिबानें कां हाय खाल्ली तें देव जाणे! कुठें बिचारें लपून बसलें आहे कुण्या गिरिकपाटांत जाऊन!'

गिरिबाला मनांतल्या मनांत म्हणाली,

‘ शोध करतें आहें तर खरी त्या नशिबाचा. काय होईल तें पाहायचें आतां ’

इकडे गिरिबाला दृष्टिआड झाल्यावर राखाल शुद्धीवर आला. तो आज आनंदाच्या शिखरावर आरूढ होता. लगेच त्यानें ठरविलें कीं आतां कुठेंतरी नोकरी पाहिली पाहिजे. बाबूजींच्या जिवावर जगण्यांत कांहीं मजा नाहीं. किती चतुर आहे गिरिबाला ! मी हात धरूं लागलों, तर नाहीं म्हणाली ! म्हणे देवांब्राह्मणांसमक्ष ! वा वा ! खूप शहाणी आहे बरें का ! याला म्हणतात पोरगी ! नाहींतर दुसरी एखादी असती, तर ना न म्हणती.

‘ ही बातमी कुणाला जाऊन सांगावी बरें ? आईला ?

‘ ऊं हूं ! लगेच म्हातारडी खायला धांवेल. केव्हां तरी उद्यांपर्यंत सांगितलीच पाहिजे तिला. पण लगेच नको.

‘ मग अघोरनाथांना ? ’

त्याच्या मनांत अघोरनाथाविषयीं लहानसा किंतु याच पाळीला निर्माण झाला. गिरिबालेच्या सहवासामुळें, तिच्या विनयशील, मर्यादाशील स्वभावामुळें त्याच्या अंगी माणुसकी निर्माण होऊं पहात होती. त्याला अघोरनाथाची दृष्टि चांगली नाहीं, हें आतांच जाणवलें. तो स्त्रियांकडे कोणत्या दृष्टीनें पहातो आणि त्यांचेविषयीं काय बोलतो, हें थोडें थोडें राखाललाही माहीत होतें.

पण तो तेवढा एकच क्षण. दुसऱ्या क्षणीं जेव्हां त्याला ही बातमी सांगण्याजोगा अन्य कोणी मित्र आढळेना, तेव्हां मग त्यानें अघोरनाथाकडेच जायचें ठरविलें. एवढी आनंदाची वार्ता त्याच्या पोटांत मावेना.

तो परत एक सिगरेट पेटवून शीळ घालीत आपल्या माचीकडे वळला. त्याला तीन मासे मिळाले होते. ते मासे, आपला गळ, पिशवी, हें सगळें सामान त्यानें उचललें. आज तो उदार झाला होता. आपल्याजवळ जें काय असेल तें सगळें जरी कोणीं मागितलें, तरी देऊन टाकायची त्याची तयारी होती.

त्या माची शेजारींच एक धीवराचें पोर नुकतेंच येऊन पाण्यांत जाळें

टाकण्याच्या तयारींत होतें. सायंकाळच्या कालवणाकरितां ही त्याची धडपड चालली होती. त्याला पाहून राखाल म्हणाला,

'ए, इकडे ये.'

त्या पोराला आश्चर्य वाटून तें तसेंच उभें राहिलें.

'इकडे ये म्हणतों ना ? हे घे मासे ! जा. घरीं जाऊन आपल्या आईला म्हणावें, कालवण कर ! '

तें पोर भीत भीत राखालच्या जवळ आलें. खरोखरीच हातीं मासे पडलेले जेव्हां त्यानें पाहिलें तेव्हां त्याला साश्चर्यआनंद झाला. एवढा उदार मनुष्य त्यानें आजपर्यंत पाहिला नव्हता. हातीं मासे आल्याबरोबर त्यानें घराकडे धूम ठोकली. न जाणों ! या बाबूनें मासे परत मागितले तर ?

आपल्याच आनंदांत मग्न झालेला राखाल घरीं येऊन पोंचला. आईशीं झालेल्या प्रकाराविषयीं एक शब्दही न बोलतां त्यानें जेवण उरकलें आणि तो पायांत स्लीपर्स घालून अघोरनाथाकडे जाऊन हजर झाला.

• • •

## ७

अघोरनाथाकडे कधीं कधीं एक पाहुणा आलेला लोकांना दिसे. कधीं तो पाहुणा कानपुरी नबाबासारखी तलम पांढरी टोपी, मलमलचा सदरा आणि पाजामा, अशा वेशांत येई. कधीं कधीं गोंडेदार उंच काळी फर कॅप, कोट, पॅन्ट, हातांत एक बारीकशी छडी, अशा वेशांत येई. तो डोळ्यांत सुरमा घालीत असे. आपल्या रेखीव मिशांना नेहमीं पीळ भरायची त्याची संवय होती. त्याचें नाकही रेखीव होतें. पण त्याचे सुरमा घातलेले डोळे मात्र एखाद्या छकट्याच्या डोळ्याप्रमाणें भिरभिर इकडे तिकडे हिंडत असत. त्याच्या कानांत नेहमीं उंची अत्तराचे फाये ठेवलेले असत.

आजही तो अघोरनाथाकडे पाहुणा आला होता. त्याच्याकरितां आज

एका कोंबडीला बळी पडावें लागलें होतें, हें अनुमान संध्याकाळीं अघोरनाथाच्या घराबाहेर उडणाऱ्या पिसावरून कोणीही काढलें असतें.

सायंकाळीं साडेसातला प्रथम ' पान ' व नंतर यथास्थित जेवण उरकल्यावर ते दोघे अघोरनाथाच्या झोंपायच्या खोलींत दारें बंद करून बसले.

अघोरनाथाकडे जेवण बनविण्याकरितां एक दरभंग्याचा पंडत होता. पण हें असें कांहीं विशेष असलें, म्हणजे त्याला फक्त भात व इतर भाज्या बनविण्यास सांगून अघोरनाथ शेष पदार्थ स्वत: बनवीत असे. तो पंडत हें कांहीं होण्याच्या अगोदरच आपलें जेवण उरकून निघून गेला होता.

खोलींत गेल्यावर तो पाहुणा तक्कयाशीं बसत म्हणाला,

' अरे यार अघोरनाथ ! ती बनारसची गुडाखू संपली काय ? असली, तर ती घाल हुक्कयांत ! वा: ! काय लुत्फ् आहे तिला ! '

' साहेबजी ! ती केवळ दशाश्वमेध घाटावरच्या एकाच दुकानांत मिळते. रुपया तोळा घेतो तो अलीकडे. पण काय माल आहे ! '

' उफ्फ् ! दिल खुष होतो यार ! '

अघोरनाथानें हुक्कयांत एका डब्यांतली गुडाखू घातली व त्यावर निखारे ठेवीत त्याची नळी पाहुण्याकडे केली. त्यानंतर शेजारीं बसत तो म्हणाला,

' नूर, किती दिवस तुझी वाट पहात होतों. बरें, कार्ड टाकावें एखादें, तर तूं म्हणजे अठरा मशिदींतला फकीर ! कुठें पत्र घालावें तुला ? '

' अरे बाबा ! तुझें बरें आहे. एका ठिकाणीं आपला रुबाब जमवून आहेस तूं ! पण इथें सारखे पोलिस मागावर असतात ! मी काय करतों, कुठें जातों हें सगळें पोलिसांच्या नजरेंतून फारसें सुटत नाहीं. आतां मी त्यांच्या मामूकडला खिमा जेवला असल्यामुळें त्यांच्या हातीं लागत नाहीं, ही गोष्ट वेगळी. मी कशाला पाहिजे होतों तुला ? '

' पैशांची तंगाई चालली आहे रे जरा ! बोलपूरच्या रुस्तुमजी फरदोसीचें बिल झालें आहे साडे आठशें रुपये ! तो सारखा शंख करीत असतो माझ्या नांवानें. गेल्या पाळीचे पैसे नाहीं आले तुझ्याकडून ! '

' गेल्या पाळीचे ? ' नुरुद्दीन हंसत म्हणाला, ' अरे यार ! खूप माल पाठविला होतास तूं ! साली चार सहा दिवसांतच तर पळून गेली ! तिच्यामुळें पोलिसचाही थोडासा त्रास सोसावा लागला मला आणि मुन्नीजानला! तिचे कसले पैसे मागतोस ? '

'वा: ! आपलें तर अगोदरच ठरलें होतें ! आम्हीं इकडून कच्चा माल पाठवायचा आणि तो ताब्यांत आला कीं मग त्याला दुरुस्त करण्याचे जिम्मेदार तुम्ही ! सगळ्याच का तुमच्या जातीच्या असतात ? त्यांना घर असतें, दार असतें, नवरे असतात, भाऊ, बहिणी, सगळें असतें. या सगळ्यां-तून शिताफीनें उठवून तुमच्या स्वाधीन करण्यापुरती जबाबदारी आमची. पुढें तुमचें तुम्ही पाहून घ्या ! पळून गेली त्याला मी काय करूं ? तुम्ही तिच्यावर चांगला पहारेकरी ठेवला नसाल !'

'तें कांहीं नाहीं भैया ! आपल्याला पैसे मिळाले पाहिजेत, सांगून ठेवतों. तिला कलकत्त्याला पाठविण्याकरतां मला जवळजवळ पन्नास पाऊणशें रुपये खर्च करावे लागले.'

'बरें यार ! पैसे पैसे काय करीत बसलास तूं ! तूं माल पाठवितो आहेस, तोंवर पैशाला काय कमी ? पैशांची चिन्ता करूं नकोस. गेल्यावरो-बर पाठवून देतों. तें असूं दे. तर आतां मी आलों कशाकरितां तें नाहीं विचारलेंस ?'

'मला काय माहीत कशाकरितां तें ?'

'एखादा चांगला नग पाहिजे. तरतरीत, हुषार ! एक बडे शेटजी आहेत, लोखंडाचे व्यापारी. खूप श्रीमंत आहे. त्याची मागणी आहे. आहें कुठें ? इथे नसेल, तर पडोसच्या गांवांत ! पैसे कितीही खर्च झाले तरी हरकत नाहीं; पण माल चांगला —'

खट्‌खट् —

दारावर कुणीं आवाज केला.

'कोण आहे ?'

'मी आहें राखाल. झोंपलांत काय, अघोरबाबू ?'

'हा गेल्यावर बोलूं आपण.' हळू शब्दांत नुरुद्दीनला बजावीत अघोरनाथ उठला आणि त्यानें जाऊन दाराची कडी काढली.

'या राखालमोशाय !'

'मी म्हटलें, एवढ्या लवकर कसे झोंपलांत ! कुणी पाहुणे आले आहेत वाटतें ?'

'हो. हे कलकत्त्याचे नुरुद्दीन, एक बडे व्यापारी. ओळख झाली होती तुमची एकदां !'

'हो.' राखाल असंतुष्ट नजरेनें नुरुद्दीनकडे पहात म्हणाला. अशी आनंदाची वार्ता सांगतांना नुरुद्दीनसारखा त्रयस्थ तिथें उपस्थित असावा, हें राखाललला आवडलें नाहीं.

'या ना. बसा.' अघोरनाथ म्हणाला.

'जरा थोडेंसें काम होतें.' राखाल म्हणाला.

'कांहीं प्राइवेट ? गुप्तगू आहे कांहीं ? मी न ऐकावी अशी ?' नुरुद्दीन दांत काढीत म्हणाला.

'तसें कांही नाहीं. पण अघोरबाबू आपण बाहेर जाऊं या.'

'आम्ही आत्तां येतों हां, नुरुद्दीन !' असें म्हणत अघोरनाथ राखालबरोबर घराबाहेर पडला.

अघोरनाथाचें घर खाणीच्या आवारांतच होतें. त्या घराच्या पलीकडे खाण खणतांना निघालेल्या दगडी मुरुमाचें एक टेकाड होतें. त्या टेकाडावर हे दोघे जाऊन बसले. खाणीच्या ऑफिसासमोर लावलेल्या बत्तीचा अंधुक उजेड तिथपर्यंत जाऊन पोंचत होता.

'कांहीं विशेष आहे ?' अघोरनाथानें बसल्यावर विचारलें.

'तुम्हांला एक आनंदाची बातमी सांगायची आहे आणि थोडासा सल्लाही विचारायचा आहे.'

'जरूर ! जरूर !'

'माझें लग्न ठरलें !'

'ओ हो ! छान छान ! पण मिठाईवांचून ही बातमी जरा फिकी वाटते.'

'थांबा तर खरें. ठरलें म्हणजे आम्हीं दोघांनीं ठरविलें.'

'तुम्हीं दोघांनीं म्हणजे कुणीं कुणीं ?'

'तेंच तर सांगायचें आहे मला. मीं मागें एकदां तिला विचारलें होतें.'

'पण तिला म्हणजे कुणाला ?'

'अहो, तुम्हींच तर सुचविलें होतेंत मला ! बनबिहारीबाबूंची मुलगी—'

'ती गिरिबाला ? ती नखरेल पोरगी ?'

'ऊं हूं ! नखरेल म्हणूं नका तिला. फार चांगली आहे ती. किती मर्यादाशील ! किती सभ्य ! तर मी तिला विचारलें होतें तेव्हां ती मला नाहीं म्हणाली होती. पण आज संध्याकाळीं तिनें माझी क्षमा मागितलीन् ! तें सगळें विसरून जा म्हणाली. आणि मी तुमच्याशीं लग्न करायला तयार आहें असेंही म्हणाली.'

'अरे कुठें फसली तर नाहीं ती ? म्हणून पडत असेल तुमच्या गळ्यांत !'

'हट् ! भलती शंका घेऊं नका तिच्याविषयीं.'

'नाहीं बाबा, आपल्यांत म्हण आहे ना, स्त्रिया चरित्रं देवा न जानाति ! बायांवर कधींही विश्वास ठेवूं नये शहाण्यानें.'

'छे छे ! तुम्ही असें कांहीं बोलूं नका, अघोरनाथ ! मला आवडत नाहीं तें. आज संध्याकाळपासून तर मला ती किती चांगली वाटायला लागली आहे ! मी तिच्या लायक आहें कीं नाहीं, अशीही शंका चाटून गेली मला. तर मग आमचें दोघांचें ठरलें आहे.'

'मग द्या उडवून बार ! मिया—बिब्बी राजी झाल्यावर काजी नसला तरी चालतो !'

'अहो, पण एक लहानशी अडचण आहे ना मध्यें !'

'कसली अडचण ?'

'अडचण अशी आहे, कीं आमच्या आईचा स्वभाव तुम्हाला माहीत आहे. बाबूजी कांहीं तिच्या बाहेर नाहींत. जास्तींत जास्त हुंडा मिळावा म्हणून तर तिनें माझें लग्न एव्हांपर्यन्त लांबविलें. बनबिहारीजवळ कांहीं पैसे नाहींत तर म्हातारीची समजूत कशी काढायची ?'

'खरोखरच प्रश्न आहे बुवा ! जरा थांबा. मला थोडा विचार करूं द्या. उद्यां सकाळीं याल का तुम्हीं ? म्हणजे रात्रभर मी विचार करून ठेवीन.'

'सकाळीं म्हणजे पहांटे ?'

'हो. पहांटे आलांत तरी चालेल. मला हांक मारून उठवावें लागेल तुम्हांला. तुम्हांला तर झोंपच नाहीं यायची म्हणा !'

हंसत हंसत अघोरनाथाच्या पाठीवर थाप मारीत राखाल उठला आणि म्हणाला,

'मग मी येतों उद्यां पहांटे.'

‘ हो. जरूर या. तोंपर्यंत म्हातारीला हें सांगूं नका. ’

‘ नाहीं सांगत. ’

राखाल गेल्यावर अघोरनाथ उठला. त्याच्या डोक्यांत विचारांचें थैमान सुरू झालें. त्याची नजर हिंस्त्र दिसूं लागली. तो घरांत शिरला, तेव्हां नुरुद्दीन बसल्या बसल्या पेंगत होता. दाराचा आवाज ऐकून तो जागा झाला आणि म्हणाला,

‘ संपली गुफ्तगू ? काय म्हणत होता ? ’

‘ कांहीं खाजगी भानगड होती. ’

‘ बरें तर मीं सांगितलेल्या कामाचें काय ? ’

‘ पाहीन. तूं आतां तर झोंप. ’

अघोरनाथानें त्याच्याकरितां एक गादी घातली. तिच्यावर नुरुद्दीन झोंपला. आपलें अंथरुण पसरून त्यावर अघोरनाथहि पडला.

त्याला बराच वेळ झोंप येईना. विचार करतां, एक भयंकर कल्पना त्याच्या मनांत चमकली. तो तडकन् उठून बसला. त्यानें एक सिगारेट पेटविली, आणि तिच्या धुराची वलयें निर्माण करीत तो विचार करूं लागला. धुराच्या लांबीबरोबर त्याच्या विचारांची लांबीही वाढूं लागली.

थोडया वेळानें मनाशीं एक निश्चय ठरवून त्यानें अर्धवट जळलेली सिगारेट चुरडून टाकली आणि नुरुद्दीनला [illegible] करीत तो म्हणाला,

‘ ऐकलेंस, नुरुद्दीन ? ’

नुरुद्दीन एकदम दचकून उठला आणि घाबरून जाऊन म्हणाला,

‘ कोण आहे ? ’

‘ अरे, मी आहें अघोरनाथ ! ’

‘ अरे क्या यार ! मैं तो ऐसा डर गया ! मला वाटलें. पोलिसच आले ! ’ नुरुद्दीन हंसत म्हणाला,

‘ पुलीस कशाला येईल इथें मरायला ? तर मी तुला सांगत होतों, तुला माल देतों मी. अगदीं खूष होशील असा. ’

‘ केव्हां ? ’

‘ चारसहा दिवसांत. ’

आणि मग त्यानें नुरुद्दीनला आपली योजना समजावून सांगितली. किती

पैसे लागतील हेंही सांगायला तो विसरला नाहीं. सगळें निश्चित ठरल्यावर दोघेहीजण झोंपीं गेले.

राखालला खरोखरच रात्रभर झोंप आली नाहीं. सिगारेटचें एक पाकीटच्या पाकीट त्यानें रात्रभरांत संपविलें. पहांटे साडेपांचलाच तो उठला आणि शौचास जाऊन आला. मधुबाबू पहांटे उठून शिवानंदांची अद्वैतमाला वाचीत असत. ते राखालला एवढ्या लवकर उठलेला पाहून म्हणाले,

'बेटा राखाल, आज फार लवकर उठला तूं ?'

'उगीच, बाबूजी. जरा फिरून येतों.'

'जा बरें बेटा! कान नीट बांधून जा. चांगलें असतें पहांटे उठणें. आत्मानात्म विचार करायला पहांटचीच वेळ सांगितली ऋषि रामकृष्णांनीं. रोज उठत जावें बेटा!'

राखाल घरांतून बाहेर पडला, तो सरळ अघोरनाथाकडे गेला. अनेक हांका मारल्यावर मग कुठें अघोरनाथ जागा झाला. तो दार उघडून बाहेर आला आणि म्हणाला,

'थांबा, मोशाय. चूळ भरून येतों.'

थोड्या वेळानें टॉवेलनें तोंड पुशीत तो बाहेर आला आणि राखालला घरामागें घेऊन गेला. तिथें राखालच्या कानाशीं फुसफुसत तो म्हणाला,

'ऐकलेंत, मोशाय, मी रात्रभर विचार केला. पण तुमची ती महालोभी, कृपण म्हातारी ऐकेल, असें कांहीं मला वाटत नाहीं. तुमचे मधुबाबूजीही त्याच जातीचे आहेत. म्हणून त्यांना ही गोष्ट सांगून कांहीं लाग लागेलसें मला कांहीं वाटत नाहीं.'

'मग ?' चिंतातुर मुद्रेनें राखाल म्हणाला.

'एक युक्ति आहे. तेवढी केलीत, तरच हें जमण्यासारखें आहे.'

'काय ? सांगा ना!'

'सांगतों. युक्ति अशी, कीं तुम्ही दोघांनीं बाहेर कुठें तरी जाऊन लग्न करून यायचें. एकदां लग्न लागल्यावर मग कांहीं तुमची म्हातारी तुम्हांला घराबाहेर काढीत नाहीं.'

'हो! आहे खरी युक्ति. पण गिरिबाला ऐकेल का ?'

'तिला सांगायचें, कीं मी दिवसभर माझ्या आईशीं भांडलों, केवळ तुझ्या करतां. एवढें हें सगळें मी तुझ्याकरतां केलें म्हणजे मग ती तयार होईल.'

'खोटेंच सांगूं तिला ?'

'तुम्हांला खरेंखोटें पहात बसायचें आहे, कीं आपलें काम साधायचें आहे ?'

'नाहीं, नाहीं. मी करीन तिला तयार. पण बाहेर म्हणजे कुठें जायचें ?'

'अरे, मी आहें ना ! तुमचा मित्र म्हणवतों, तो कशासाठीं ? जर तुमचें एवढेंही काम मी करूं न शकलों, तर मग मित्र कशाचा ? तुम्ही केवळ तिला तयार करा आणि पुढलें सगळें माझ्यावर सोंपवा तुम्ही .माझा तरी विश्वास वाटतो कीं नाहीं तुम्हांला ?'

'हो, हो ! वा ! हें असें काय बरें ? म्हणून तर तुमच्याकडे आलों ना ! पण अघोरनाथबाबू कोणी नांवें तर नाहीं ठेवायचा ना ?'

'ठेवीलही कदाचित्. म्हणून हें सगळें गुप्त ठेवायचें. कुण्णाला कळूं द्यायचें नाहीं. एकदां लग्न झाल्यावर मग कोण बोलतोय् म्हणा ! दांत पाडून टाकीन एकेकाचे ! गिरिबाला जर हो म्हणाली, तर मग आईला सांगा, जरूरीचें काम आहे, केव्हां असनसोलला जाईन, कांहीं सांगतां येत नाहीं. मात्र पैसे लागतील हो पांचशें रुपये तरी !'

'तें सगळें करतों मी. पण एवढें जूळवून द्या भैया !'

'मी सांगेन तें करा, अन् मग तुम्ही निश्चिंत असा. माझें नांव अघोरनाथ आहे, हें लक्षांत असूं द्या. तर ती भेटल्याबरोबर काय होतें तें येऊन मला सांगा म्हणजे झालें.'

'त्याविषयीं निश्चिंत असा तुम्ही.' राखालनें अघोरनाथाचा हात दाबीत म्हटलें.

तो सबंध दिवस राखाल खोटें बोलण्याची तयारी करीत होता. म्हणजे त्याला खोटें बोलतां येत नव्हतें, असें मुळींच नव्हे. पण गिरिबालेशीं, जी आपलें सर्वस्व त्याच्या स्वाधीन करण्यास तयार झाली होती, तिच्याशीं खोटें बोलणें राखालला जड वाटूं लागलें, यांत शंका नाहीं.

संध्याकाळीं तो सहा वाजतां तलावावर जाऊन पोंचला. आज त्यानें गळ वगैरे कांहीं सामान आणलें नव्हतें. त्यानें आंब्याखालीं जाऊन एक सिगारेट पेटविली आणि तो तिथेंच गिरिबालेची वाट पहात बसून राहिला.

कालपासून त्याला जी चांगुलपणाची नशा चढू पहात होती, तिचा अंमल अजूनही त्याच्यावर कायम होता. बसल्या बसल्या त्याच्या मनांत विचार-चक्र सुरू झालें. आपण ही दारू पितों, तें कांहीं फारसें चांगलें काम नव्हे, असेंही त्यास वाटूं लागलें. लग्न झाल्यावर आपण स्वतःही दारू सोडायची, आणि अघोरनाथालाही सोडायला लावायची, असा निश्चयही त्यानें करून टाकला.

तोंच त्याला गिरिबाला येतांना दिसली. ती एक अशी साडी नेसली होती, कीं जी केवळ तिच्या लज्जारक्षणासच काय ती समर्थ होती.एरवींचा राखाल कदाचित् गृद्धदृष्टीनें तिच्या शरीराकडे रोखून पाहता. पण आज त्याला तिची ती साडी पाहून वाईट वाटलें.

गिरिबाला त्याच्याकडे आली. घागर तिच्या कमरेवर होतीच. तिला पाहून राखाल पुढें झाला. गिरिबाला एक क्षणभर थांबली आणि तिनें इकडे तिकडे पाहिलें. कोणी आपणास पहात नाहीं, हें दिसतांच ती राखालजवळ आली.

'गिरिबाले ! तुझी साडी किती फाटली आहे ! दुसरी कां नेसली नाहींस?' त्यानें स्नेहभरानें विचारलें.

गिरिबाला ती साडी हेतुपूर्वक नेसली नव्हती. पण दुसरी साडीच तिच्या-जवळ उपलब्ध नव्हती. ती लाजेनें काळवंडून गेली. खालीं पहात ती पुट-पुटली,

'साधारण बरी होती ती काल नेसलें होतें. दुसरी नाहींच. मी काय करूं ? '

'असूं दे, असूं दे. आपण घेऊं साड्या. माझी खात्री होती तूं येशील म्हणून '

'मलाही विश्वास होता, तुम्ही याल म्हणून. काय झालें ? विचारलें का घरीं ? '

राखालला खोटें बोलतांना फार कष्ट झाले. पण दुसरा कांहीं उपाय नस-ल्यानें तो तिच्याकडून दृष्टि बाजूस वळवून म्हणाला,

'आईला विचारलें मी. पण ती अत्यंत लोभी आहे. पांच पांच हजार रुपये

हुंडा देणाऱ्या मुली तिच्याजवळ आहेत. तिनें दिवसभर आकांडतांडव केलें. मीही तिच्याशीं खूप भांडलों. शेवटीं ती कांहीं वळली नाहीं.

गिरिबालेला जमीन खचल्यासारखें झालें. तिचें तोंड कसेंसेंच झालें. ती एक उसासा टाकून म्हणाली,

'दुर्दैव माझें ! तुम्ही तरी काय करणार त्याला ? '

'घाबरूं नकोस, गिरिबाले ! ' राखाल एकदम तिच्याकडे वळून म्हणाला, 'मीं तुझ्याशींच लग्न करायचें ठरविलें आहे. कोण जाणे कां तें; पण कालपासून मला असें वाटूं लागलें आहे, कीं तुझ्याशीं लग्न करीन, तरच मी सुखी होईन. माझ्यासारख्या अविवेकी, उच्छृंखल माणसाला ताळ्यावर आणण्याचें सामर्थ्य तुझ्यांतच आहे. तुझ्यावांचून दाही दिशा शून्य वाटायला लागल्या आहेत मला !

'गिरिबाले, माझ्याकरतां एक गोष्ट करशील का ? मी एवढा हळवा कधींही झालों नव्हतों ग ! करशील का एक साहस माझ्याकरतां ? '

'काय ? '

'आपण असनसोलला जाऊं दोघें मिळून. माझा एक मित्र असेल बरोबर. तिथें देवाब्राम्हणांसमक्ष आपण लग्न लावूं, आणि मग लगेच परत येवूं. मग पाहीन आई तुला घरांतून कसें काढून देते तें. करूं शकशील एवढें ? बघ. माझी प्रार्थना, अनुनय, वाटेल तें नांव दे याला. ही झिडकारून टाकण्याचेही अधिकार तुझ्याकडेच आहेत. तूं नाहीं म्हटलेस, तर मी रागावणार नाहीं. पण माझ्या मनाला कधींही न भरून येणारी जखम होईल, एवढें मात्र लक्षांत असूं दे ! मग करशील एवढें ? '

'उद्यां सांगेन. याच वेळीं, याच ठिकाणीं. '

'ठीक आहे. ' राखाल पटकन् चालूं लागला. आपल्या डोळ्यांतून अश्रु गळतील अशी त्याला भीति वाटली !

• • •

# ८

त्या रात्रीं जेवणें उरकल्यावर बनविहारीबाबूंच्या घरीं सगळी मंडळी आपापल्या अंथरुणावर झोंपली. एरवी रात्रीं थोडा वेळ गप्पा मारीत बसायचा या मंडळींचा शिरस्ता असे. पण आज चारपांच महिने झाले, तें घरगुती वातावरण जणूं उध्वस्त झालें होतें. बनबिहारी कुणाकडे गप्पा छाटायलाहि जात नसत. हरिमतीला त्यांच्याशीं नेहमीं गिरिबालेच्या लग्नाचें रडें रडायचा आतां उबग आला होता.

बनबिहारी स्वस्थ बसले नाहींत, सारखे धांवाधांव करीत आहेत, हें तिला स्पष्ट दिसत होतें. तिला वाटे, कांहीं उत्साहवर्धक बोलून त्यांचा थकवा दूर करावा. पण शेजारीपाजारी बायकांच्या टोंचण्याचा जो शीण येई, त्यामुळें पतीशीं चार शब्द बोलण्याचा उत्साह तिच्या अंगीं राहिला नव्हता. एक तर ती अलीकडे आजारीच असे. आणि त्यांत हा मानसिक ताण तिला असह्य झाला होता. तिनें अलीकडे शेजारींपाजारीं जाणेंहि सोडून दिलें होतें; एवढेंच नव्हे तर ती गांवांतल्या आयाबायांना टाळण्याचा प्रयत्न करी. जावंवलें, तर ज्या वेळीं तळ्यावर फारशा बायका नसतील, अशा वेळीं ती खालच्या मानेनें तळ्यावर जाई व तशीच मुकाट्यानें परत येई.

घरांतलें स्वास्थ्यजनक वातावरण नष्ट झाल्यामुळें पोरेंहि बिचारीं कानकोंडी होत. रात्रीं जेवणें उरकल्यावर एका घासलेटच्या ढणढण जळून धुरानें सगळ्या घरांतील वातावरण दूषित करणाऱ्या चिमणीजवळ बसून तीं थोडा वेळ अभ्यास करीत आणि मग झोंपीं जात.

गिरिबालेनें भांडींकुंडीं आवरलीं. मृणालिनीनें थोडा वेळ तिला मदत केली. गिरिबाला भांडीं घासून झाल्यावर मृणालिनीला म्हणाली,

'जा हो मृणालिनी आतां अभ्यास करायला. मी करीन बाकीचें.'

सगळीं आवरासावर झाल्यावर गिरिबाला आपल्या अंथरुणावर येऊन पडली. बिपिन रोज तिच्याजवळ झोंपत असे. त्यानें दीदीला तक्रार सुनावली,

'दीदी, या हेमीला आज तूं दूर झोंपायला सांग.'

'कां रे ?'

'रात्रीं मला लाथा मारते ती !'

हेमू आपलें पुस्तक मिटीत आश्चर्य वाटवीत म्हणाली,

'वा रे वा ! दीदी, हाच तर लाथा मारतो ग मला .'

'ओ हो ! तूं नव्हतीस का काल मला लाथा मारीत ?'

'तूं जागा होतास वाटतें ?'

'जागा नसलों म्हणून काय झालें ? स्वप्नांत तर पहात होतों कीं नाहीं? चांगली त्या दारांत उभी राहून मला कचाकच लाथा मारीत होती.'

'वा वा ! स्वप्नांतलें कांहीं खरें धरायचें नसतें !'

'असतें कीं नाहीं ग दीदी ?'

'नसतें कीं नाहीं ग दीदी ?'

विचारमग्न असलेल्या गिरिबालेस पोरांची ती चर्चा ऐकून हंसू आलें. तिनें बिपिनच्या पाठीवर हात फिरवीत त्याला म्हटलें,

'तूं शहाणा ना बिपिन ? हेमू तूं शहाणी ना ? मग शहाण्या मुलांनीं कांहीं भांडायचें नसतें. ती तारा, मृणालिनी, आभा, या पहा बरें मुकाट्यानें अभ्यास करताहेत ! तुमचा अभ्यास संपला असेल तर झोंपा. तूं ये बिपिन या बाजूला. अन् तूं या बाजूला हेमू.'

'अन् दीदी,' बिपिननें विचारलें, 'मला रात्रीं थंडी वाजली, तर मी तुझ्या पांघरुणांत शिरूं का ?'

'शीर हो !'

दोन्हीं पोरें गिरिबालेच्या दुतर्फा झोंपलीं. थोड्या वेळानें बाकी पोरींचेही अभ्यास झाले. त्याहि आपापल्या अंथरुणावर झोंपल्या. गिरिबालेनें चिमणी लहान करून उशाशीं ठेवून दिली आणि तीहि आपली फाटकी रजई पांघरून पडली.

सगळें घर शांत झालें, तसें गिरिबालेच्या मनांतले विचार गर्दी करून उठले. जणूं काय भुकेनें गांजलेल्यांनीं बाजार लुटायला निघावें, तसा त्यांनीं तिच्या मनांत गोंधळ करून सोडला. तिनें आपलें मनगट डोक्यावर आडवें

ठेवलें आणि ती त्या विचारांच्या गर्दींत वहात जाऊं लागली.

' काय करूं आतां मी?'

"ज्यांची मी प्रार्थना करूं गेलें, पदरीं घ्या म्हणून ज्यांना विनंती करु गेलें, त्यांनीच आज कळवळून मला लग्न करण्याविषयीं अनुरोध केला. मी त्यांच्याशीं लग्न न केलें, तर त्यांचें जीवन मातीमोल होईल, असें ते म्हणाले ते आज गहिंवरलेले दिसले. मला त्यांचें हृदय हललेलें दिसलें.

'त्यांचा हा कळवळा खरा असेल का ? तो कायम टिकणारा असेल का? त्यांची हो सद्बुद्धि अशीच टिकून राहील का ?

'किती उदारपणें सांगितलें त्यांनीं मला! ' ही विनंती झिडकारून टाकण्याचे अधिकारही तुझ्याकडेच आहेत.' आग्रह नाहीं, अभिनिवेश नाहीं मीं अमुकच एक करावें, असा सल्लाही नाहीं. संपूर्ण अधिकार माझ्याकडे! मी त्यांना नाहींही म्हणूं शकतें ! तरी ते रागावणार नाहींत!

'केवढें मोठें मन केलें त्यांनीं आज ! कालीमाते, त्यांचा हा चांगुलपण असाच टिकून राहील का ? कीं हा तात्कालिक ठरेल? त्यांचीं व्यसनें, त्यांचे दुर्गुण हे सगळे सुटतील का ?

'अहाहा ! मग मी केवढी सुखी होईन ! मी माझ्या पतींवर माझ्य जीवाचें पांघरूण घालीन ! माझ्या हृदयांत लपवून ठेवीन मी त्यांना. एव ढाहो दुष्ट वारा लागूं द्यायची नाहीं. दुःख सगळें मी पिईन, सुख त्यांच्या साठीं ठेवीन. आपदा सगळी मी सहन करीन; त्यांचा कुठें आपदाशीं संबं येऊं द्यायची नाहीं. संकटांशीं मी झुंजेन आणि माझ्या सख्याला मी सगळय विपत्तींच्या पलीकडे ठेवीन. त्यांच्या सद्गुणाचा विकास होईल, असें करीन मी. मग सगळें जग माझ्या सख्याला चांगलें म्हणेल ! मी तेवढें ऐकूनच सुखं होईन. माझ्या कष्टांचें तेवढेंच पारितोषक मला पुरें आहे.

'पण,—'

तिचें अंग शहारलें.

'पण केवढें मोठें साहस करायचें आहे मला !

'त्यांच्याबरोबर घरून एकटें, कुणाला न कळवितां निघून जायचें ! म्हणजे पळून—!

'हो. पळून जायचें आहे ! आई ग ! काय करूं मी ? कांहीं सुचत नाहीं ! कळत नाहीं ! उमजत नाहीं ! जगदंबे, सांग ना ग ! काय करूं मी ? '

तिला कांहीं उमगेनासें झालें. ती दोन्हीं हातांनीं तोंड झांकून पडून राहिली. पण पुन: थोडया वेळानें हे पळून जाण्याचे विचार तिच्या पुढें रिंगण घालीत आले. जणूं काय त्यांना कालीमातेसारख्या मोठमोठाल्या जिभा होत्या. नांगराच्या फाळासारखे भले मोठाले दांत होते. आपल्या जिभा तोंडाबाहेर लळालळ हालवीत आणि थैमान घालीत गिरिबालेला गिळून टाकण्याकरितां त्या विचाररूपी राक्षसांनीं तिच्या भोंवतीं कोंडाळें केलें.

'मी लग्न करून माझ्या पतींसह परत आलें, कीं मग मला कोणी कांहीं म्हणणार नाहीं. पण जर कांहीं विपरीत झालें तर ?

'मग जग माझ्या तोंडाला काळोखी फाशील ! गळयांत खेटरें बांधून गाढवावरून माझी मिरवणूक काढील ! माझें एक असूं दे. पण ही आई आणि हे बाबूजी ! यांना तोंड काढायला तरी जागा राहील का कुठें ! जीव देण्याकरतांही पळीभर पाणी मिळणार नाहीं ! गांवांतल्या सगळ्या बाया घरीं येतील आणि मोठा कळवळा आणून आईच्या भाजल्या पोळल्या अंत:करणावर डागण्या देत म्हणतील, 'काय करावें ? अशी कशी पळून गेली हो पोर ? बेचाळीस पिढया नरकांत घातल्या कीं हो तिनें ! ' अगदीं वाईट चालीच्या म्हणून ज्यांची प्रसिद्धि आहे, अशा बायाही ही संधी पाहून घरीं येऊन दोन टोंची मारून जातील !

'बाबूजींनाही कोणी तोंड काढूं द्यायचें नाहीं बाहेर. खाणींतले लोक म्हणतील, 'यांचीच पोरगी बरें का ती ! रामराम ! कलियुग आहे बाबा हें ! ' सगळ्या मुलखाचे व्याभिचारीही बाबूजींजवळ येऊन त्यांना विचारतील, 'अशी कशी पळून गेली हो ! ' आणि बाबूजी जेव्हां खालीं मान घालून स्वस्थ बसतील, तेव्हां हंसत आणि चुक्चुक् करीत ते सगळ निघून जातील ! बाबूजींच्या फजितीला कांहीं पारावार राहील का !

'का हा दंड त्यांना ? त्यांनीं मला जन्म दिला म्हणून ? केवळ याच कारणासाठीं त्या निरपराध जिवांना एवढी मोठी शिक्षा भोगावी लागेल ?

'मी कां जन्मलें यांच्या पोटीं ? कां जन्मतांच मेलें नाहीं ? दोन बहिणी ज्या वाटेनें गेल्या, त्या वाटेनें मी कां गेलें नाहीं ? निव्वळ भारभूत, अशी

मी कां जन्माला आलें ? जिच्यामुळें ती घरांत असतांना आईबापांच्या रात्री तिच्या चिंतेनें झोपेवांचून गेल्या, आणि जी घरांतून गेल्यावर आईबापांच्या-करितां कुठें तोंड दाखविण्यापुरतीही जागा रहाणार नाहीं, अशी कुलक्षणी, दळभद्री पोर मी. कां आईची कूस शिणवली ? '

गिरिबालेला तो विचारांचा आवेग सहन होईना. तिला हुंदके येऊं लागले. पण तिनें ते हुंदके बाहेर फुटूं दिले नाहींत. धुमसत्या ज्वालामुखीसारखी ती पोटांतील सगळी आग पाय पोटाशीं घेऊन आणि पालथी होऊन तिनें डोळ्यां-वाटे वहावायला प्रारंभ केला.

तरी पण तिचें शरीर त्या आवेगाच्या धक्क्यांनीं एखाद्या चालू असणाऱ्या इंजिनासारखे धक्के खाऊं लागलें.

एकदम बिपिन जागा झाला. त्याच्या अंगावरील पांघरूण बाजूला सरलें होतें. तो म्हणाला, ' दीदी ! पांघरूण ! '

गिरिबाला पटकन् उठून बसली आणि बिपिनच्या अंगावरील पांघरुण तिनें सारखें केलें. पण तिच्या डोळ्यांतून गळणारें पाणी पाहून तो म्हणाला,

' दीदी, तूंही रडत्येस ? ' एवढी मोठी दीदी रडूं शकते, हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें.

' नाहीं बेटा ! झोंप चुपचाप ' गिरिबाला त्याला थोपटीत म्हणाली.

' ऊं हूं ! तूं रडतेस ! काय झालें ग ? '

' माझें कीं नाहीं डोकें दुखतें. '

' मग चेपून देऊ ? '

' नको बरें बेटा ! ये माझ्या कुशींत. ' गिरिबालेनें बिपिनला आपल्या कुशींत ओढलें व त्याला ती थोपटीत म्हणाली, ' झोंप मुकाट्यानें. राजा बेटा माझा ! '

लहानगा बिपिन चुपचाप तिच्या कुशींत तोंड लपवून झोंपीं गेला. त्याला थोपटतां थोपटतां तिचें विचारचक्र परत सुरू झालें.

' झोंप बेटा ! कदाचित् उद्यां तुला तुझ्या दीदीच्या कुशींत झोंपायला मिळायचें नाहीं. तुझी ही अभागी दीदी आपल्या दैवाची परीक्षा पहाण्या-करितां कुठें तरी दूर दूर निघून जाईल. ही हेमू, मृणालिनी, तारा, आभा, बाबूजी, आजारी आई, हें घर या सगळ्यावरचा हक्क सोडून देऊन तुझी दीदी जाईल.

'कारण दुसरा कांहीं उपाय नाहीं ठेवला समाजानें. दरिद्री आईबापांच्या पोरींकरितां खुला असलेला हा एकच मार्ग. मला गेलें पाहिजे, त्यांच्या बरोबर गेलें पाहिजे. कदाचित् आईबापांना त्रास होईल कांहीं दिवस. पण एकदांचीं माझ्या त्रासांतून मुक्त होतील बिचारीं ! '

'मग एक माणूस कमी झाल्यानें कदाचित् त्यांना याहून बरें खातां-पितां येईल. याहून बरे कपडे घालतां येतील त्यांना. एखादे दिवशीं मासेही घेतां येतील त्यांना. या सोनुल्यांच्या पोटांत चार प्रकारच्या भाज्या पडतील, एवढेंसें तेलतूप जाईल.

'होऊं दे काय व्हायचें तें. खेळलें खरी हा फांसा. आतां जें काय दान पडायचें तें पडो. माझ्याकरितां आतां या पोरांना अधिक कष्ट भोगूं देणार नाहीं मी.

'मी जाईन त्यांच्याबरोबर. '

'जर बरें झालें, तर सगळेंच चांगलें होईल.

'जर वाईट झालें, तर कांहीं दिवस कष्ट होतील आईच्या आणि बाबूजींच्या मनाला. पण आज जे कष्ट होत आहेत, त्यांच्यापुढें त्या कष्टांची कांहीं फारशी मातब्बरी नाहीं.

'मी जाईन त्यांच्याबरोबर. खरोखरच जाईन. '

तिचें मन विचार करून करून थकून गेलें. पहांटे पहांटे तिला जराशी गुंगी आल्यासारखी झाली.

सकाळीं ती नेहमींप्रमाणें उठली. आज नित्याचे व्यवहार उरकतांना तिचें चित्त ताळ्यावर नव्हतें. डांटयाच्या भाजींत तिनें दुप्पट मीठ टाकलें, तर दोडक्याच्या भाजींत अजिबातच टाकलें नाहीं. सगळ्या पोरांनीं भाज्या खातांना कुरकुर केली. हरिमती चिडून म्हणाली,

'पोरी ! आज तुझें लक्ष तरी कुठें गेलें आहे ? तेलाशिवाय भाज्या व्हायच्या सगळ्या ! कधीं तुपाचा तर वासही नाहीं यायचा आमच्या घरीं! त्या तरी घड होऊं देत जा ! आतां कोण खाईल ही डांटयाची भाजी ? कुलक्षणी पोर कुठली ! आतां हे काय खातील ? '

गिरिबाला मनांत म्हणाली,

'आजचाच दिवस थांब आई ! उद्यां ही पोर तुला शोधूनही सांपडायची

नाहीं. एकच दिवस आई ! एकच दिवस. आज जे काय अपराध होतील, ते सगळे माफ करा मला. उद्यां काय होईल तें कांहीं सांगतां येत नाहीं मला. पण ह्या घराचा अन् माझा संबंध संपला, एवढें मात्र खरें !'

दिवसभरांत तिला या अशा गोंधळाबद्दल दोनतीनदां आईचीं बोलणीं खावीं लागलीं. संध्याकाळीं तर आई तिच्यावर संतापली. ती नाहीं नाहीं तें बोलली तिला. तें सगळें बोलणें गिरिबालेनें एखाद्या कडू घोटासारखें पिऊन टाकलें. एका शब्दानेंही तिनें प्रतिवाद केला नाहीं. सबंध दिवस तिला राहून राहून उमाळे येत होते. पण ती प्रयत्नपूर्वक ते उमाळे दाबून टाकीत होती.

करुणेकडे जाऊन तिला हा बेत सांगून तिचा सल्ला घ्यावा, असेंहि गिरिबालेला एकदां वाटलें. पण परत तिनें विचार केला, 'करुणा नको म्हणाली तर! असूं दे. मी माझ्याच जबाबदारीवर जें काय करायचें तें करीन. कुणालाही मध्ये घेणार नाहीं.'

संध्याकाळीं जेव्हां ती घागर घेऊन तळ्यावर निघाली, तेव्हां संतापलेली हरिमती म्हणाली,

'रोजच्या रोज काय तुम्ही पाणी संपवितां ग ! पाण्याचा थेंब उरत नाहीं घरांत. सकाळींच कां आणून ठेवीत नाहीं ? संध्याकाळची–एवढी मोठी पोर !–एकटी जाऊं नकोस तळ्यावर. हेमीला घेऊन जा.'

पण गिरिबालेच्या सुदैवानें नेमकी याच वेळीं हेमू जी बाहेरून घरांत आली, ती ठेंच लागून तिच्या पायाचें नखच उडालें. तिनें रडायचा गोंधळ घातला. मृणालिनी तिच्या पायाला औषध करीत बसली. पोरें तिच्या भोंवतीं गोळा झालीं. हरिमती हेमूला शिव्या देत व आपलें नशीब कसें फुटकें आहे, याचें वर्णन करीत बसली.

या गोंधळांत गिरिबाला पटकन् घराबाहेर पडली. झपाझप चालत ती तळ्यावर जाऊन पोंचली. आजही तळ्यावर कोणी नव्हतें. राखालही नव्हता. तो नाहीं, हें पाहून गिरिबालेच्या पोटांत धस्स झालें.

'यांचा बेत परत फिरला कीं काय ? काल आलेला उमाळा काय आजच्या आज जिरला ?'

ती विचार करूं लागली.

पण तिला थोड्याच वेळांत राखाल घाईघाईनें येतांना दिसला.

कालची रात्र व आजचा दिवस राखाललाही मोठ्या अस्वस्थतेंत गेला. रात्रभर त्याच्या मनांत विचार येत होते,

'काय करील गिरिबाला ?

'कदाचित् नाहीं म्हणेल ती. मी कुठें आहे तिच्या योग्यतेचा ? कितीतरी दुर्गुण भरले आहेत माझ्यांत. असा काय मी मोठा देखणा आहें कीं ती माझ्याशीं लग्न करण्यास तयार होईल ? ती सुंदर आहे, सद्गुणी आहे. ती घराबाहेर पडली तर ----

'ऊं हूं ! तिच्याच्यानें वांकडें पाऊल नाहीं टाकवायचें. म्हणून तर ती माझ्याकडे आली. म्हणून तर तिनें मला तें सगळें विसरून जाण्यास सांगितलें आणि आपण होऊन माझ्याशीं लग्न करण्यास तयार झाली.

'पण ती माझ्याकरितां घराबाहेर पडायला तयार होईल का ? तोच तर मुख्य प्रश्न आहे. मी उगीचच फालतू विचार करीत बसलों. एवढें मोठें साहस करील का ती ?

'कोण जाणे कां मी एवढा आईला भितोय् ! सरळ उठून सकाळीं तिला सांगतों, मी गिरिबालेशीं लग्न करणार आहें. काय करावयाचें असेल तें कर. काय करील ? आरडाओरडा करील, रडेल, बोलणार नाहीं चार दिवस. पण माझा निश्चय पाहून आपणच बोलेल. बाबूजीही कुरकुरतील थोडेसे. पण ते रागावणार नाहींत. चार वेदांताच्या गोष्टी बोलतील आणि आपलें समाधान करून घेतील.

'पण जर हें न झालें, अघोरनाथांनीं सांगितलें तसें आईनें न ऐकलें तर?

'येईल का गिरिबाला माझ्याबरोबर ? '

त्यानें एक सिगारेट पेटवून निजायच्या खोलींत इकडे तिकडे चकरा घालायला प्रारंभ केला. मध्येंच उभा राहून स्वतःशींच प्रश्न केला,

'येईल का गिरिबाला ? ती आली पाहिजे. ती न आली तर मग सगळीकडे अंधार आहे. तिच्याशिवाय मी जिवंत राहूं शकणार नाहीं. कोण जाणें कां ? काल परवांपासून तीच माझ्या जगण्याचा आधार होऊन राहिली आहे. गिरिबालेवांचून जिणें--

'अशक्यच आहे तें ! पण मीं तर तिला काय वाटेल तो निर्णय घ्यायचा अधिकार देऊन टाकला आहे ! ती नाहींही म्हणूं शकते ! '

टाळी वाजवून तो म्हणाला,

' म्हणूनच ती येईल. मीं माझ्या मनांतली व्यथा तिच्यापुढें उघड केली आहे. त्या व्यथेला ओळखून निश्चितच येईल ती. तिचें हृदय फार मोठें आहे. मीं, माझी आई ऐकणार नाहीं, असें जेव्हां तिला सांगितलें, तेव्हां दुसरी एखादी आईला बरेंवाईट म्हणती, मला माझ्या दुर्बलपणाबद्दल हंसती.

'पण गिरिबालेनें केवळ आपल्याच नशिबाला दोष दिला. दुसऱ्या कुणालाच नांवें ठेवलीं नाहींत तिनें. एवढें मोठें मन घेऊन आली ती मजकडे !

' लग्न होऊं दे एकदां. कांहीं बिघडलें नाहीं. मार्गशीर्ष महिना आहे. लागेल तितके मुहूर्त आहेत. अघारनाथ व्यवस्था करणार आहेत सगळी, कसे का असेनात ते, माझ्याकरितां काय वाटेल तें करतील.

'लग्न होऊन घरीं येऊं दे. मग पहा मी कसा सुधारतों ! आतां इथून पुढें दारू मुळींच प्यायची नाहीं. चांगलें व्हायचें.

' निश्चितच येईल गिरिबाला !'

मग तो आपल्या अंथरुणावर झोंपून राहिला. सकाळीं उठल्यापासून तों संध्याकाळपर्यंत त्याला हुरहुर वाटत होती. त्याला दिवस संपतां संपेना. संध्याकाळ झाल्यावर त्याला आठवलें. निघायचें केव्हां तें अघोरनाथाला विचारलें नाहीं. तो घाईघाईनें त्याच्याकडे गेला व तिथूनच तो तळ्यावर आला.

किंचित् संकोचून तो गिरिबालेला म्हणाला,

' थोडा उशीर झाला मला. तूं आतां इथें येशील हें मला माहीत होतेंच अगोदरपासून. '

' कशावरून ?'

' माझें मन सांगत होतें मला. मग काय ठरलें तुझें ? '

गिरिबाला खालीं पहात उभी राहिली. व्याकुळपणें राखाल म्हणाला,

' सांग ना गिरिबाले ! माझें सुखी अथवा दुःखी होणें तुझ्या होकार किंवा नकारावर अवलंबून आहे ! तरी मी तुला आग्रह करीत नाहीं. काय वाटेल तें सांग. '

हळूहळू वर पहात गिरिबाला म्हणाली,

' विचारतें त्याबद्दल क्षमा करा मला. ज्यांच्यावरचें संकट टाळण्याकरितां

मी हें साहस करीत आहें, त्यांना पुढें दुःख होऊं नये, म्हणून विचारतें हें तुम्ही मला दगा देणार नाहीं ना ? '

एक क्षणभर राखाल उगा राहिला. मग हताशपणें तो म्हणाला,

' बरोबर आहे तुझें. तूं स्त्री आहेस. मी पुरुष आहें. मला कोणी नांवें ठेवणार नाहीं. पण तुला अपरिमित कष्ट सहन करावे लागतील. तूं माझ्यावर दाखविलेला हा अविश्वास योग्यच आहे. असूं दे. मी एकटाच भोगीन हें दुःख एकटाच जळेन या आगींत. जा, गिरिबाले, जा तूं घरीं. सुखाची अस तूं ! '

' नाहीं, नाहीं ! ' गिरिबाला घाईघाईनें म्हणाली, ' मी तुमच्यावर अविश्वास दाखवीत नाहीं. येईन मी तुमच्याबरोबर वाटेल तिथें. न्याल तिथे येईन मी; खरोखरच येईन.'

' खरेंच ? ' अत्यानंदित होऊन राखाल एकदम गिरिबालेकडे वळत म्हणाला, ' खरेंच हें गिरिबाले ? किती चांगली आहेस तूं ! किती चांगली!

राखालला गहिंवरून आलें. पण आज त्यानें तोंड लपविण्याचा प्रयत्न केला नाहीं.



## ९

थोडा वेळ राखाल तसाच उभा राहिला. आलेला वेग त्यानें ओसरूं दिला. मग तो गिरिबालेकडे स्नेहानें ओथंबलेल्या दृष्टीनें पहात म्हणाला,

' खरोखर फारच चांगली आहेस तूं. अशी इच्छा होते कीं तुला हृदयाशीं घट्ट धरून ठेवावें. एवढेंसेंही दूर जाऊं देऊं नये. ऊं हूं ऊं हूं ! तूं चिंता करूं नकोस. मी तुला स्पर्श करणार नाहीं. तूं घातलेली मर्यादा ओलांडून मी एक पाऊलही पलीकडे टाकणार नाहीं. हा एवढा निग्रही बनायचें सामर्थ्य माझ्यांत केव्हांपासून आलें माहीत आहे, गिरिबाले ? '

' केव्हांपासून ? '

'परवांपासून. ज्या क्षणीं मला कळलें कीं तूं माझी होणार आहेस तेव्हां-पासून. नाहीं तर पूर्वीं मी अगदीं वाईट होतों बघ; अगदीं वाईट. पण असूं दे तें. आतां मी निश्चय केला आहे. अगदीं तुला शोभेन असा व्हायचें. दारु पितों मी म्हणजे पीत होतों— '

'माहीत आहे मला.'

'माहीत आहे? असूं दे. तर मी अगदीं सोडून दिलें दारू पिणें. शपथच घेतली म्हणेनास ! काय सागूं तुला ? माझ्यांत अचानकच बदल झाला आहे बघ. पण हें सगळें कां तें माहीत आहे का ? तूं माझ्या जीवनांत येणार म्हणून. तुझ्यावांचून आतां जिणेंही अशक्य आहे बघ. अरे हो ! तुला घरीं जायचें आहे नाहीं का ? तर आज रात्रीच्या गाडीनेंच निघायचें.

'आजच ?' किंचित् व्याकुळ होऊन गिरिबालेनें विचारलें.

'तर मग केव्हां ? मला तर आतां एका क्षणाचाही विलंब असह्य होतो आहे बघ. उगीच लांबणीवर टाकलें— कोण जाणे कां ? मला धास्ती वाटा-यला लागली आहे. कांहीं संकट तर ओढवणार नाहीं ना मध्यें ? आजच ! आजच, गिरिबाले !'

'हो. आजच.'

'तर आज रात्रींच निघायचें. पहांटे साडेपांचला कष्टग्रामला गाडी आहे. रात्रीं बाराला इथून निघालें पाहिजे. साडेअकराला तुमच्या घराशेजारच्या ठाकुरवाडीजवळ मी वाट पाहीन तुझी. चल आतां घरीं. मी येऊं का पोंच-वायला तुला घरापर्यंत ?'

'नको. जाईन मी एकटी.'

'मग रात्रीं साडेअकराला हं ? हो ! तुमच्या घरीं घड्याळ नसेल, नाहीं का ? पण खाणींत टोल पडतात. तुला कळतीलच साडे अकरा झालेले. चला आतां.'

गिरिबालेनें कळशी भरून घेतली आणि तीं दोघें गांवाकडे निघालीं. वाट फुटली तिथें परत एकदां राखालनें दबलेल्या शब्दांत रात्रीं साडे अकरा-विषयीं बजावलें, आणि तो आनंदाच्या भरांत हवेंत तरंगत घराकडे निघाला.

गिरिबाला घरीं जाऊन पोंचली, तोंवर हरिमती संतापलेली होती. गिरि-बालेला पाहतांच ती ओरडून म्हणाली,

'कुणाशीं बोलत होतीस ग इतका वेळ ? सांग. आजही करुणा भेटली होती ? कीं कुणी भेटला होता गांवांतला ? एवढी मोठी पोर तूं ! संध्याकाळीं अशुभ वेळेची गेलीस तळ्यावर ! काय करीत होतीस एवढा वेळ सांग ! देवा रे ! कसा भोग आणला आहेस आमच्या भोंवतीं ! कशी कुलक्षणी कार्टी निघाली ही ! नांवास काळें फासणार ही आमच्या कुळाच्या ! दळभद्री कुणीकडची ! सांग कोण गांठला होतास ? '

गिरिबालेनें एका शब्दानेंही उत्तर दिलें नाहीं. पण मृणालिनी मात्र थोडी फटकळ झाली होती अलीकडे. ती म्हणाली,

'आई ! काय बोलतेस हें ? तुझ्याच्यानें बोलवतें तरी कसें ? '

'चूप ! ' मोठ्यानें गर्जत हरिमती म्हणाली, 'चालली तोंडाळ मावशी परत उत्तरें करायला ! आजारी असलें म्हणून काय झालें ? अजून फोडून काढीन धरून !'

मृणालिनी यावरही कांहीं उत्तर देणार होती. पण गिरिबालेनें तिच्या तोंडावर हात ठेवीत तिला स्वयंपाकघरांत नेलें. हरिमती बराच वेळ बडबड करीत होती. शेवटीं तिनें 'उद्यांपासून संध्याकाळीं घराबाहेर पाऊल घालायचें नाहीं,' असा सक्त नियम करून तो जाहीरही केला. बिचारीला विधिलिखित कळतें तर !

रात्रीं जेव्हां बनबिहारी घरीं आले, तेव्हां ते आल्यावरोबर हेमूनें त्यांच्या जवळ आई दीदीला रागावल्याबद्दल तक्रार केली. ती दीदीला काय काय बोलली तें सगळें तिखटमीठ लावून हेमूनें सांगून टाकलें. बनबिहारींना तें ऐकून वाईट वाटलें.

ते जेवायला बसतांना हरिमतीला म्हणाले,

'तुलाही किनई ताळ तंत्र रहात नाहीं अलीकडे. कांहींच्याबाही बोलतेस ! तुला असें वाटतें तुझी पोर उगीच कोणाशीं तरी गोष्टी बोलत बसेल ? कीं आपलें तोंडाला आलें तें बोलावें ! '

थोडी शांत झाल्यावर हरिमतीला असें वाटूं लागलें होतें, कीं ती गिरिबालेला उगीच कांहीं तरी बोलली. बनबिहारींचें हें बोलणें ऐकून तर पटकन् तिच्या डोळ्यांत पाणी आलें. ती म्हणाली,

'अहो ! मला हौस का आली आहे माझ्या सोन्यासारख्या पोरींना

दुखवायची ? ती संध्याकाळीं पाण्याला गेली, उशीर लागला तिला परत यायला. एवढी मोठी पोर ! अगोदरच गांवांतले कावळे अन् घारी अंगाचे वाभाडे काढताहेत. कांहीं करतां कांहीं झालें, तर केवढी काळोखी लागेल तोंडाला ? अगोदरच तिनें दुपारीं भाजींत मीठ जास्त घातल्याबद्दल तिच्यावर रागावलें होतें. संध्याकाळीं उशीर झाल्यामुळें गेले तोंडांतून चार शब्द निघून. रागावूं नकोस हो गिरिबाले ! मी काय, भडाभडा बोलेनच तेवढी, आणि तीहि तुमच्या हिताकरितां. '

' रागावेल कशाला ? ' बनबिहारी भाजीचा घांस घेत म्हणाले, ' सगळया घरांत तीच पोर तेवढी शहाणी आहे. एका शब्दानेंही तिनें तुला प्रत्युत्तर केलें नसेल. मूर्ख लेकाचे सगळे वरपिते ! पैसे मागताहेत ! त्यांना काय वस्तु देतों आहे, तिकडे लक्षच नाहीं कोणाचें ! ऐकलेंस का, म्हण कांहीं तूं ! जिथें पोरगी पडायची असेल तिथें पडो, पण तें घर मात्र सुखी होईल, यांत शंका नाहीं मला एवढीशीहि. जिथें ही तुझी पोर राहील, त्या घराचें अगदीं गोकुळ होईल बघ ! '

' आहेच माझी पोर तशी गुणाची ! ' हरिमती म्हणाली.

मृणालिनीला आतां जोर चढला. ती म्हणाली,

' अन् मग संध्याकाळीं कसें कांहीं तरी बोलत होती आपल्या गुणाच्या पोरीला! ' गिरिबाला तिला डोळ्यांनीं न दाबती, तर ती आणखीही कांहीं बोलून गेली असती. तात्पर्य, संध्याकाळीं गढुळलेलें वातावरण आतां अगदीं पूर्वींसारखें शांत, प्रसन्न झालें. आज अनेक दिवसांत बनबिहारींच्या घरीं एवढी रम्य स्नेहाळ छाया पसरली नव्हती. जेवणें आटोपल्यावर सगळीं जणें त्या छायेंतील सुखाचा अनुभव घेत नित्याप्रमाणें झोंपीं गेलीं. बनबिहारी व हरिमतीही आज शांतपणें झोंपीं गेलीं.

गिरिबालाही त्याच धुंदींत आपल्या अंथरुणावर पडली, तोंच तिला खाणींत पडलेले टोल ऐकूं आले. तिच्या मनानें तिला न कळत ते टोल मोजायचें काम करून गिरिबालेपुढें रिपोर्ट हजर केला.

' दहा वाजले! '

तिच्या संवेदनाशक्तीला जेव्हां याची जाणीव झाली, तेव्हां तिच्या छातींत धस्स झालें.

'दहा वाजले ! आणि साडे अकरा वाजतां—'

'ऊं हूं ऊं हूं ! ' तिचें एक मन बंड करून उठलें, ' मी हें घर सोडून जाणार नाहीं. हीं वात्सल्यानें कांठोकांठ भरलेलीं मनें सोडून मी जाणार नाहीं. हे माझे बाबूजी, ती माझी आई, हा माझा लहानगा बिपिन, ही हेमू, ही मृणालिनी, तारा, आभा, हीं सगळीं माणसें तर इथेंच राहतील. आणि मी एकटीच, एकटीच जाऊं यांच्यांतून ?

' हे मला जा म्हणतात ?

' नाहीं ना ! यांचें माझ्यावर पूर्वीसारखेंच प्रेम आहे ना ? मग मी जाणार नाहीं.

' हें घर माझें आहे. हीं घराबाहेरचीं फुलझाडें मीं लावलीं आहेत. त्या पिशवीभर शिंपा मी गोळा करून आणल्या आहेत. ही कालीमातेची प्रतिमा बाबूजींनीं लहानपणीं माझ्याकरतां आणली होती. हीं पुस्तकें माझीं आहेत. या हेमूवर माझें प्रेम आहे. या बिपिनला मी हवी आहे; या मृणालिनीला हवी आहे; ताराला हवी आहे, आभाला हवी आहे. हे बाबूजी माझ्याकरितां जीव टाकतात. या आईला मी हवी आहे. निदान आज, या आजारी स्थितींत तरी हवी आहे !

' तर मी जाणार नाहीं ! ऊं हूं ! मुळींच जाणार नाहीं ! नाहीं ना जाणार मी ! नका ना काढूं मला कुणी बाहेर ! '

ती काकुळती आली. जणूं काय तिला कोणी ओढून बाहेर काढीत असल्याप्रमाणें ती आपल्या पांघरुणास चिकटून राहिली. तिनें तें पांघरूण अंगाभोंवतीं घट्ट गुंडाळून घेतलें आणि आंत हातपाय पोटाशीं घेऊन ती झोंपून राहिली.

पण थोडया वेळानें तिच्या दुसऱ्या मनानें जणूं काय तिच्या पाठीवर थोपटीत तिला म्हटलें,

' असें काय करावें गिरिबाले ! तूं शहाणी आहेस ना ? राखालबरोबर लग्न करण्याचें तूंच आपण होऊन ठरविलेंस ना ? तुझे बाबूजी गरीब आहेत ना ? त्यांच्याजवळ तुझ्याकरितां हुंडा देण्यास पैसे नाहींत ना ? ते व तुझी आई रात्रंदिवस तुझ्या चिंतेनें वाळून जात आहेत ना ? त्यांना होत असलेल्या असीम वेदना तुला पाहावत नाहींत ना ?

'आणि म्हणून तूंच आपण होऊन राखालला बोलाविलेंस ना? तूंच त्याला आपला स्वीकार करण्याविषयीं गळ घातलीस ना? ती तुझी विनंति मान्य करून तो तुझ्याशीं लग्न लावायला तयार झाला ना?

'त्याला मुली मिळणार नाहींत का? एक नव्हे, तर शेंकडों मुली बरोबर हुंडाभर रुपये घेऊन त्याच्या आईच्या अनुमतीची वाट पहात आहेत ना? तें सगळें आकर्षण बाजूला सारून तो तुझ्याशींच विवाह करणार आहे ना?

'त्यानें तुझ्याकरितां आपलीं जपून ठेवलेलीं व्यसनें झुगारून द्यायचें ठरविलें ना? तो आमूलाग्र बदललासा तुला वाटतो ना? त्याचा हा बदल कृत्रिम नाहीं, याबद्दल तुझें अंतःकरण तुला साक्ष आहे ना? त्यानें तुझ्यासाठीं कांहीं तरी सोडलें आहे असें तुला नाहीं का वाटत?'

ती हळूच म्हणाली,

'हो! मला वाटतें तसें. त्यांनीं माझ्याकरितां केलेला त्याग खूपच मोठा आहे!' मग पुनः तिचें दुसरें मन तिला म्हणालें,

'तर मग तुला त्याच्याकरितां या सगळ्या गोष्टींचा मोह सोडला पाहिजे. आज, उद्यां, परवां, केव्हांतरी तुला हें सगळें सोडावें लागणार. जेव्हां तुझे बाबूजी या हुंड्याच्या त्रासाला कंटाळून शेवटीं एखाद्या अडेल म्हाताऱ्याशीं तुझें लग्न लावून देतील, तेव्हां तरी तुला हें सगळें इथेंच ठेवून जावें लागेल. यांतलें एकही तुझ्याबरोबर येणार नाहीं. हीं फुलझाडें येणार नाहींत, हें घर येणार नाहीं; हा बिपिन, हेमू, आभा, बाबूजी ही सगळी मंडळी तुला तुझ्या सासरीं पाठवतील. थोडेंसें रडतील, चार दिवस थोडीं खिन्न असतील आणि मग तें दुःख विसरून जातील.

'पण तोंपर्यन्त त्यांना जें दुःख सहन करावें लागेल आणि तुला एखाद्या म्हाताऱ्याला दिल्याबद्दल त्यांच्या मनाला जन्मभर ज्या वेदना होतील त्यांतून त्यांना मुक्त करण्याकरितां तरी तुला हें सगळें आपण होऊन सोडलें पाहिजे.'

'तर मग मी काय करूं?' तिनें असहाय्यपणें त्या मनाला विचारलें.

'तूं त्याच्याबरोबर जा. ते बघ अकरा वाजले!'

तिनें टोल पडलेले ऐकले. एक, दोन, तीन — नऊ, दहा, अकरा.

बळी द्यायला चालविलेला मेंढा ज्याप्रमाणें निमूटपणें वधिकामागें चालत असतो, तशी ती निमूटपणें उठली, एवढासाही आवाज न होऊं देतां. तिनें

चिमणी आणखी बारीक केली आणि त्या अंधुक प्रकाशांत तिनें सगळ्या घरांत एक दृष्टि टाकली.

तिच्या शेजारीं—आपल्या दीदीच्या—शेजारीं झोंपल्यामुळें निश्चित असलेलीं—बिपिन आणि हेमू पांघरुणांत गुरफटून निजलीं होतीं. पलीकडे मृणालिनी, आभा आणि तारा एक मोठा थोरला फाटका रग पांघरून झोंपलेल्या होत्या. पलीकडल्या खोलींतील तख्तावर बनबिहारी शांतपणें झोंपले होते. खालीं हरिमती झोंपली होती.

तिनें स्वयंपाकघरांत एक नजर टाकली. तिथलीं सगळीं भांडीं तिनें आपल्या हातांनीं आवरून ठेवलीं होतीं. चुलीजवळील लांकडें, चिमटा, फुंकणी, हींही तिनें स्वतः व्यवस्थित ठेवलीं होतीं. घरांतील प्रत्येक वस्तूवर तिचा हात फिरलेला होता.

आणि हें सगळें तिला आतां सोडून जावें लागणार होतें. तिच्या डोळ्यांत पाणी भरून आलें. तिनें बिपिनच्या तोंडावरील पांघरूण बाजूस सारलें. तसा त्या लहानग्या पोरानें झोंपेंतच आपल्या दीदीच्या हातावर हात टाकला. जणूं काय तिच्या शेजारीं झोंपल्यानें त्याला कशाचीही चिंता करण्याचें कारण नव्हतें. त्यानें सगळ्या विश्वांतील सुखें त्या एका सुखाकरितां बाजूस सारलीं असतीं.

त्या पोराचें तें आपल्यावर विसांवणें पाहून गिरिबालेला एक जोराचा हुंदका आला. पण तिनें महत्प्रयासानें तो गिळला. तिला असा मोह झाला, कीं त्या लेंकराच्या गालांस आपले ओंठ शिववून एकदां त्याचें चुंबन घ्यावें. पण न जाणों, तो जागा होईल, या भीतीनें तिनें तोही मोह आवरला. केवळ त्याच्या हनुवटीस हलकेच स्पर्श करून तिनें त्या आपल्या बोटांचें चुंबन घेतलें, आणि ती हळूच उठली.

समोरील दांडीवर तिची साडी आणि पोलकें होतें, तें तिनें अलगत घेतलें, आणि अगदीं सावकाश कडी काढून बिपिनकडे शेवटला दृष्टिक्षेप टाकीत त्याची ती लाडकी दीदी घराबाहेर पडली! तोंच झोंपल्या झोंपल्याच हेमू थाडकन् शिंकली!

अनिष्ट शंकेनें गिरिबालेचें हृदय बावरलें. पण दुसऱ्याच क्षणीं इकडे तिकडे पहात ती घाईघाईनें ठाकुरवाडीकडे निघाली.

ठाकुरवाडीच्या कोंपऱ्यावर राखाल अंगाभोंवतीं शाल गुंडाळून मुकाट्यानें उभा होता. साडेअकराचा टोल पडला आणि अर्ध्याच मिनिटांत अंधारांत त्याला कोणीतरी येतांना दिसलें. तें माणूस जवळ आल्याबरोबर राखाल हळू आवाजांत म्हणाला,

‘ गिरिबाले ! ’

ती गिरिबालाच होती. अस्फुट शब्दांत ती पुटपुटली,

‘ चला. ’

मुकाट्यानें पुढें राखाल व मागें गिरिबाला, अशीं दोघें अघोरनाथाच्या घराकडे निघालीं. वाटेंत एक कुत्रें बसलें होतें. यांना पाहून तें यांच्यार भुंकूं लागलें. त्याची भुंक ऐकतांच गांवांतलीं इतर कुत्रींहि भुंकू लागलीं. राखाल आणि गिरिबाला, दोघेंही गांगरलीं. पण तीं तशींच भीत भीत पुढें सरलीं.

अघोरनाथ आपल्या घरीं या दोघांची वाट पहातच होता. गिरिबाला घरांतून निघते, कीं नाहीं, ही शंका त्याच्या मनांत डोकावत होती. तिच्या येण्यावर त्याच्या बऱ्याच गोष्टी अवलंबून होत्या. त्याचें दारू दुकानचें देणें फिटलें असतें, चार पैसे त्याच्या हाताशीं राहिले असते. त्यानें डाव तर मोठ्या कुशलतेनें टाकला होता. राखालच्या मनावरील बसलेला आपला पगडा त्यानें मोठ्या हुशारीनें आजपर्यन्त कायम ठेवला होता. त्याच्या मनांत आपणाविषयीं एवढीशीही शंका अघोरनाथानें निर्माण होऊं दिली नव्हती. सगळें जाळें मोठ्या बुद्धिमत्तेनें विणून एखाद्या कोळ्यासारखा तो त्या जाळ्यापासून दूर आपल्या घरीं शिकारीची वाट पहात बसला होता.

आणि शिकार त्याच्या घरीं आपण होऊन चालत आली. अघोरनाथाच्या घरांत ज्या वेळीं राखाल शिरूं लागला. तेव्हां क्षणभर गिरिबालेच्या मनांत संकोच निर्माण झाला. ती मागेंच थबकली आणि म्हणाली,

‘ इथें ? ’

मागें वळून राखाल उत्तरला,

‘ हो; चिन्ता करूं नकोस. मी आहें ना बरोबर ? ’

गिरिबाला राखालच्या पाठोपाठ अघोरनाथाच्या घरांत शिरली खरी. पण तिचें मन एका अज्ञात शंकेनें भरून गेलें. अघोरनाथाविषयीं गांवांत जी प्रसिद्धि होती, ती तिच्याही कानीं आली होती. अघोरनाथ हा कांहीं फारसा

चांगला माणूस नाहीं, हें तिला माहीत होतें. पण तिला शंका घ्यायला फारसा अवसर न देतां अघोरनाथ खुर्चीवरून उठत म्हणाला,

'या मोशाय ! म्हटलें तुम्ही येतां कीं नाहीं ? उगीच चिंता लागून राहिली होती. हो ! कोणतेंही काम एक तर अंगावर घेऊं नये. घेतलें, तर तें पुरें करावें. हें तुमचें एकदां सगळें सुव्यवस्थित झालें, कीं मग मीं एका मोठ्या जबाबदारींतून सुटलों. अहो, संकटांत कामीं न पडेल, तो मित्र कशाचा ? या ना भाबी! लाजायचें कांहीं कारण नाहीं. मी या राखाल मोशायांचा भाऊच आहें म्हणानात ! या आंत. त्या चटईवर बसा. पांच मिनिटांत निघायचेंच. मोशाय, मी माझे कपडे घेतों. तुम्ही बसा या खुर्चीवर !'

अघोरनाथ आंतल्या खोलींत गेला. आतां कुठें राखालनें गिरिबालेला उजेडांत पाहिलें. एवढ्या जबरदस्त थंडींतही एका पोलक्यापलीकडे तिच्या अंगांत कांहीं नव्हतें. आपली साडी आणि पोलकें यांची पोटोळी करून तिनें आपल्या कांखोटींत घेतली होती.

तिच्याकडे पहात राखाल म्हणाला,

'आतां जरा भीति कमी झाली; नाहीं ? जरा बरें वाटलें आतां. पण हें काय ? '

गिरिबालेला राखाल कशाविषयीं बोलतो आहे हें कांहीं कळलें नाहीं. ती प्रश्नार्थक मुद्रेनें राखालकडे पाहूं लागली. राखाल खुर्चीवरून उठत म्हणाला,

'तूं अंगांत कांहीं घातलें नाहींस ? थंडी कशी भयंकर पडली आहे ! नसेलच कांहीं. तूं तरी काय करशील ? ही शाल घे. पांघर अंगावर. '

राखालनें शाल तिच्या समोर ठेवली. गिरिबाला म्हणाली,

'मला नको कांहीं. संवय आहे मला थंडी सहन करण्याची. तुमच्याच अंगावर असूं द्या. '

'तुला संवय आहे ? कांहीं न घातलें तरी तुझी थंडी भागते ? तर मग माझीही भागली पाहिजे. मी ही शाल घेणार नाहीं अंगावर. हा स्वेटर आहे बघ माझ्या अंगांत. कानांना मफलर गुंडाळला आहे. घे ना गिरिबाले! घे ना ती शाल !'

गिरिबालेनें शाल घेऊन अंगावर पांघरली. तें पाहून आनंदानें राखाल म्हणाला,

'हां ! आतां कसें बरें वाटलें बघ मला ! अहा ! किती दिवस काढावे लागले तुम्हांला या दैन्यांत ? कसे वाईट दिवस ! घरीं खायलाही काय असेल कोण जाणे ! पगार तरी किती मिळतो बनबिहारीबाबूंना ! सगळा सत्तेचाळीस रुपये. आमच्या बाबूजींना सहाशें रुपये पगार मिळतो. तरी आईचें पोट भरत नाहीं. घरीं खायला आम्ही तिघे !

'तुमचें कसें होत असेल ? दारिद्रय किती वाईट आहे ! आतां मला कल्पना येतेय् ! एवढे दिवस मी कधींच विचार केला नाहीं याविषयींचा. काय करूं मी ? मला काय करतां येईल ? '

तोंच अघोरनाथ आंतून तयार होऊन आला. त्यानें लांब रेशमी सदरा घालून त्यावर जाकीट चढविलें होतें. शिवाय अंगावर एक शाल गुंडाळली होती.

आल्याबरोबर तो म्हणाला,

'चलायचें मोशाय. हें काय ! भाबींच्या पायांत कांहीं नाहीं ? मग रात्रीचें कसें चालवेल त्यांच्याच्यानें ? '

गिरिबाला राखालकडे पहात म्हणाली,

'मी कधींच पायांत कांहीं घातलें नाहीं. '

'आश्चर्य ! आश्चर्य ! ' अघोरनाथ आश्चर्य दाखवीत म्हणाला.

'तरीपण चालेन मी तशीच. मला संवय आहे. ' गिरिबाला उठत म्हणाली.

'चला, मोशाय. ' अघोरनाथ म्हणाला.

तीं तिघेंही बाहेर पडलीं. खाणीच्या फाटकांतून बाहेर पडतांना अघोरनाथ हळूच राखालला म्हणाला,

'तुम्हांला कुणी पाहिलें नाहीं ना ? '

'ऊं हूं. तिकडे गांवांत कुणी पाहिलें नाहीं. तुमच्या घरीं येतांना आम्ही तारेंतून आलों. '

तोंच पहारेकरी भय्या ओरडला,

'कौन है ? ' राखाल व गिरिबाला दोघेंही भयानें विवर्ण झालीं. पण अघोरनाथानें संपादणी केली, 'जागा आहेस ना भय्या ! पाहुण्यांना पोंचवायला जातोंय. घराकडे लक्ष ठेव. '

'जी हां हुजूर ! ' भय्यानें मुजरा करीत अघोरनाथाला आश्वासन दिलें.

तीं तिघें चुपचाप वाटेला लागलीं. थोड्याच वेळानें कष्टग्रामपासून आंतल्या एका खाणीपर्यंत लादिसांकरितां टाकलेली लाइन लागली. त्या लाइनीच्या कडेकडेनें तीं तिघें चुपचाप चालूं लागलीं. आकाशांत चंद्र उगवला असल्यामुळें आतां थोडेंथोडें दिसूं लागलें होतें.

गिरिबाला मनांत म्हणाली, 'जगदंबे ! या साहसांत मला यशस्वी कर ! तुझ्या आश्रयावरच मी या कामांत पाऊल घातलें आहे.'

राखाल मनांत म्हणाला, 'एकदां ठिकाणावर पोंचूं दे; मग गिरिबालेचें सगळें दारिद्र्य दूर करीन. लग्न झाल्यावर पाहीन, कोण मला काय म्हणतो तें.'

अघोरनाथ मनांत म्हणाला, 'आतां मीं बाजी मारली !'

तीन संकल्प करीत तीं तिघें एकाच वाटेनें चालली होतीं.



## १०

दुतर्फा बंगालचीं अमूप पीक प्रसवणारीं भाताचीं खाचरें पसरलीं असून त्यांच्यामधून वळणें घेत ती लादिसांकरितां टाकलेली रेल्वेलाईन जात होती. दोन दोन तीन तीन मैलांवर पांच पंचवीस झोंपडीं, पांच सात घरें, एखाद-दुसरा वाडा व दहा बारा तळीं असलेलीं छोटीं छोटीं गांवें बसलीं होतीं. यत्रतत्र ताडाचीं झाडेंही त्या शिवारांचें राखण करीत उभीं होतीं. वाऱ्याची फारशी गडबड चालली नसल्यामुळें तो सगळा पसारा अगदीं शांत होता. ताडाच्या झाडाचें पानही हलत नव्हतें.

केवळ तीं तिघेंच काय तीं एकदां वाटेस लागल्यावर झप झप पावलें टाकीत सात मैल अंतरावर असलेल्या कष्टग्रामकडे निघालीं होतीं. कोणीही कोणाशीं बोलत नव्हतें. पुढें अघोरनाथ, मध्यें राखाल व मागें गिरिबाला.

वाटेंत लाइनीशेजारीं एक भलें मोठें तळें लागलें. त्या तळ्याजवळ येतांच राखाल थबकला. तो थबकतांच गिरिबालाही थबकली. भीतीनें तिचें अंतः-

करण कम्पित झालें. राखालनें अघोरनाथाचा सदरा धरून ओढला. ती ओढ लागतांच अघोरनाथानें वळून मागें पाहिलें.

‘काय आहे, मोशाय ! ’ त्यानें हळू शब्दांत विचारलें.

‘माणसें येताहेत कुणीतरी ! ’ घाबरलेला राखाल अस्पष्ट स्वरांत म्हणाला.

अघोरनाथानें राखाल दाखवीत असलेल्या दिशेकडे बारीक नजरेनें पाहिलें. खरोखरच चार माणसें त्यांच्या दिशेनें येत होतीं. क्षणभर अघोरनाथही हादरला. पण त्यानें असें पाहिलें कीं त्या माणसांनीं आपली येण्याची दिशा बदलून तलावाकडे मोहरा वळविला आणि तलावाशेजारीं गेल्यावर आपल्या पाठीवर असलेलीं ओझीं खालीं ठेवलीं.

तें पाहून अघोरनाथ सांवरला आणि म्हणाला,

‘मोशाय, चला. ते धीवर आहेत. मासे धरायला आले आहेत तलावांत. तीं नाहीं का त्यांनीं जाळी ठेवलीं खालीं ? ’

थोडा धीर येऊन राखाल म्हणाला,

‘हो ! खरेंच ! मला उगीचच शंका आली. आज मला जरा अधिक भीति वाटते आहे. तूं भ्यायली नाहींस ना गिरिबाले ? ’

‘नाहीं. ! ’ गिरिबाला अस्फुट शब्दांत म्हणाली.

‘सुरक्षितपणें एकदां असनसोलला जाऊन पोंचलों, कीं काम झालें. चला अघोरबाबू. पाय उचलून चाललें पाहिजे जरा. ’

‘भारीच बुवा घाबरट तुम्ही मोशाय ! एवढे कां भितां, कोण जाणें ! ’

अघोरनाथ व्यंगार्थानें हंसत गिरिबालेकडे पहात म्हणाला, ‘पहा भाबी, अशा या माझ्या मित्राशीं लग्न करणार अहांत बरें का तुम्हीं ! विचार केला आहे ना पूर्ण ? ’

गिरिबालेला तें अघोरनाथाचें व्यंग बरें वाटलें नाहीं. तिनें कांहीं एक उत्तर दिलें नाहीं.

तीं तिघेंजण साडेचारच्या अंदाजांत कष्टग्रामला पोंचलीं. तिथें स्टेशनमध्यें गेल्यावर अघोरनाथ म्हणाला,

‘या, वेटिंगरूममध्यें बसूं. अजून गाडीला तासभर अवधी आहे. ’

'नको. आपण बाहेरच बसूं या. वेटिंगरूममध्यें नको.' राखालनें घाई-घाईनें उत्तर दिलें.

'बरें. तुम्ही बाहेर बसा त्या झाडाखालीं. पैसे आणले आहेत ना? द्या इकडे. मी तिकिटें काढतों.'

राखालनें पैशांचें पाकिट काढलें. लुब्ध दृष्टीनें त्याच्याकडे बघत आणि जवळ जवळ तें पाकीट राखालच्या हातून हिसकावूनच घेत अघोरनाथ म्हणाला,

'असूं दे माझ्याजवळच. म्हणजे तीनतीनदां मागायला नको.'

तो पाकीट घेऊन तिकिटें काढायला गेला. राखाल आणि गिरिबाला दोघेही एका निंबाच्या झाडाखालीं जाऊन बसलीं.

आपण काय करीत आहोंत, तें योग्य कीं अयोग्य, त्याचे परिणाम काय होतील, इत्यादि विचार करण्याची गिरिबालेची शक्ति जणूं काय लुप्तप्राय होऊन गेली होती. ती कळसूत्री बाहुलीसारखी जिकडे राखाल जाईल, तिकडे त्याच्या मागें मागें जात होती.

राखालचेंही मन भीतीनें गारठून गेलें होतें. अजून त्याच्या मनांत सुरक्षिततेचा उबारा निर्माण झाला नव्हता. तो त्या झाडाखालीं गिरिबालेच्या शेजारीं बसला खरा. पण त्याच्याही मनांत कसलेंतरी अज्ञात भय धुडगूस घालीत होतें. पुढें काय होणार आहे, याची त्यालाही चांगलीशी कल्पना नव्हती.

कांहीं वेळानें गाडीची घंटा झाली. सिग्नल पडला. अघोरनाथ त्यांच्याकडे येत म्हणाला, 'चला मोशाय्. आली गाडी. आपण एकदां गाडींत बसलों कीं सुटलों म्हणायचें; नाहीं का?'

'हो. खरोखरीच सुटलों. तुम्हांला कदाचित् कल्पना नसेल अघोरबाबू, माझ्या मनांत काय चाललें आहे तें. एकदा लग्न होऊन जाऊं दे, म्हणजे मग निर्धास्त झालों.'

तो गिरिबालेकडे पहात म्हणाला,

'मी पुरुष असून; माझें असें होतें आहे; गिरिबालेचें कसें होत असेल?'

गिरिबालेनें एकदां आर्तदृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें मात्र. ती अधिक कांहीं बोलली नाहीं. गाडी धडधड करीत स्टेशनांत आली. चढणारीं माणसें

फारशीं नव्हतीच. गाडींतही गर्दी नव्हती. त्यांना जागा मिळायला फार खटपट करावी लागली नाहीं.

गाडींत बसल्यावर मात्र राखालच्या जीवांत जीव आला. तो गिरिबालेला म्हणाला,

‘ थकलीस गिरिबाले ?’

‘ऊंहूं. ’ विमनस्कतेनें तिनें उत्तर दिलें.

‘आतां सकाळीं नऊ वाजेपर्यंत आपण असनसोलला पोंचूं. अघोरनाथबाबू आहेत आपल्याबरोबर. हे सगळी व्यवस्था करतील आपली. आतां कांहीं काळजी करूं नकोस तूं. कोणी पहात नाहीं आपल्याला आतां.’ राखाल म्हणाला.

‘तुम्ही कांहीं काळजी करूं नका. आतां आपण मार्गी लागलों. खरी भीति होती गांवांतच. पण तिथून आपण सुरक्षित आलों. आतां काय, आपल्या हातचें आहे सगळें.’ अघोरनाथ सिगारेट पेटवीत म्हणाला. त्यानें राखालपुढें सिगारेटची पेटी केली. पण ती दूर सारीत राखाल म्हणाला,

‘ऊं हूं ! मला नको.’

‘कां ? सोडलें कीं काय सिगारेट पिणें ?’अघोरनाथ आश्चर्यानें म्हणाला.

‘हो. तसेंच का म्हणाना ! ’ राखालनें गिरिबालेकडे सहेतुकपणें पहात उत्तर दिलें.

‘अस्सें अस्सें ! वा वा ! छान. हीं व्यसनें कांहीं फारशीं चांगलीं नाहींतच. मीही हें सगळे सोडून देण्याच्या विचारांत आहे बरें का !’ अघोरनाथानें समयज्ञतेनें उत्तर दिलें.

पुनः मग कोणी बोललें नाहीं. गाडी सारखी पुढें पळत होती. प्रत्येक स्टेशन येई, गाडी थांबे, तिथून पुढें निघे. सहा साडेसहाला उजाडूं लागलें. प्रत्येक स्टेशनावर कोणी ओळखीचा तर भेटत नाहीं ना, या आशंकेनें राखालचें हृदय धडधडूं लागे. तो तोंडाभोंवतीचा मफलर चांगला गुंडाळून घेत बाहेर न पाहतां बसला राही. शेवटीं साडेसातला गाडी ओंडल जंक्शनवर जाऊन उभी राहिली.

अघोरनाथ उठून आळस देत म्हणाला,

'चला, दीड तास प्रवास आणखी, कीं पोंचलों आपण ठिकाणावर. थांबते इथें गाडी जवळ जवळ पंचवीस मिनिटें. चला, खालीं उतरून तोंडबिड धुवूं.'

'नको बुवा. मी थांबतों गाडींतच.' राखाल म्हणाला.

'ऊं: ! मोशाय, तुम्ही भारीच बुवा भितां ! एवढें भिऊन कसें भागतें हो ! चला, कोणी नाहीं कांहीं बोलत. मी आहे ना बरोबर ? चला.'

त्यानें जवळ जवळ राखालला खालीं ओढलेंच. राखाल असंतुष्टतेनें उठत गिरिबालेला म्हणाला,

'आम्ही बाहेर जाऊन येतों. तूं बसतेस इथें ? कीं आमच्याबरोबर खालीं येतेस !'

'नको. मी इथेंच बसतें. तुम्हीं कुठें दूर जाऊं नका हं ! लवकर परत या.' गिरिबाला व्याकुळपणें म्हणाली.

ते दोघे डब्यांतून खालीं उतरले. ओंडल हें अलाहाबाद–कलकत्ता लाईन-वरील एक बऱ्यापैकीं जंक्शन. कलकत्त्यास जाणाऱ्या एक्सप्रेसची वेळ झालीच होती. पलीकडील प्लॅटफॉर्मवर उतारू गाडीची वाट पहात उभे होते. घंटी होऊन गेली होती.

हे दोघे खालीं उतरल्यावर अघोरनाथ म्हणाला,

'मोशाय, नळ पलीकडे आहे. आपल्याला पलीकडे गेलें पाहिजे.'

हें वाक्य उच्चारतां उच्चारतांच तो रुळावरील पुलाकडे चालूं लागला. राखालनें मुकाटयानें त्याचें अनुकरण केलें. पलीकडे गेल्यावर त्या दोघांनीं नळावर तोंडें धुतलीं. खिशांतील रुमालास तोंड पुशीत अघोरनाथ म्हणाला,

'रात्रीं निघायच्या गडबडींत पोटभर जेवणही झालें नाहीं. अशी सपा-टून भूक लागली आहे आतां ! चला. कांहीं थोडेंसें खाऊनपिऊन घेऊं. काळजी करूं नका तुम्ही. गिरिबालेला आतां कोणी पळवून नेत नाहीं !'

ती अनिष्ट कल्पना ऐकतांच राखाल चमकला. मिस्किलपणें त्याकडे पहात आणि हंसत अघोरनाथ म्हणाला,

'मोशाय, कसें होणार पुढें तुमचें ? कोणीही कल्पना बोलून दाखविलेली जर तुम्हांस सहन होत नाहीं, तर मग जर ती प्रत्यक्षांत आली, तर तुम्ही काय कराल ?'

व्याकुळपणें त्याच्याकडे पहात आणि हात हलवीत राखाल म्हणाला,

'नाहीं, नाहीं. बाबू ! तुम्हांला कल्पना नाहीं, तिनें माझ्याकरितां काय सोडलें आहे तें ! ती माझा जीवनाधार बनली आहे हो ! तुम्हांला नाहीं वाटत हें ? माझ्यांत फरक झाला आहे, हें तुम्हांला नाहीं पटत ? नाहीं तर मी सिगारेट एवढी सहजपणें सोडली असती ? बाबू तुम्हांला जर मी अंतःकरण उघडून दाखवू शकलों तर तुम्हांला कळेल, तिनें माझ्या मनांत केवढें मोठें स्थान मिळविलें आहे तें ! ती थंडी सहन करू शकते, ती चपलांवांचून चालू शकते, तिला फाटक्या साड्या नेसाव्या लागतात, तिला घरीं कदान्न खावें लागतें ! आणि आपल्या घराची लाज सुरक्षित ठेवावी म्हणून ती हें सगळें मुकाट्यानें, तोंडांतून एक शब्दही न काढतां पिऊन जाऊं शकते ! तिनें अगदीं सहजपणें सांगितलें, मला थंडी सहन करायची संवय आहे म्हणून !

'अघोरबाबू ! हें सगळें कोणीही गरीब करूं शकतो, असें तुम्हीं म्हणाल. पण तिचे गुण ! तिचा विनय ! तिचा संयम ! तिची शालीनता !

'मी वेडा होईन हो ! जर तुम्ही म्हणतां तसें कांहीं अनिष्ट झालें, तर, अघोरबाबू, मी खरोखरच वेडा होईन ! '

दुष्टपणें हंसत त्याच्या पाठीवर थाप मारीत अघोरनाथ म्हणाला,

'चला ! तुम्हांला भाषणें चांगलीं छान करतां येतात. चांगले कुशल नट किंवा पुढारी व्हाल तुम्ही. मला भूक लागली.'

अघोरनाथानें त्याचा हात धरून ओढीत त्यास टीस्टॉलमध्यें नेलें आणि दोन गरम चहा, दोन प्लेट चमचम आणि चिवडा, अशी ऑर्डर दिली.

हें सामान येईपर्यंत त्या प्लॅटफॉर्मवर एक्स्प्रेस येऊन उभी राहिली. एक्स्प्रेस माणसांनीं खच्चून भरली होती. त्यांतच या स्टेशनवरचीं माणसेंही कशींबशीं खिडक्यांतून आंत शिरलीं.

अघोरनाथाच्या मुद्रेवर थोडीशी अस्वस्थता चमकून गेली. पण दुसऱ्याच क्षणीं पूर्वप्रकृतीवर येत एकदम आठवल्यासारखें करून तो चहाचा पेला खालीं ठेवीत राखालला म्हणाला,

'अरे ! आपण तर खाऊन घेऊं. पण गिरिबालेला विचारलेंच नाहीं ! तुम्ही थांबा इथें. माझा चिवडा सांभाळा बरें ! नाहींतर खाऊन टाकाल ! मी आत्तां विचारून येतों तिला. '

एवढें बोलणें संपवून राखालच्या उत्तराची वाटही न पाहातां अघोरनाथ

घाईघाईनें निघून गेला. राखाल धर्मसंकटांत सांपडल्यासारखा त्याच्याकडे पहात हातांत चहाचा पेला धरून उभा राहिला. गिरिबालेला अगोदरच विचारून आलों असतों तर बरें झालें असतें, असें त्याला वाटूं लागलें.

ते दोघे डब्यांतून खालीं उतरले आणि गिरिबालेला आत्मनिरीक्षण करण्यापुरती सधी मिळाली. डब्यांतील इतर लोकही गाडीस बराच वेळ आहे, हें पाहून खालीं उतरले.

डबा मोकळा झाला, हें पाहून गिरिबालेला बरें वाटलें. खरोखर तिला थोडा एकांत हवा होता. तो मिळाला, हें पाहून ती जाग्यावरून उठली आणि प्लॅटफॉर्मच्या दुसऱ्या दिशेकडे खिडकींतून तोंड काढून उभी राहिली. त्या बाजूला प्लॅटफॉर्मवर तोंड धुवीत असलेले राखाल व अघोरनाथ तिला दिसले. त्यांस पाहून तिच्या मनांत परत विचारचक्र सुरू झालें.

'सुटलीं सगळीं !

'आई सुटली, बाबूजी सुटले, विपिन सुटला, हेमू, मृणालिनी, तारा, आभा, घर, गांव, सगळें सगळें सुटलें. मी एकटी चाललें आहें.

'कुठें ?

'कोण जाणे ! कुठें जायचें, काय करायचें, काय होईल, कसें होईल, मला कांहींही माहीत नाहीं. एवढें सुद्धां माहीत नाहीं मला.

'हा एकच तंतु आहे. हे मला जीव कीं प्राण करतात. रात्रीं मला आग्रहानें शाल घ्यायला लावली त्यांनीं अन् म्हणाले, 'जर तू थंडी सहन करूं शकतेस, तर मग मीही करूं शकतों !' मला असें वाटलें त्या वेळीं, कीं त्यांच्या पायावर लोटांगण घेऊन म्हणावें, तुम्ही माझे स्वामी अहांत जन्मोजन्मींचे !

'यांच्याबरोबर जात आहें मीं. ते नेतील तिकडे. ते माझें एवढेंही अनिष्ट करायचे नाहींत. माझी खात्री आहे.

'पण हे कुठें निघाले दोघे ? '

तिनें शंकित मनानें दोघांकडे बघितलें. ते दोघेजण टीस्टॉलजवळ जाऊन थांबले. तें पाहून ती परत स्थिरावली आणि मनांत म्हणाली,

'ऊं हूं ! मला सोडून हे कुठेंही जाणार नाहींत. ते माझे आहेत ! सर्वस्वी माझे ! '

तोंच धुराचे लोट सोडीत आणि धसधस करीत एखाद्या म्हशीसारखी एक्सप्रेस येऊन पलीकडील प्लॅटफॉर्मवर उभी राहिली आणि ते दोघेजण तिला दिसेनासे झाले. मग ती परत आपल्या ठिकाणावर येऊन बसली.

पांच मिनिटें झालीं. तोंच अघोरनाथ घाईघाईनें डब्यांत शिरला आणि म्हणाला,

‘ अहो भाबी ! बसलांत काय ? उठा लवकर ! ’

‘ कुठें ? ’ घाबरून जाऊन ती म्हणाली.

‘ अहो, सगळा बेत फिरला. कलकत्त्याला जायचें ठरलें. या राखाल-मोशायांचें हें असें आहे. अगोदर एक ठरवायचें अन् आयत्या वेळीं दुसरें ! एक्स्प्रेस आल्यावर मग त्यांना कलकत्त्याला जायचें स्फुरलें. ’

‘ मग हे कुठें आहेत ? ’

‘ ते बसले एक्स्प्रेसमध्यें. मला म्हणाले, मी जागा धरतों, तूं भाबींना घेऊन ये. अरे ! शिटी झाली ! चला चला ! इकडूनच चला आतां ! चला भाबी, नाहीं तर गाडी गेली ! ’

त्यानें पटकन् पलीकडील दार उघडलें आणि स्वत: खालीं उतरून गिरि-बालेलाही उतरून घेतलें. अनिच्छेनें गिरिबालेस त्याच्या हातास स्पर्श करावा लागला. ती खालीं उतरल्यावर बावरून जाऊन म्हणाली,

‘ कुठे बसायचें ? ते कुठें बसले ? ’

तिला जवळ जवळ ओढींतच अघोरनाथ म्हणाला,

‘ चला, मोशायांना शोधून काढूं मग. गाडी निघाली. ’

सगळी गाडी चिक्कार भरली होती तरी एका डब्याच्या पायऱ्यावरून गिरिबालेला वर चढवीत अघोरनाथानें तिला एका खिडकींतून आंत लोटलें आणि आपण दांडगाईनें आंत शिरतो आहे, तों गाडी सुरू झाली !

आंत कशीबशी उभी रहात गिरिबाला साश्रु नयनांनीं अघोरनाथाला म्हणाली,

‘ ते कुठें आहेत ? ’

तिला समजावीत अघोरनाथ म्हणाला,

“ भाबी, वेड्या अहांत का तुम्ही ? गाडी सुरू झाली म्हणून आपल्याला कुठेंतरी बसावें लागलें. गाडींत गर्दी किती आहे, हें तुम्ही पहातच अहां.

कशीबशी जागा मिळाली आपल्याला. पुढील स्टेशनवर शोधीत येथील मोशाय आपल्याला नाहींतर कलकत्ता स्टेशनवर भेट होईल आपली. तुम्ही काळजी करूं नका एवढीशीही. ते या गाडींत बसले आणि मगच त्यांनीं मला पाठविलें. मी तुमच्या ओळखीचाच आहे ना ? कुणी परका तर नाहीं ना ? मग गप रहा तुम्ही. '

गिरिबाला कांहीं बोलली नाहीं; पण तिच्या डोळ्यांतून चालणारा अविरत अश्रुप्रवाह मात्र कांहीं थांबला नाहीं. तिला वाटलें, पायाखालची जमीन घसरून चालली आहे. ज्याचा ती तिरस्कार करीत होती, त्याच्याबरोबर ती जें गांव कधीं पाहीलें नाहीं अशा ठिकाणीं निघाली होती. तो असें सांगत होता कीं तिचा सखा याच गाडींत बसला आहे. यावर शंका घ्यायचीही सोय नव्हती. तें खोटें आहे, असेंही म्हणण्याचें साहस तिला करवत नव्हतें. पण तिच्या मनाच्या अगदीं अंतर्भागांतून एक बारीकसा ध्वनि नेटानें तिला असें सांगत होता,

' हें खोटें आहे, अगदीं खोटें आहे ! '

पांचसात स्टेशनें गेल्यावर गाडी उभी राहिली. त्या स्टेशनवर गाडी पोंचल्यावर गिरिबाला काकुळतीनें अघोरनाथाला म्हणाली,

'अजून नाहीं आले ते ? पहा ना त्यांना ! '

पण त्या स्टेशनवरही इतकी गर्दी गाडींत शिरली, कीं अघोरनाथ कांहीं डब्याच्या त्या बाजूला जाऊं शकला नाहीं. त्याला खरोखरच जायचें असतें, तर तो जाऊंही शकला असता. ज्यानें गिरिबालेला डब्यांत शिरविलें, त्या धिप्पाड अघोरनाथाला हें कांहीं अशक्य नव्हतें. पण त्याला नुसतें नाटकच वठवायचें होतें, तें त्यानें भांडण उपस्थित करून उत्कृष्ट वठविलें. पलीकडील प्लॅटफॉर्मच्या बाजूला जातां जातां त्यानें एका बर्थवरील होल्डॉलखालीं बसलेल्या एका किरकोळ बाबूच्या अंगावर पाडला. तो बाबू इतर दुर्बल माणसांसारखाच तोंडाळ असल्यानें जोरजोरानें अघोरनाथाशीं भांडूं लागला. अर्थात् अघोरनाथाच्या अंगावर चालून यायची त्याला हिंमत नव्हती. तें भांडण चांगलें तास दीडतास पुरलें. खरें बोलायचें, तर अघोरनाथानें पुरविलें. राहून राहून त्या विझत असलेल्या कलहाग्नींत तो मूठभर गवत टाकून द्यायचा. शेजारीं बर्थला लोंबकळून उभा असलेल्या माणसास तो म्हणाला,

'सांगा बघूं आतां तुम्हीच ? या माझ्या मित्राच्या पत्नी. ते गाडींत दुसरीकडे कुठेंतरी बसले आहेत. भेटतीलच ते. हावऱ्याला तर निश्चितच भेटतील. पण या आमच्या भाबींना कांहीं धीर निघत नाहीं. त्या वारंवार मला त्यांना पहायला सांगताहेत. गर्दी कशी ती तुम्ही पहातां अहांत. माणसाला माणूस खेटून उभें आहे. मुंगीला शिरायला रीघ नाहीं. आतां यांना राहवत नाहीं त्यांच्यावांचून, म्हणून मी पलीकडे जाऊं लागलों. होल्डॉल मजबूत ठेवला असेल, म्हणून त्याला धरायला गेलों, तर खालीं पडला !

'आतां तुम्हीच न्याय करा ! प्रवासांत या गैरसोई सहन केल्याच पाहिजेत. तर हा काटकुळा सुदामदेव भांडायलाच उठला ! '

मग डब्यांतील चार शिष्टांनीं असा निर्णय दिला, कीं ज्या अर्थीं गिरिबालेचा पति राखाल गाडींत बसला आहे, त्या अर्थीं अशा गर्दींत अघोरनाथानें त्याला पहायचे कष्ट करूं नयेत. तोंपर्यन्त गिरिबालेनेंही उगीच आंसवें ढाळूं नयेत आणि त्या किरकोळ बाबूनेंही आतां भांडण अधिक न वाढवितां गप्प बसावें.

गिरिबालेवर हा निर्णय तिला न विचारतांच लादला गेला. अघोरनाथही पडत्या फळाची आज्ञा घेऊन अति संतुष्ट वृत्तीनें डब्यांतील लोकांना सिगारटस् वांटीत उभा राहिला.

जसें कोणीं तोंड दाबून धरून खूप बुकलून काढावें तशी गिरिबालेची स्थिति झाली. चार पांच स्टेशनानंतर गाडी उभी राहिली, कीं ती डोळ्यांत प्राण आणून पलीकडील प्लॅटफॉर्मकडे राखालची वाट पहात असे; पण गाडींत इतके लोक शिरत कीं त्यांच्या त्या दाटींतून तिला पलीकडील प्लॅटफॉर्म दिसतही नसे. शेवटीं या गर्दीमुळेंच राखाल आपणास शोधून काढण्यास असमर्थ ठरला असेल, अशी मनाची समजूत करून घेऊन ती डोळे मिटून स्वस्थ उभी राहिली.

अखेरीस हावरा स्टेशन आलें. गाडी दडदड करीत स्टेशनांत शिरली आणि स्टॉपर्सजवळ जाऊन खुंटावर आलेल्या म्हशीसारखी निमूटपणें उभी राहिली.

उतरण्याची गडबड सुरू झाली. हमाल फराफर ट्रंका ओढूं लागले. लोकांनीं आपापलें सामान मोजीत बाहेर काढलें. आणि डबा रिकामा झाल्यावर प्रसन्न मुद्रेनें अघोरनाथ गिरिबालेला म्हणाला,

‘ या भाबी ! उतरा खालीं. ’

गिरिबाला खालीं उतरली. तो असंख्य माणसांचा समुदाय पाहून ती गांगरून गेली.

‘ आतां तरी पहाना त्यांना ! ’ तिनें डोळ्यांत पाणी आणून अघोरनाथास विनविलें.

आळस देत आणि हंसत तो म्हणाला,

‘ भाबी , हा माणसांचा समुद्र पहा. आतां यांतून मी राखाल मोशायांना शोधून काढूं म्हणतां ? परत तुमची माझी चुकामूक झाली तर ? आपण इथेंच उभे राहूं. नाहीं तर आपण असें करूं. त्यानीं उतरायचा पत्ता मला सांगितला आहे. आपण त्या पत्त्यावर जाऊं. राखाल मोशाय सरळ तिथें येतील. त्यांनीं मला तेंही सांगून ठेवलें आहे. मग काय करतां ? माझी दोन्हीलाही तयारी आहे. ’

‘ चला ! कांहीही करून त्याची माझी भेट करवा म्हणजे झालें! अनंत उपकार होतील तुमचे माझ्यावर ’ असें म्हणत गिरिबाला अघोरनाथामागें चालूं लागली.

• • •

# ११

गिरिबाला कलकत्त्याला अगदीं प्रथमच येत होती. एवढें मोठें स्टेशन, इतकीं माणसें, एवढा गलगा तिनें कधींच पाहिला नव्हता. त्यामुळें गांगरून जाऊन ती अघोरनाथाच्या अगदीं पाठोपाठ चालूं लागली. प्लॅटफार्ममधून ती बाहेरच्या वेटिंगरूममध्यें आली. तिथें अनेक स्टॉल्स, मिठाईचीं दुकानें, तिकिट ऑफिसें होतीं, आणि या सगळ्या ठिकाणीं ते ते व्यवहार करणाऱ्या लोकांची नुसती तोबा गर्दी उडाली होती. कोणाचेंच कोणाकडे लक्ष नव्हतें. प्रत्येक जण आपापल्या कामांत मग्न होता.

गिरिबालेलाही या गर्दीकडे लक्ष देण्यास सवड नव्हती. ‘राखालबाबू आले आहेत ना ? मी त्यांच्याकडेच जात आहें ना ? हे अघोरनाथ मला यांच्याकडेच नेत आहेत ना !’ अशा अनेक शंका तिच्या मनांत वारंवार निर्माण होत होत्या. पण अघोरनाथानें टाकलेल्या जाळ्यांत सांपडलेली ती मासोळी अघोरनाथामागें निमूटपणें चालली होती.

बाहेर येतांच तिला कलकत्त्याचें भव्य स्वरूप दिसलें. गगनचुंबी इमारती, ट्रम्स, टॅक्सीस्, बसेस्, व्हिक्टोरिया, डांबरी रस्ते, पोलीस, माणसें, ती जें जें पाही, तें तें तिल अगदीं नवीन होतें. ती भांबावून जाऊन अघोर-नाथास म्हणाली,

‘ आपण त्यांच्याकडेच चाललों आहोंत ना हो ? ’

एखाद्या नटासारखा अघोरनाथ गर्रकन् मागें फिरून त्यानें आपले दोन्ही हात कमरेवर ठेवले आणि म्हणाला,

‘तुम्हांला शंका येते का भावी ? मी तुम्हांला भलतीकडे नेत आहें, असें वाटतें का तुम्हांला ? राखाल मोशाय निश्चित गाडींतून उतरले आहेत, आणि आपण जिथें जात आहों, तिथेंच ते येऊन पोंचले असतील किंवा थोड्या वेळानें पोंचतील. त्यांनींच मला त्या ठिकाणचा पत्ता सांगितला आहे. मला तें ठिकाण बरोबर माहीत आहे. यावर तुमचा विश्वास नसेल, राखालमोशायना तुम्हांला भेटायचे नसेल, तर मग परत चला. मी तुम्हांला गोलगांवीं नेऊन पोंचवितों. पुढलें तुमचें तुम्ही पाहून घ्या!’

त्याचें हें नाट्यपूर्ण भाषण कल्पनेपलीकडे यशस्वी झालें. गिरिबाला गडबडून जाऊन त्याला म्हणाली,

‘नाहीं, नाहीं ! माझ्या मनांत तुमच्याविषयीं शंका नाहीं. चला, ते असतील तिथें घेऊन चला मला.’ विजयी वीराप्रमाणें अघोरनाथ पुढें चालूं लागला.

‘बाबू! व्हिक्टुरिआ !’ एका व्हिक्टोरियावाल्यानें हातांतला चाबूक फटकवीत त्याच्या समोर व्हिक्टोरिया उभी करून त्याला विचारलें.

“नाहीं मांगता ! ” ताठरपणें त्याला उत्तर देत अघोरनाथ जिथें टॅक्सीज उभ्या होत्या, तिथें गेला. त्याला पहातांच दोनचार टॅक्सीवाले त्याच्या भोंवतीं गोळा झाले. अघोरनाथानें एकाला कांहींतरी हळूहळू सांगितलें

" एस् सर ! " असें म्हणत आणि बाकीच्या टॅक्सीवाल्यांकडे डोळे मिचकावून पहात तो टॅक्सीवाला आपल्या टॅक्सींत जाऊन बसला. टॅक्सीचें मागील दार उघडीत अघोरनाथानें गिरिबालेस म्हटलें,

' बसा, भाबी. '

गिरिबाला बसल्यावर तिच्या शेजारीं अघोरनाथही बसला व त्यानें टॅक्सीचें दार लावून घेतलें. ज्या ठिकाणीं टॅक्सी जाणार होती, त्या ठिकाणचें नांव ऐकून आणि गिरिबालेला पाहून टॅक्सी सुरू होतांना त्या दोनचार टॅक्सीवाल्यांनीं डोळे मिचकावीत एका अभद्र शब्दाचा उच्चार केला. अघोरनाथानें तो शब्द ऐकला. गिरिबाला विचारांच्या धुंदींत असल्यामुळें त्याकडे तिचें लक्ष गेलें नाहीं.

टॅक्सी सुरू झाली. कुठें ट्रामच्या मागोमाग ट्रामच्याबरोबर थांबत, कुठें ट्रामचा रस्ता सोडून, कुठें पूल ओलांडीत, कुठें व्हिक्टोरियांना बाजूस टाकीत त्या माणसांच्या असीम समुदायांतून ती धांवत होती.

अनेक वळणें व वळसे घेत मग टॅक्सीनें ट्रामरस्ता सोडून दिला आणि ती गल्ल्यांमध्यें शिरली. तिथेंही तिनें पांच सहा वळणें घेतलीं आणि मग एका ठिकाणीं थांबून टॅक्सीवाल्यानें विचारलें,

' बाबूजी, यहाँ ? '

' हॉं ! थोडा आगे ! वो बडा मकान हाय्, बहुत बडा, उसके सामने ! '

वीस पंचवीस पावलें टॅक्सी नेऊन मग टॅक्सीवाल्यानें ती थांबविली. अघोरनाथानें खिशांतून पाकीट—राखालचें—काढीत त्या नोटांनीं गच्च भरलेल्या पाकिटांतून एक दहाची नोट काढून टॅक्सी-ड्रायव्हरच्या हातावर ठेवली. ड्रायव्हरनें खूष होऊन बाबूस सलाम केला आणि पटकन् खालीं उतरून टॅक्सीचें मागील दार उघडलें.

' उतरा, भाबी. ' अघोरनाथ म्हणाला.

' इथेंच उतरायचें ? ' दीनवाण्या गिरिबालेनें विचारलें, ' इथेंच भेटतील ते ? '

' हो, इथेंच भेटतील. उतरा. '

गिरिबाला सोत्कंठ मनानें खालीं उतरली. उतरल्यावर तिनें पाहिलें, कीं आपण एका खूप मोठ्या चाळीसमोर उभ्या आहोंत आणि वरील

मजल्यांच्या गॅलऱ्यांतून अनेक तरुणी आणि प्रौढा फिदीफिदी हंसत आणि पानांच्या पिचकाऱ्या टाकीत आपणाकडे बघत आहेत. चहूं बाजूंनाही तशाच इमारती आहेत. सगळे रस्ते कोंबडींचीं पिसें, बकऱ्याचीं हाडें, तांबड्या भडक पिचकाऱ्या, यांनीं भरून गेले आहेत.

गिरिबालेला तें सर्व वातावरण पाहून गरगरल्यासारखें झालें. तिनें परत अघोरनाथाला विचारलें,

' खरेंच ते इथें भेटतील ? '

' तुम्ही वर चला पाहूं ! किती वेळां सांगितलें तुम्हांला ते इथें भेटतील म्हणून ! ज्यांना आपण भेटायला आलों, ते इथेंच भेटतील. चला वर. '

भित्र्या हरिणीसारखी इकडे तिकडे पहात गिरिबाला अघोरनाथामागें त्या चाळींत शिरली. चाळीच्या तोंडाशींच एक खाट टाकून एक स्थूल प्रकृति लुंगी नेसलेला व अंडरवेअर घातलेला मनुष्य बसला होता. त्यानें अघोरनाथाला ओळखलें. तो त्याच्याकडे आणि गिरिबालेकडे पहात हंसत म्हणाला,

' अच्छा अच्छा ! आप हैं ! आहेत ते वर. जा तुम्हीं. '

गिरिबालेला ते वर आहेत, हें ऐकून धीर आला. आपल्या अगोदर राखालबाबू इथें कसे येऊन पोंचले, याविषयीं आश्चर्य करीत ती अघोरनाथामागें वर निघाली.

त्या चाळीचे जिने विलक्षण होते. एका जिन्यानें वर चढल्यावर तेथून वर जाणाऱ्या जिन्याकरितां बरींच वळणें घ्यावीं लागत. तीन जिने चढून तीं दोघें चौथ्या मजल्यावर जाऊन पोंचलीं. दोनतीन वळणें घेतल्यावर त्या दोघांनीं एका खोलींत प्रवेश केला.

आंत लुंगी नेसलेला नुरुद्दीन हुक्का ओढीत एका तक्याशीं टेकून पडला होता !

अघोरनाथाला आणि गिरिबालेला पाहिल्याबरोबर तो पटकन् उठत म्हणाला,

' आइये ! आइये ! अघोरनाथबाबू ! आपकी तशरीफ यहाँ ले आइये ! '

गिरिबाला त्या खोलींत राखाल ऐवजीं नुरुद्दीनला पाहून बावरली. ती भित्र्या डोळ्यांनीं अघोरनाथाकडे पहात उद्गारली,

' ते तर कुठें दिसत नाहींत ! कुठें आहेत ते ? '

अघोरनाथ डोळ्यानें खुण करीत नरुद्दीनला म्हणाला.

'या राखालमोशायविषयीं विचारीत आहेत.'

नुरुद्दीन ती खूण उमगून म्हणाला,

'राखाल मोशाय ना ? ते नुकतेच बाहेर गेले. जातांना यांना निरोप ठेऊन गेले कीं, 'मी अर्ध्या पाऊण तासांत परत येतों. तोंवर कपडेबिपडे बदलून तोंड धुवून घे !' ते कांहीं पुढच्या व्यवस्थेकरितां गेले आहेत वाटतें. इकडे या माझ्याबरोबर. तुम्हांला बाथरूम वगैरे दाखवितों.'

आशा अमर असते. तें सगळें गिरिबालेला खरेंच वाटलें. तेथील एकंदर वातावरण पाहून तिला पराकाष्ठेची अस्वस्थता वाटूं लागली होती. पण अमरत्वाबरोबरच वेडेपण, हा जो आशेच्या अंगीं असणारा गुण त्याला बळी पडून ती नुरुद्दीनच्या मागें निघाली.

त्यानें शेजारच्या खोलीचें दार उघडलें आणि आंत शिरत म्हणाला,

'सजनी ! या बाई चांगल्या मोठ्या घरच्या आहेत. यांचे पति बाहेर गेले आहेत, थोड्या वेळानें परत येतील. तोंपर्यंत यांना एक चांगली साडी, पोलकें, हें सगळें दे. खावयालाही दे यांना कांहींतरी.' असें म्हणून त्यानें डोळ्यानें खूण केली.

त्या खोलींत एक मच्छरदाणीनें आवृत्त पलंग होता. त्या पलंगावर पान खात तथाकथित सजनी बसली होती. वय अंदाजें तीस वर्षें. एक झकपक साडी नेसलेली. दिसायला बरी. डोळ्यांत काजळ. कानांत इयरिंगस्. खुणेचा अर्थ समजून ती म्हणाली,

'असूं दे. मी सगळें करतें. या बाई !' नुरुद्दीन दार बंद करून निघून गेला.

एका बाईला पाहून गिरिबालेला थोडासा धीर आला. तिला जरी त्या सजनीचा तो पेहराव, ते डोळ्यांतलें काजळ, तो पलंग हें सगळें पाहून कसेंसेंच वाटलें, तरी गोलगांव सोडल्यापासून तिला एवढ्या जवळून बोलावणारी ती पहिलीच स्त्री होती.

'या इकडे अशा.' सजनीनें एक चटई अंथरून गिरिबालेला नेऊन चटई-वर बसविलें.

'तुम्ही काय करतां इथें ?' अचानक गिरिबालेनें प्रश्न केला.

'मी काय करतें ?' असें म्हणत आणि गिरिबालेकडे निरखून पहात

सजनी हंसूं लागली गिरिबाला गोंधळल्यासारखी सजनीकडे पाहूं लागली. अधिकच हंसत सजनी म्हणाली,

'मी इथल्या आश्रमाची व्यवस्थापक आहें.'

'कसला आश्रम ?'

'माहीत नाहीं तुम्हांला ? हा महिलाश्रम आहे.'

गिरिबालेचें तेवढया उत्तरानें समाधान झालें. तें पाहून सजनी उठून तिच्याजवळ आली आणि तिची हनुवटी उचलून तिच्याकडे पहात तिला म्हणाली,

'भोळी पोर ! कुठून आलीस बाई तूं ! नांव काय तुझें ?'

'गोलगांवाहून आलें मी. गिरिबाला सरकार माझें नांव.'

'कुठं आहे हें गोलगांव ?'

'वीरभूम जिल्हयांत.'

'कोणी आणलें तुला इथें ?'

गिरिबाला किंचित् संकोचली. नंतर ती म्हणाली,

'यांनीं आणलें. हे बाहेर गेले आहेत ना ? त्यांनीं. त्यांची आमची चुकामूक झाली. ते दुसऱ्या डब्यांत बसले, आम्ही दोघें दुसऱ्या डब्यांत.'

'तुम्ही दोघे कोण कोण ?'

'मी अन् आमच्या खाणींतले अघोरनाथबाबू.'

'अस्सें ! अघोरनाथानें आणलें तुला इथें ?' क्षणमात्र सजनीचे डोळे चमकले. पण पुन: ती म्हणाली, 'बरें तर. तूं ऊठ पाहूं ! अगोदर तोंड धू. कपडे बदल. तूं कायस्थ ना ? खायला देतें तुला, तें खाऊन घे. मग आपण बोलत बसूं.'

गिरिबाला उठली. तिनें शौचमुखमार्जन आटपलें. मग सजनीनें तिला एक तलम मलमलची साडी काढून दिली. ती साडी पाहून गिरिबाला संकोचून म्हणाली,

'ही साडी नेसूं ?'

'कां ? नेस ना ! अगदीं कोरी आहे ती. कुणीही नेसलें नाहीं ती साडी.'

मग गिरिबाला ती साडी नेसली. सजनीनें काढून दिलेला एक ब्लाउझ तिनें अंगांत घातला. मूळचीच सुंदर पोर, चांगले व्यवस्थित कपडे ल्याल्यावर

अधिकच सुंदर दिसूं लागली. सजनीनें एका बशींत मिठाई आणि थोडें पाणी तिच्यापुढें ठेवलें आणि तिच्या शेजारीं बसत तिला म्हणाली,

'नांव काय तुझें म्हणालीस ?'

'गिरिबाला.'

'घरीं कोण कोण आहे तुला ?'

गिरिबालेनें आपलें सगळें वृत्त तिला सांगितलें. मधून मधून सजनी तिला प्रश्न विचारीत असे. गिरिबालेची ती हृदयस्पर्शी कहाणी ऐकून त्या अभिसारिका सजनीचेंही मन द्रवलें. सगळी कहाणी संपल्यावर तिनें गिरिबालेला विचारलें,

'अन् मग तूं राखालबाबूंच्या बरोबर इथें आलीस म्हणतेस ?'

'हो. त्यांच्याच बरोबर.'

'पण राखालबाबू इथं —'

दार उघडलें आणि नुरुद्दीन आंत पहात म्हणाला,

'राखालबाबू आले आहेत.'

ताड्कन् गिरिबाला उठली आणि घाईघाईनें बाहेर जात म्हणाली,

'कुठें आहेत ते ?'

'या इकडे, माझ्याबरोबर.'

बाहेर अघोरनाथही उभा होता. नुरुद्दीन, अघोरनाथ व गिरिबाला तिघेंही एकापाठोपाठ नुरुद्दीनच्या खोलींत शिरलीं.

ती खोली आतां अधिक व्यवस्थित केली होती. आंत एक जाजम खोलीभर अंथरून तिच्यावर भिंतीशीं एक गालिचा टाकला होता. त्या गालिच्यावर एक गादी व लोड ठेवलें होतें. एक नक्षीदार काम केलेला हुक्का शेजारींच ठेवला होता.

त्या लोडाशीं टेकून एक जाडा, काळा, टमाटोसारख्या नाकाचा, कोरीव मिशा व दाढी ठेवलेला व पायींच्या विजारीवर सिल्कन् शर्ट आणि सिल्कन्चाच कोट घातलेला गृहस्थ बसला होता. हेंचं गिरिबालेचें गिऱ्हाईक ! लोखंडी सामानाचा बडा व्यापारी म्हणून ज्यांचा उल्लेख नुरुद्दीननें अघोरनाथाजवळ केला होता, तेच हे एक सुंदर पोरगी पाहिजे असलेले गृहस्थ.

गिरिबाला आंत आली आणि तिनें चौफेर खोलींत बघितलें. तिला राखाल

कुठें दिसला नाहीं ! तिनें अतिव्याकुळ होऊन अघोरनाथाजवळ जात त्याला विचारलें,

'ते कुठें आहेत ?'

क्रूरपणें हंसत अघोरनाथ म्हणाला,

'कोण हवें आहे तुला, गिरिबाले ?'

'ते ! मधूबाबूंचे पुत्र !'

'तो गेला असेल परत गोलगांवला ! भित्रें पोर तें ! मीं ज्यांना भेटण्याकरितां तुला इथें आणलें, ते हे इथें बसले आहेत. खूप श्रीमंत आहेत हे. तुझें जन्माचें दारिद्र्य फिटलें म्हणून समज.'

गिरिबाला विद्ध हरणीसारखी त्या शेटजीकडे पाहूं लागली. तो भुकेल्या लांडग्यासारखा तिच्याकडे बुभुक्षित नजरेनें बघत जिभल्या चाटीत म्हणाला,

'लाजवाब काम है नुरुद्दीन ! तबियत एकदम खुष हो गई ! एकदम कोरा माल ना हा ?'

कृतकृत्य अघोरनाथ म्हणाला,

'अगदीं कोरा !'

विजेसारखी गिरिबाला अघोरनाथाच्या पायांवर येऊन पडली आणि हृदय पिळवटून टाकणारा आक्रोश करीत ती त्यास म्हणूं लागली,

'अघोरनाथबाबू ! माझा असा गळा कापूं नका हो ! तुम्ही मला बाबूजींसारखे अहांत ! मला त्यांच्याकडे घेऊन चला. जन्मभर तुमची ऋणी राहीन, बाबू ! त्यांच्याकडे नेऊन पोंचवा मला. चला ना बाबू. कुठें आहेत ते ? मला शोधीत हिंडत असतील ते वेड्यासारखे ! त्यांना माझ्यावांचून वेड लागेल हो ! बाबू ! पायां पडतें तुमच्या; हात जोडतें तुम्हांला; माझ्या जन्माची नासाडी करूं नका. मला त्यांच्याकडे न्या ना बाबू !'

पण तिथें कुणासच या शोकानें विरघळून जाण्याजोगीं हृदयें नव्हतीं. नुरुद्दीन हंसत शेटजींस म्हणाला,

'आतांच धरून आणलेलें पांखरूं आहे. जरा गडबड करायचेंच.'

'असूं दे. चार आठ दिवस इथेंच असूं दे. मग नेईन ठिकाणावर. तोंवर जरा माणसाळेल ती.'

शेटजी उटले. गिरिबालेला तिथेंच सोडून अघोरनाथ व नुरुद्दीन दोघेही शेटजींबरोबर बाहेर पडले. ओक्साबोक्शीं रडत गिरिबाला तिथेंच जमिनीवर पडून राहिली.

थोड्या वेळानें सजनी आंत आली. तिला पांहतांच गिरिबाला उठून तिच्या गळ्यांत पडत कळवळून आक्रोश करीत म्हणाली,

'ते कुठें आहेत हो ? मला नेऊन पोंचवा ना त्यांच्याकडे. ते कुठें आहेत ?'

खरोखर कुठें होता राखाल ?

अघोरनाथ त्याच्याजवळून गेला आणि राखाल ओंडलला तिथेंच खाद्य पदार्थांशीं उभा राहिला. गिरिबालेकरितां काय नेतां येण्याजोगें आहे याचा त्यानें विचार चालविला.

पांचसात मिनिटांनीं एक्सप्रेसची शिटी झाली आणि ती चालू झाली. पलीकडे राखालची गाडी अजून उभी होती. तिचें इंजिन पाणी घेऊन परत गाडीला येऊन लागलें. दहा मिनिटें झालीं अजून अघोरनाथ कसा येत नाहीं या चिंतेंत राखाल उभा राहिला.

त्या गाडीचे पॅसेंजर परत आपापल्या ठिकाणीं परतूं लागले. मग मात्र राखालची चिंता अधिकच वाढली. तो ते खाद्यपदार्थ तसेच सोडून गाडीकडे जायला निघाला. स्टॉलवाला ओरडला,

'मोशाय, पैसे ? '

राखालनें खिशांत हात घातला; पण पाकिट अघोरनाथाजवळ राहिलें होतें. सुदैवानें एका खिशांत एक पांच रुपयांची नोट सांपडली, ती त्यानें स्टॉलवाल्याच्या हातांत टाकली व पैसे परत मिळण्याची वाट न पाहतां तो धांवतच पुलाकडे निघाला.

स्टॉलवाला मनांतल्या मनांत आज सकाळीं कोणाचें तोंड पाहिलें होतें तें आठवूं लागला.

राखाल आपल्या डब्याजवळ गेला आणि आंत शिरला.

तीं तिघें ज्या बांकावर बसलीं होतीं, तो बांक रिकामा होता. त्यावर कोणीही नव्हतें.

राखाल मटकन् खालीं बसला. त्याला वाटलें, हा डबा, हें स्टेशन, हें जग, सगळें गरगर फिरतें आहे.

राखालला पाहून डब्यांतला एक मनुष्य म्हणाला,

'अरे मोशाय ! तुम्ही नाहीं गेलांत ?'

जड शब्दांत राखालनें विचारलें,

'कुठें ?'

'कलकत्त्याला ? तीं दोघें तर एक्स्प्रेसनें कलकत्त्याला गेलीं. ते बाबू त्या बाईंना म्हणत होते कीं तुम्ही कलकत्त्याला जाण्याकरितां त्या गाडींत बसलां म्हणून. म्हणून तर त्या बाई गेल्या. जवळ जवळ ओढलेंच म्हणाना त्या बाबूंनीं त्यांना. तुम्ही उतरलांत वाटतें एक्स्प्रेसमधून ?'

राखालच्या डोक्यांत फक्कन् प्रकाश पडला. जणूं कांहीं एकदम शेंकडों विजा चमकाव्यात, एवढा. त्याला नुरुद्दीन आठवला, अघोरनाथची काळी कीर्ति आठवली, सगळें कांहीं आठवलें. तो जबरदस्त धक्का त्याच्या मेंदूला असह्य झाला.

तो पलीकडील दिशेला रुळावर उतरून कलकत्त्याच्या वाटेनें रुळावरून पळत सुटला. जोडा वाटेंत कुठें तरी गळून पडला, त्याची शुद्ध नाहीं; सारखा धापा टाकीत पळतो आहे. लोक आश्चर्यानें त्याच्याकडे पाहूं लागले. पण आतां त्याची चिन्ता कुणाला ?

तो पळतां पळतां म्हणूं लागला,

'आत्तां पोंहोचतों कलकत्त्याला. कलकत्ता कितीसें लांब ? मला माहीत आहे सगळें कलकत्ता. त्यांतली गल्ली न गल्ली ? साल्याला पकडतों. फांशी देतों त्याला. गिरिबालेला पळवतो काय ? अहा ! किती सद्गुणी पोर ! मी एक्स्प्रेसमध्यें बसलों असें कळलें, तेव्हां उतरली. नाहीं तर त्याच्या-बरोबर कुठली जायला ती ! आत्तां पकडतों साल्याला. पळतोस कुठें ? थांब. उभा रहा. उभा रहा म्हणतों ना. दारुड्या साला !'

अर्धवट पळत, अर्धवट चालत तो तीन मैल अंतर काटून गेला. तिथें एक छोटेंसें स्टेशन होतें. राखाल पळत होता, तोंच एक पॅसेंजर त्या स्टेशन-जवळ आली तिनें अनेक शिट्या दिल्यावर मग कुठें राखालचें लक्ष गेलें. तो बाजूला होत आपले दोन्ही हात वर करून ओरडला,

'थांबा. मला येऊं द्या. येऊं द्या म्हणतों ना ! पैसे मागून देईन.

पैशाची काळजी नका करूं. मी गोलगांवच्या मधु बोसांचा मुलगा. एकुलता एक. साल्याला धरून कैदेंत टाकतों. कलकत्त्याला जायचें आहे मला. '

पॅसेंजर स्टेशनवर थांबली. राखाल धांवत जाऊन तिच्या शेवटील डब्यांत चढून बसला. डब्यांतही तो काय तोंडास येईल तें बडबडत होता.

प्रत्येक स्टेशन घेत पॅसेंजर दुपारीं चारला हावऱ्याला जाऊन पोंचली. स्टेशनवर तिकिट चेकरच्या हाताला झटका मारून बडबडत राखाल बाहेर पडला अणि कलकत्त्यात हिंडूं लागला.

अस्ताव्यस्त वेश, वावरलेले डोळे, असा राखाल संध्याकाळपर्यन्त रस्त्यांतून हिंडत होता. कोणीही दोघें स्त्रीपुरुष त्याला दिसलीं कीं तो धांवत त्यांच्याजवळ जाई, तीं अघोरनाथ व गिरिबाला नाहींत, असे पाहिल्यावर निराश होऊन चालूं लागे. सबंध रस्ताभर त्याचें बडबडणें सुरू होतें.

संध्याकाळीं तो थकला. त्याचा आवेश जिरला. दीनवाणा होऊन भेटेल त्या प्रत्येकाला विचारूं लागला,

'तुम्हीं त्याला पाहिलें काय ? मी नांव घेणार नाहीं साल्याचें. त्यानें माझ्या गिरिबालेला पळविलेंन्. कुठें पहाल त्याला, तर लगेच मला कळवा. माझें नांव राखाल बोस, मुक्काम गोलगाव. '

लोक थांबत, त्याचें म्हणणें ऐकत, त्याची थट्टा करीत. पण तो फार वेळ थांबत नसे.

अचानक एका ट्राममध्यें एक गिरिबालेसारखी साडी नेसलेली मुलगी त्यानें पाहिली. त्वरित तो ट्राममागें ओरडत धांवूं लागला.

'गिरिबाले,! मी आलों ना ! तुझा राखाल बोस मी ! ओळखलें नाहींस मला ? खरोखर तुझा राखाल बोस मी ! गिरिबाले ! गिरिबाले ग ! ए गिरिबाले ! '

ट्रामच्या शेजारून तो धांवत होता. रस्त्यानें कितीतरी टॅक्सीज् पळत होत्या. राखाल त्याची चिंता करीत नव्हता. त्याला ट्राममध्यें बसलेल्या तथाकथित गिरिबालेचे वेध लागले होते.

एक लॅण्डो गाडी वेगांत धांवत आली. राखाल तिच्याकडे लक्ष न देतां पुढें धांवला. ड्रायव्हरनें कर्रकन् ब्रेक दाबले. गाडींतल्या शेटनें शिव्या हांसडल्या. पण काय झालें तें ड्रायव्हरला माहीत होतें. तो खालीं उतरला.

गाडीखालीं सांपडून राखालच्या डोक्याचा चुराडा झाला होता !

● ● ●

# १२

अघोरनाथाचा आणि या तथाकथित महिलाश्रमाचा संबंध कांहीं आजचा नव्हता. जवळ जवळ आठनऊ वर्षांपासून त्याच्या कृपेनें अनेकींना या महिलाश्रमाच्या छत्रछायेंत येऊन राहण्याची संधी मिळाली होती. सजनी हीही याच अनेकींतली एक.

गिरिबाला आक्रोश करीत सजनीच्या गळ्यांत पडून तिला 'ते कुठें आहेत ?' असें विचारूं लागली. तिच्या पाठीवरून हात फिरवीत सजनी म्हणाली,

'पोरी ! अगोदर माझ्या खोलींत चल बघूं ! ऊठ. चल.'

गिरिबालेला हाताशीं धरून सजनी आपल्या खोलींत घेऊन गेली. तिथें तिनें तिला चटईवर बसविलें. बसल्याबसल्या तिला धरून ठेवून गिरीबाला म्हणाली,

'तुम्ही तरी पोंचवा ना हो मला ! तुम्ही तरी पोचवा त्यांच्याकडे ! कसे सुटले ते ? कशी मला मेलीला भूल पडली ? घर सुटलें, दार सुटलें, आई सुटली, बाबूजी सुटले अन् ज्यांच्या आधारावर मी घरांतून निघालें, तेही माझ्या दळभद्रीच्या हातून सांडले कुठें तरी ! कशी मला दुर्बुद्धि सुचली हो ! कशी मी या चांडाळाबरोबर निघाले तुरुतुरु ! कसें मला त्याचें भुलावणें खरें वाटलें ?'

तिचें तोंड आपल्या हातांनीं वर उचलून तिच्याकडे पहात सजनी म्हणाली,

'तुला एकटीलाच खरें वाटलें ? तुझ्यावर एकटीवरच आकाश कोसळलें आहे ? रडतेस काय अशी जग बुडाल्यासारखी ? सगळ्या जगांतलें दुःख काय

तुझ्या एकटीच्याच वांट्याला आलें आहे ? चल. सोड मला. देव जगवील; आयुष्य आहे, तोंपर्यंत जगलें पाहिजे. चार घांस गिळले पाहिजेत. ऊठ. स्वयंपाक करूं दे. मीही कायस्थच आहें. अनेकांशीं संबंध आले म्हणून काय झालें ? कायस्थच आहें मी. माझ्या हातचें चालेल तुला. सोड. तांदूळ टाकूं दे चुलीवर. तोंवर बस थोडीशी रडत. सांगून ठेवतें. तूं अशा एका ठिकाणीं येऊन पोंचली आहेस, कीं ज्या ठिकाणचा आंत यायचा दरवाजाच काय तो आम्हांकरितां उघडा आहे. इथून कोणीही आपल्या इच्छेनें आजपर्यंत बाहेर जाऊं शकली नाहीं.'

'काय ? ' भीतीनें अर्धमेली होऊन गिरिबाला म्हणाली, 'इथून कोणी बाहेर जाऊं शकत नाहीं ? मी त्यांना शोधायला बाहेरही जाऊं शकणार नाहीं ? काय आहे हें ठिकाण ? '

भीति वाटविणारें हंसूं हंसत सजनी म्हणाली,

'हें ठिकाण ? हें ठिकाण एक कुंटणखाना आहे ! वेश्यागृह आहे हें ! चमकूं नकोस अशी. तुझ्यासारख्या कितीतरी अजाण निष्पाप पोरी इथें येतात. तुझ्यासारख्याच रडतात, ओरडतात, धिंगाणा घालतात आणि मग दुसरा कांहीं उपाय नसल्यानें मुकाट्यानें, डोळ्यांतलीं आंसवें गिळून टाकीत, जुगाऱ्यांच्या, दारुड्यांच्या, घाणेरड्या रोगांनीं पिडलेल्यांच्या स्वाधीन आपलीं शरीरें करतात. मग त्या त्यांच्याकरितां हंसतात, नटतात, नखरे करतात, रोज नवनवीं गिऱ्हाइकें मिळविण्याकरितां आपलीं थोबाडें रंगवून, नकली दागिने घालून नटून थटून खिडक्यांत बसतात ! '

ती उठत आणि स्वयंपाकाच्या खोलीकडे जात म्हणाली,

'इकडे ये या खोलींत. पोटाच्या खबदाडीत घालण्याकरितां करतें कांहीं तरी. ऊठ.'

गिरिबाला मंत्रमुग्ध झाल्यासारखी उठून तिच्या मागोमाग स्वयंपाकाच्या खोलींत गेली. तिला हें सगळें ऐकून वेड लागण्याची पाळी आली होती. ती स्वयंपाकघराच्या भिंतीशीं टेकून हात कपाळावर ठेवून बसली.

चुलीशीं लागत सजनी तिला म्हणाली,

'थकलीस ? नुसतें ऐकूनच ? अन् आम्ही हें सगळें रोज भोगतों आहोंत त्या ? तुला काय वाटतें ? हें सगळें या पोरी स्वच्छेनें करतात ? त्यांना हें

करतांना मोठें सुख होतें ? आनंद होतो ? त्यांना हौस आहे हें करण्याची म्हणून करतात त्या हें सगळें ? '

चुलीवर भात वैरून रोवळी हातीं धरून क्षुब्ध मुद्रेनें सजनी म्हणाली,

' हें सगळें खोटें. हें हंसणें खोटें, रुसणें खोटें, नटणें, मुरडणें, तोंडें रंगविणें, त्या सडलेल्या घाणेरडचा पुरुषांच्या स्वाधीन होणें, हें सगळें अगदीं साफ खोटें. जगात सगळचांत अधिक खोटें जर कुठे शोधूं जाशील, तर तें तुला इथें सांपडेल. '

' मग खरें काय ? '

' खरा परिताप ! खरा पश्चात्ताप. खरी वंचना ! '

' कशाबद्दल पश्चात्ताप ? '

' आम्ही या नेभळचा समाजांत जन्मलों, याबद्दल. ज्या समाजाला आपल्या लेकीसुना सांभाळता येत नाहींत, आपल्या पोटच्या पोरींना जो समाज हात धरून बाहेर काढून देतो, या एका वाटेव्यतिरिक्त दुसरी वाट ज्या समाजानें आपल्या लेकीबाळींकरितां उघडी ठेवली नाहीं, त्या समाजांत जन्मल्या बद्दल.

'तुला काय वाटतें ? या इथें असलेल्या आणि इथून विकल्या जाणाऱ्या पोरी त्यांना घरीं करमत नाहीं म्हणून बाहेर पडतात ? त्यांना हौस आहे हें असलें जीवन जगायची ? चांगलें सुखासमाधानानें इतर गृहस्थांच्या पोरी जगतात तसें लेंकरांबाळांत जीवन व्यतीत करणें यांना आवडत नाहीं ? प्रेमळ पतीच्या सान्निध्यांत दिवस घालविणें यांना पटत नाहीं ?

'नव्हे, नव्हे, पोरी ! प्रेमळ पती न का मिळेना, मारकुटा मिळाला तरी इथल्या अनेकींना हवा आहे. दारुडा असला तरी चालेल. दुर्व्यसनी असला तरी या दिवस काढतील त्याच्याजवळ !

'पण मिळत नाहीं ग ! पोरी ! लग्नाचा पति मिळाला नाहीं, समाजानें मिळूं दिला नाहीं, आणि तारुण्यांतील वासना स्वस्थ वसूं देईना ! म्हणून यांतल्या अनेक पोरी घराबाहेर पडल्या, मी घराबाहेर पडल्यें '

' काय ? तुम्ही देखील ? मला वाटलें, तुम्ही लहानपणापासून—' गिरिबाला हळूच पुटपुटली.

' लहानपणापासून ? म्हणजे काय मी वेश्येचीच मुलगी जन्मलें ?

'नव्हे ग पोरी ! तुझ्यासारखीच होतें मी ! तुझ्यासारखीच आई होती, वडील होते, भाऊ होता, बहिणी होत्या, सगळें कांहीं होतें. पण —

'पण– ' क्षणभर थांबून सजनी म्हणाली, ' अगोदर जेऊन घेऊं. मग पुढचें सांगेन. '

' मला नको जेवायला. ' उदासपणें गिरिबाला म्हणाली.

' जेवायला नको ? मग काय पाहिजे ? चल उठ माझ्याशीं लाड नाहीं चालायचे. तुझ्या घशांत कोंबीन मी. काय करूं ग पोरी ! कितीतरी दिवसांनीं तूं भेटली आहेस आज. आजपर्यंत अनेकांशीं संबंध आला इथें. अनेकींना मी माझ्या हातानें या धंद्यांत घातलें. पण तूं या धंद्यांत पडावेंस, असें वाटतच नाहीं आहे मला. तुझ्यासारखी शहाणी पोर ! तिचें जीवन या नरकांत पिचत खर्च व्हावें ! पटतच नाहीं मला हें. कोण जाणें का तुझ्याविषयीं मोह निर्माण झाला आहे तो.

' तूं आशाळभूतासारखी पाहूं नकोस माझ्याकडे. माझा कांहीं फारसा उपयोग व्हायचा नाहीं तुला. पण तुझ्याबद्दल मला एक लहानशी आशा आहे.'

' ते शेटजी घेऊन जाईन म्हणाले ना तुला ? '

' हो. ' मुख विवर्ण होत गिरिबाला उत्तरली.

' घाबरूं नकोस. तोच एक मार्ग आहे सुटायचा. ते तुला या नरकाच्या बाहेर काढतील. आपल्या घरीं नेतील कदाचित् किंवा बाहेर बंगल्यांत ठेवतील कुठें. तिथून तूं निसटूं शकशील. राखालबाबूचा तपास काढतां येईल तुला अन् मग परत तूं आपल्या घरीं नांदू शकशील. तुझे राखालबाबू उदार मनाचे आहेतसें वाटलें मला. ते तुझा पुनः स्वीकार करतील.

' चल, जेऊन घे. ऊठ. '

गिरिबाला मुकाटयानें उठली. सजनीनें दोघींना वाढून घेतलें. गिरिबाला चार घांसच काय ती जेवली. पुढें तिच्या तोंडांत घांस फिरूं लागला. सजनीनेंही तिला फारसा आग्रह केला नाहीं.

जेवणें उरकल्यावर पटकन् गिरिबाला उष्टीं काढूं लागली. सजनी नको नको म्हणत असतांही तिनें आपलें व सजनीचें दोन्ही ताटें उचललीं. सजनी कौतुकानें म्हणाली,

' पोरी, माझें काय उष्टें काढतेस ?'

'कां ? मी घरीं आईचें नाहीं काढीत ?'

तें मायलेकीचें नातें ऐकून क्षणभर सजनीचें अंतःकरण द्रवित झालें. ती मृदु शब्दांत म्हणाली,

'आई ! पोरी, मी तुझी आई कुठें आहे ? मी एक बाजारांतली स्त्री आहें. मला पोरें होतां उपयोगाची नाहींत ! '

तिचा कंठ दाटून आला. थोडा वेळ थांबून ती म्हणाली,

'पहिल्या पाळीला – ! पण तें त्यांच्या धंद्यांत आडवें येऊं पहात होतें ! त्यांनीं मला औषध दिलें ! नाहीं तर आज माझेंही लेंकरूं आठ वर्षांचें असतें! बाप माहीत नसेल कदाचित्; पण मी आई तर होतें ? मींच वाढवलें असतें तें लेंकरूं माझ्या छायेखालीं. पण या मेल्यांनीं तेंही सुख लाभूं दिलें नाहीं ! जन्माची जगांतून उठविली अन् – जाऊं दे. '

थोडा वेळ सजनीच्यानें बोलवलें नाहीं. तिनें मुकाटयानेंच सगळें आवरलें आणि मग गिरिबालेलाहि घेऊन खोलींत आली. तिनें दाराला आंतून कडी लावली आणि आणखी एक चटई पहिल्या चटईच्या शेजारीं अंथरून दोन उशा घेतल्या. नंतर ती गिरिबालेस म्हणाली,

'गिरिबाले, पड आतां थोडी. रात्रभर जागली आहेस.'

गिरिबाला येऊन मुकाटयानें तिच्या शेजारीं झोंपली. थोडा वेळ दोघींनींही झोंपायचा यत्न केला. पण गिरिबालेच्या भोंवतींचें जंगलच पेटलें असल्या-मुळें तिला झोंप लागणें शक्य नव्हतें. एखादें हरणाचें पाडस चहूंबाजूंनीं भडकलेल्या वणव्यांत सांपडावें, तशी तिची अवस्था झाली होती.

सजनीलाही झोंप लागेना. तिच्या डोळयापुढें आजपर्यंत अंधुक झालेली पुसूं पहाणारीं, पण आतां चांगली सुस्पष्ट, पूर्वीपेक्षां अधिक मोठीं झालेलीं गृह-चित्रें नाचूं लागलीं. ती उठून बसली आणि गिरिबालेला म्हणाली,

'ऐकलेंस पोरी, झोंप लागली का तुला ? '

डोळयांवर ठेवलेला आडवा हात काढून तिच्याकडे पहात गिरिबाला म्हणाली,

'नाहीं. कां ? '

'मला कीं नाहीं, आज सगळें बोलावेंसें वाटतें आहे. ते दोघें बाहेर गेले आहेत. आतां रात्रीं परत येतील. म्हणून कांहीं त्याची काळजी नाहीं. आज-

पर्यंत हृदयांत वागविलेला मनस्ताप ओकून टाकावासा वाटतो आहे आज. ऐकशील ? तुझ्यासारखा समजूतदार श्रोता मिळाला नव्हता आजपर्यन्त. ऊं हूं ! उठूं नकोस. झोंपली राहिलीस तरी चालेल. पडल्या पडल्याच ऐक. मी अशी भिंतीशीं टेकून बसतें.'

सजनीनें आपली उशी भिंतीशीं उभी केली. मग गुडघ्यावर टेंकलेल्या आपल्या हातावर हनुवटी ठेऊन तिनें बोलणें सुरू केलें.

' ऐक, गिरिबाले, तुझ्यासारख्याच एका पोरीची कहाणी. तुझ्याहून अधिक उच्छृंखल होती ती पोर ! पण तुझ्यासारखीच चांगल्या घराण्यांतली.

कलकत्त्याच्या जवळ एक लहानसें खेडेगांव आहे. रेल्वेच्या स्टेशनाजवळ आहे तें. नांव सांगत नाहीं. तिथें एक कायस्थ कुटुंब रहात असें. त्या मुलीचे वडील इंपीरिअल बँकेच्या एका ऑफिसांत कारकून होते. सहा दिवस ते कलकत्त्याला रहात. शनिवारीं संध्याकाळच्या गाडीनें घरीं येत. रविवारचा दिवस रहात, सोमवारीं पहांटेच्या गाडीनें परत जात.

' त्यांना एक हाडकुळा मुलगा आणि चौघो पोरी. थोरलीचें नांव चंचला. तिचीच गोष्ट आहे ही. त्या खेडेगांवीं एक लहानशी शाळा होती. चंचला चांगली हुशार व दिसायला बरी असल्यानें मास्तर तिचें कौतुक करायचे तिला खूप शिकविलें त्यांनीं.

' चंचलेच्या वडिलांना पगार मिळायचा पन्नास रुपये. त्या वेळीं स्वताई होती. यामुळें पन्नास रुपये पगार त्या घराला पुरेसा व्हायचा. आई घरांतलें सगळें करायची. सहा दिवसपर्यंत पोरांना वडिलांचें दर्शन होत नसे. यामुळें आईचाच काय तो धाक.'

' चंचला लहानपणापासून नटायची, मुरडायची, आरशांत आपलेंच रूप पहायची. तिला वाटे, आपल्यासारखें सुंदर दुसरें कोणी नाहीं. त्यांत मास्तरांच्या आणि शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या स्तुतीची भर पडली. ते स्तुति करीत. तिच्या बुद्धीची. पण तिला वाटे, हे आपल्या रूपाचीही स्तुति करतात.

'पहिली मुलगी असल्यानें वडिलांचीही लाडकी. ती मागे, तें तें आणून देत वडील. यामुळें ती पोर अधिकच शेफारली.

'पोर पंधरा वर्षांची झाली, तेव्हां तिच्या बुद्धिमत्तेची स्तुति ऐकून एक वडिलांच्या ऑफिसांतले कारकून, त्यांना या पोरीशीं लग्न करावेंसें वाटलें. ते

कधीं कधीं चंचलेच्या वडिलांबरोबर घरीं येत असत. त्यांचा स्वभाव अत्यंत चांगला होता. पण ते दिसायला सुदर नव्हते. त्यांच्या मुद्रेवर देवीचे वण होते.

'त्यांनीं चंचलेच्या वडिलांजवळ गोष्ट काढली. वडिलांना ब्रम्हानंद झाला. खरें पाहिलें तर मुलीच्या बापानें वरपक्षाच्या नाकधुऱ्या काढायच्या; पण हें ठिकाण आपण होऊन चालत आलें. त्यांनीं तावडतोब हो म्हटलें आणि तयाऱ्या सुरू झाल्या.'

चंचलेला हें कळलें, तेव्हां तिनें रडून रडून घर डोक्यावर घेतलें. अन्न-पाणी सोडून दिलें. तिला वडिलांनी कारण विचारलें. ती लाडावलेली पोर म्हणाली, ' मला असला कुरूप नवरा नको. त्याच्याशींच माझें लग्न ठरविलें तर मी जीव देईन.' झालें. वडिलांनीं एवढेंसें तोंड करून त्या कारकुनाला. सांगितलें, 'पोरीची इच्छा नाही.' लग्न राहिलें.

'पुढल्या वर्षीं अचानक त्या घमेंडखोर चचलेची आई वारली. वडिलांनीं घरांत लक्ष ठेवण्याकरितां आपल्या एका दूरच्या काकीला घरीं आणलें. चंचलेवर दडपण असें कांहींच राहिलें नाहीं.

'त्यानंतर चार महिन्यानीं कांहीं कारकून कमी केले. त्यांत चंचलेचे वडीलही कमी झाले ! कशीबशी दुसऱ्या ठिकाणीं चाळीस रुपये पगारावर नोकरी लागली पण मुलगी मोठी होत चालली. अन् तिच्याकरितां हुंडा कुठून आणायचा ? एकदां तें तसें झाल्यामुळें आतां वरपिते म्हणत, ' अगोदर हुंड्याचे पैसे हातीं टाका ! तुमची पोर आयत्या वेळीं नाही म्हणाली तर काय घ्या ! '

'रात्रंदिवस वडिलांचा वेळ पैशांच्या चिंतेंत जाऊ लागला. पोरीचें वय वाढत चाललें. ती रोज नट्टा पट्टा करून हिंडायची गांवभर. कादंबऱ्या, नाटकें, सगळें वाचून टाकलें तिनें.

'तिच्या गांवीं असलेल्या एका घरीं एक उंचसा, धिप्पाड, घाऱ्या डोळ्यांचा, छानछोकी मनुष्य पाहुणा यायचा. तो आला म्हणजे तळ्यावर मासे धरायला जायचा. चंचलाही तळ्यावर जायची.

'पुढें काय झालें, तें सागत नाहीं. एक दिवस तो गृहस्थ चंचलेसह गांवां-तून नाहींसा झाला ! लग्न न झाल्यामुळें, हुंड्याकरतां वडिलांना अडून पडावें

लागल्यामुळें वय वाढत असलेली चंचला एके दिवशीं त्याचा हात धरून पळून गेली ! तिच्या डोळ्यांसमोर तशीं आजूबाजूच्या गांवांतली चारपांच उदाहरणें होतीं. तिनें त्यांचें अनुकरण केलें.'

'त्यानें तिच्याशीं लग्न केलें नाहीं ! दोन चार वर्षांनीं त्याला पैशांची अगदीं निकडीची आवश्यकता निर्माण झाली. म्हणून मग त्या मांगानें त्या चवचाल चचलेला या ठिकाणीं आणून विकलें ! इथें आल्यावर तिचें नांव बदललें, आणि तें सजनी ठेवलें गेलें !

'म्हणजे तुमची ही गोष्ट ? ' आश्चर्यानें थक्क झालेल्या गिरिबालेनें विचारलें.

'होय पोरी, माझीच. अन् त्या धिप्पाड माणसाचें नांव काय तें माहीत आहे का ?'

'काय ? '

'अघोरनाथ ! त्यानंतर पांचसात वर्षांनीं त्या मांगानें हा उद्योगच सुरू केला. त्यातली एक शिकार म्हणजे तूं. मी त्यांच्याशीं एका शब्दानेंही बोलत नाहीं मेल्यानें किती जणींचीं आयुष्यें खराब केलीं. जळलें मेल्याचें तोंड ! एके दिवशीं माझ्याशीं परत लघळपणा करायला आला, तर सांगितलें, कीं आतां इथून पुढें जर माझ्याशीं बोललास, तर चपलेनेंच मारीन !

'ही अशी कर्मकहाणी माझी एकटीचीच ? नव्हे अनेकींची. किती तरी आहेत इथें. या हुंड्यामुळें ज्यांचीं लग्नें होऊं शकलीं नाहींत, आणि मग कुणा तरी दलालाच्या किंवा सोद्याच्या कचाटींत सांपडून इथें आल्या, अशा कितीतरी आहेत. त्या सगळ्या रोज नवीं गिऱ्हाइकें शोधतात, त्यांना शोधावीं लागतात. कारण त्यांना जगायचें आहे. अफू खाऊन मरण्याचें साहस होत नाहीं. म्हणून रोज त्या तोंडाला रंग फांसतात. त्यांना आतां संवय झाली आहे. मनें केव्हांच मेलेलीं आहेत त्यांच्यांपैकीं अनेकींचीं.'

जग उघडपणें त्याच्या नांवांवर थुंकतें. पहाटे कोणी त्यांचें नांव घेतलें, कीं तो दिवस वाईट जाईल, असें म्हणतात; पण रात्रीं ?

'रात्रीं या थुंकणाऱ्यांपैकीं, या दिवसां नाकें वांकडीं करणारांपैकीं अनेक जण थोबाडें रंगवून कानांत अत्तरांचे फाये घालून यांचीं दारें ठोठावतात ! लुबऱ्या कुतऱ्यांसारखें !'

‘ इथें त्यांच्यापैकीं अनेकांच्या बहिणी आहेत, सुना आहेत, लेकी आहेत, त्यांनीं आपल्या हातानें लोटून दिलेल्या.

‘ तुला माहीत आहे ? अनेक विधवा येतात इथें, समाजानें इतर सगळे जगायचे मार्ग बंद केले म्हणून.’

‘ नवरा मेल्याबरोबर त्यांनीं अगोदर न्हाव्यापुढें बसून आपले जिवापलीकडे वाढविलेले केंस भादरून टाकायचे, अन् मग त्या नवऱ्याच्या प्रेताची व्यवस्था व्हायची ! त्यांनीं त्या दिवसापासून मासे खायचे नाहींत, रात्रीं जेवायचें नाहीं, सगळे उपास करायचे, आपल्या हातानें पाणी आणून मगच स्वयंपाक करायचा. अंगांत पांचपर्यन्त ताप असला, तरी त्यांना लेकीच्या हातचेंही पाणी चालायचें नाहीं ! त्यांनीं तळ्यावर जाऊन आपली घागर भरून आणून आपला स्वयंपाक आपणच केला पाहिजे ! दुसऱ्याच्या हातचें चालायचें नाहीं त्यांना !

‘ हे पोलादी नियम, या कांटेरी शृंखला फक्त स्त्रियांकरितां ! पुरुषांकरितां काहीं नाहीं !

‘ पंधराव्या वर्षीं पोर विधवा झाली, तरी तिला हाच नियम ! सगळ्याच सीता-सावित्री नसतात पोरी ! सीतासावित्रीविषयीं यांनाही आदर वाटतो. यांच्याही मनांत येतें, कीं त्या सतींचें नांव निघालें कीं हळूच हात जोडावेत, कोणी बघणार नाहीं असे. पण सगळ्याच तशीं तीं पोलादी मनें, ते निग्रहशील स्वभाव कुठून आणतील ?

‘ चार सामान्य माणसांसारखीं यांनाही मनें असतात, यांनाही कामना असतात, यांच्याही मनांत कामविकार बळावतो !

‘अन् प्रत्येक गरीब बाप हुंडा कुठून आणील एवढा ? मग त्या पोरी वाढतात, मोठ्या होतात. आणि एके दिवशीं कुण्यातरी इसमाचा हात धरून पळून जातात ! त्यांचें आश्रयस्थान आहे हें वेश्यागृह. त्यांच्याकरितां इथें खायाला मिळतें, सांवली मिळते, आश्रय मिळतो, कपडे मिळतात ! फक्त—

‘ हो ! फक्त त्या सगळ्याकरतां त्यांनीं आपलीं शरीरें रोज रात्रीं जो त्या रात्रीं येईल वांटघाला, त्याच्या स्वाधीन करायचीं !

‘ असा संताप येतो या समाजाचा ! ’ क्षुब्ध होऊन सजनी बोलूं लागली, ‘ ज्या निष्ठुर समाजानें एवढ्या पोरी निर्माण केल्या आणि एकदां निर्माण

केल्यावर ज्यानें अत्यंत लोभी, पराकाष्ठेचें कृपण बनून हुंड्याकरितां या एवढ्या पोरींचीं जीवनें आपल्या हातानें मातीमोल केलीं, ज्यानें आपल्या विधवा सुनांच्या भोंवतीं नियमांचे तुरुंग निर्माण करून त्यांना त्यांतून सुटायचा हा एवढाच मार्ग ठेवला—

‘ देव माझें ऐकणार नाहीं. जर तो ऐकता, मीं म्हटलेलें जर त्यानें केलें असतें, तर मी त्याला हा घाणेरडा, कुजलेला, सडका, फुटक्या मडक्यासारखा भुळभुळ गळणारा समाज चुरडून नष्ट करून टाकायला लावला असता ! जर माझ्या हातीं सत्ता असती, तर मी हुंड्याचें नांव घेणाऱ्या प्रत्येक वरपित्याची चामडी लोळविली असती चाबकानें फोडून काढून ! आपल्या विधवा सुनेची ती तशी विद्रूप दुर्दशा करणाऱ्या प्रत्येक सासऱ्याला फांशीं दिलें असतें.

‘ मेले मुसलमानांनीं बायका पळवल्या म्हणून रडतात ! भाषणें करतात! व्याख्यानें देतात ! मी म्हणतें, खूप पळवाव्यात त्यांनीं. असल्या लोभ्यांना, असल्या धूर्तांना, असल्या द्रव्यलोलुपांना करायच्या काय बायका !

‘ कां यांनीं लग्नाचे नियम एवढे कठोर केले ? कां कुलीनपणाची हे एवढी प्रतिष्ठा बाळगतात ? कां यांनीं आपल्या भोंवतीं एवढीं बंधनें निर्माण केलीं ? अगोदर एवढीं पोरें होऊंच कां देतात ? अन् जर झालीं, तर आपल्या पोरी बिहाऱ्यांना कां देत नाहींत ? पंजाब्यांना देत कां नाहींत ? आसाममध्यें जाऊन हे सोयरिकी कां करीत नाहींत ?

‘ किती तरी मुलें आहेत कलकत्त्यांत, यांच्या समाजांतलीं, महाराष्ट्रीय, बिहारी, युक्तप्रांतांतलीं. चांगलीं सुदृढ. कां हे एवढी जबरदस्त प्रांतीय वृत्ति बाळगून बसले आहेत ? यांच्या यांच्यांतच थोडी सामाजिक बंधनें शिथिल करून हे आपल्या मुलींचीं लग्नें आपापसांतच कां लावून देत नाहींत ?

‘खूप शिव्याशाप द्यावेसे वाटतात. तुला अघोरनाथानें इथें आणलें म्हणून तूं रडतेस. मला नाहीं रडूं येत. मला संताप येतो. मन पेटलें आहे माझें, नुसती आग जळते आहे आंत !

‘ सतींचीं बलिदानें दिसतात जगाला. तें बोलक्या वक्त्यांचीं भाषणें तोंडें

घसरून ऐकतें. पण आमच्या हृदयांत समाजानें पेटविलेली आग कुणाला दिसत नाहीं !

'अशा कितीतरी जळताहेत इथें. त्या अशिक्षित आहेत, त्यांना माझ्यासारखें बोलतां येत नाहीं. मला ही आग ओकतां येते.

'तूं बाहेर जाशील इथून.' जा. प्रसंग पडला, तर आल्या प्रसंगाला तोंड दे. भ्रष्ट होशील, हो. शीलाचें भांडें फुटेल तुझ्या, फुटूं दे. पण इथून बाहेर जा.

'अन् जमलें तर हें आमचें गाणें जगापुढें गाऊन दाखव !

'त्या बुरशी चढलेल्या समाजाला आमच्या या त्यानें आपल्याच हातांनीं पेटविलेल्या जीवनांची कहाणी सांग. त्यानें आपल्या हातानें दूर लोटलेल्या या त्याच्या लेकीसुना इथें कसलें नारकीय जिणें जगत आहेत, तें त्याला ओरडून सांग !

'खूप मोठ्यानें. आवाज फुटेस्तोंवर ! खूप मोठ्यानें ओरड ! खूप मोठ्यानें ! '

सजनीचें तोंड लालभडक झालें. तिच्या डोळ्यांतून संतापाचीं आंसवें बाहेर पडूं लागलीं. गिरिबाला तिच्याकडे पहात दिङमूढ होऊन बसून राहिली. आपलें दु:ख ती विसरून गेली.

● ● ●

# १३

बराच वेळ दोघीही स्वस्थ बसून राहिल्या. त्या व्यभिचारिणी सजनीनें-चंचलेनें जो हृदयांतील आवेग प्रगट करून दाखविला, तिच्या हृदयांत जळत असलेल्या ज्या प्रलयाग्नीचें दर्शन गिरिबालेस झालें, त्याच्या दर्शनानें अभिभूत होऊन जाऊन गिरिबाला त्या व्यभिचारिणीचें तें नखरेल स्वरूप विसरली. तिच्या समोरून चंचलेचें तें बाह्य रूप नष्ट झाल्यासारखें होऊन तिला असें वाटलें, कीं आपल्या लेकींवरील अत्याचारानें क्रुद्ध होऊन जणूं काय बंगालची शक्तिदेवता कालीच समाजाला कडकडून शाप देते आहे !

हळूंच नम्रपणें गिरिबालेनें विचारलें,

‘ मला इथून बाहेर जातां येईल का ? ’

‘ न जातां यायला काय झालें ? तेवढा थोडासा अभिनय करतां येत नाहीं ? मग तूं माणूस कसची ? आम्ही बघ ! जगण्याकरितां- केवळ पशूचें जिणें जगण्याकरितां रोज कसा अभिनय करतों ! किती नटतों, किती मुरडतों, किती नखरे करतों ! आणि तुला या ठिकाणाहून निसटून स्वतंत्र होण्याकरितां एवढासाही अभिनय करतां यायचा नाहीं ? एवढीशी प्रतारणा करतां येणार नाही ? तुला तर केवढी मोठी संधी आहे !

‘ मन थोडेंसें मजबूत कर. थोडीशी कठोर हो आपल्या मनाशीं. थोडीशी वंचना करायला शीक. एवढें सरळ असून कसें चालतें व्यवहारांत ? ’

तिची ती चाणक्यनीति ऐकून गिरिबालेची विचारशक्ति कुंठित झाली. तिला बराच वेळ कांहीं सुचलें नाहीं. पण जेव्हां तिनें असें पाहिलें, कीं कांहीं तरी करून इथून निसटून गेलेंच पाहिजे, तेव्हां मग ती भारावलेल्या मनानें म्हणाली,

‘ पण बाहेर गेल्यावर मला यांचा तपास लागेल का ? त्यांच्याशिवाय दुसरा आधार नाहीं हो मला ! ’

‘ अशी मरगळतेस काय ? बाहेर जा. हरप्रयत्नानें त्या शेटच्या तावडीं-तून सुटका करून घे आणि मग राखालबाबूंचा शोध कर. तुला सांगून ठेवतें. कोणी मनुष्य पाठव त्यांचा तपास करायला. तुला त्या शेटजवळून वाटेल तेवढे पैसे मिळू शकतील. खूप श्रीमंत आहे तो. खूप उधळ्याही आहे. तर त्याच्या जवळून पैसे मागून घेत जा. आणि निसटल्यावर त्या पैशांच्या सहाय्या-नें तुला कोणीही माणूस धाडतां येईल राखालबाबूंचा तपास करायला. पत्र पाठवूं नकोस. नाहींतर पत्रानें सगळा गोंधळ होईल. कदाचित् तें त्या बाबूंच्या बापाच्या हातीं लागेल. ’

‘ पण तोंपर्यंत मी राहूं कुठें ? ’

‘ बरें विचारलेंस. आणखी काय काय विचारायचें राहिलें, तें आठवून देतें तुला. सुटका झाल्यावर मी खाऊं काय, पिऊं काय, तिखट खाऊं कीं नको, कोणतीं लुगडीं नेसूं–’

गिरिबालेला हंसूं आलें. ती म्हणाली,

' हें काय गडे ! तुम्ही तर थट्टाच करतां माझी !

तिच्या पाठीवर एक धप्पा मारीत चंचला म्हणाली,

' मग आतां काय सांगूं तुला ? वेडी ग वेडी ! अग ! प्रत्येक गोष्ट मी कुठें सांगत बसूं तुला ? मग तर तुझ्या त्या बाबूबरोबर 'तुझें लग्न लावून' द्यायला वधूमाय म्हणून मलाच आलें पाहिजे ! असूं दे. तर बाहेर पडलीस म्हणजे सुचेल तसें कर. चल ऊठ. साडेपांच वाजून गेले. मला रात्रीच्या तयारीला लागलें पाहिजे आतां. '

' कसली तयारी ? '

' वेडी ग माझी बाई ती ! रात्रीच्या म्हणजे धंद्याच्या. '

चंचला उठली आणि वेणीफणी करूं लागली. अंबाडा घातल्यावर तिनें एक दीड डझन पिना लावून तो चापून चोपून बसविला. गिरिबाला म्हणाली,

' एवढे आंकडे आणि पिना ? '

हंसत चंचला म्हणाली,

' एवढ्यानें काय झालें आहे ? अजून ओठांना रोगण लावायचें, गालांना तांबडा रंग पोतायचा, त्यानंतर तोंडाला पावडर फासायची, डोळ्यांत काजळ घालायचें, पुष्कळ करायचें आहे अजून. सगळें झाल्यावर तुला सुद्धां होईल मोह माझ्या गळ्यांत पडायचा ! '

' चला ! कांहींतरीच ! ' गिरिबाला लाजून हंसत म्हणाली.

' कांहींतरीच काय ? म्हणून तर मी या महिलाश्रमाची व्यवस्थापक आहें. इथें किती तरी पोरी आहेत. पण माझ्यासारखें स्वातंत्र्य कुणालाच नाहीं. मी या आश्रमाच्या मॅनेजरांच्या मर्जींतली आहे ना ! '

' कोण मॅनेजर ? '

हळू आवाजांत चंचला म्हणाली,

' तो बघितला नाहीस कां कसाई ? ज्यानें तुला इथें माझ्याकडे आणलें तो. या आश्रमांत वाटेल तें करूं शकतो तो. खालीं चार आडवे तिडवे धिप्पाड पहारेकरी ठेवले आहेत त्यानें. त्यांच्याजवळ चकचकीत सुरे आहेत मोठमोठाले. कांहींही करूं शकतात ते याच्या सांगण्यावरून ! खूनसुद्धां ! '

भीतीनें गिरिबाला चरकली.

तोंच दरवाजावर कोणी टक्टक् केलें. चंचला म्हणाली.

'कोण आहे ? '

'मी. इकडे ये बाहेर. ' घोगऱ्या आवाजांत उत्तर आलें.

चंचला गिरिबालेच्या कानांत पुटपुटली,

'बघ ! कांहींतरी करून आला आहे. तोच आहे नुरुद्दीन. तूं थांब इथें. मी येतें जाऊन . '

चंचलेनें दार उघडलें. बाहेर व्यस्त नुरुद्दीन उभा होता. चंचलेला पाहून तो म्हणाला,

' इकडे ये. '

त्याचा तो चिरका आवाज ऐकून चंचला कांहीं न बोलतां त्याच्या मागें चालूं लागली. गिरिबालेनें मागें दार लावून घेतलें.

पांचसात खोल्या टाकून एका खोलींत नुरुद्दीन शिरला. त्या खोलींतली स्त्री वेणीफणी करीत होती. नुरुद्दीनला पाहून ती पटकन उठली आणि लुबरेपणानें नुरुद्दीनला म्हणाली,

' इकडे बसायचें, पलंगावर. '

पण नुरुद्दीनच्या पाठोपाठ येणाऱ्या चंचलेला पाहून तिच्या कपाळावर एक दोन आठ्या पडल्या.

नुरुद्दीन पलंगावर बसत आणि चंचलेला शेजारीं बसण्याची खूण करीत म्हणाला,

' साला पैसे मागत होता ! '

' कोण ? ' चंचलेनें विचारलें.

' अघोरनाथ ! '

' मग ? '

' मग काय ? साला तंटा करायला लागला ! मारायला धांवला मला. केला पार अन् काय ! '

' काय ? ' भीतीनें स्तंभित होऊन चंचला म्हणाली.

' दुसरें काय ? आतां साला कधीं यायचा नाहीं पैसे मागायला. तुला वाईट नाहीं ना वाटलें ? '

' हट् ! मला कशाला वाईट वाटेल ? आश्चर्य मात्र वाटलें. तुमचा एवढा जीवाचा ! तुम्हांला नव्या नव्या पोरी आणून देणारा ! '

'साला जड झाला होता ! काढला कांटा. तें असूं दे. त्या शेटकडून निरोप आला आहे. तो आजच येईन म्हणतो. अगोदर म्हणाला होता कीं चारआठ दिवस थांबेन म्हणून. पण साला तोही अधीर झाला आहे. तेव्हां— '

'तेव्हां काय ? ' चंचलेनें त्याच्याकडे दृष्टि रोखीत विचारलें.

'दुसरें कांहीं नाहीं. त्या पोरीला तयार ठेव. '

थोडा वेळ चंचला गप्प बसली. तें पाहून नुरुद्दीन म्हणाला,

'कां ? गप्पशी बसलीस ? '

निश्चयदर्शक स्वरांत चंचला म्हणाली,

'हें काम माझ्याच्यानें व्हायचें नाहीं ! '

'व्हायचें नाहीं ? ' आश्चर्यानें नुरुद्दीन म्हणाला, 'कां व्हायचें नाहीं ? '

'कां तें मला नाहीं माहीत. तुम्ही हें काम मला सांगूं नका. आणखी एक सांगतें. मला माहीत आहे, माझ्या सांगण्याचा कांहीं उपयोग व्हायचा नाहीं. पण मन ऐकत नाहीं म्हणून बोलतें. तुम्ही त्या पोरीला नासवूं नका. अगदीं साधी भोळी आहे बिचारी ! मला दया येते तिची. '

'ऐसा क्या ? कबसे शहेजादीके दिल में इतना रहम पैदा हुवा ?' मिस्किल-पणें तिच्याकडे पाहून हंसत नुरुद्दीन म्हणाला.

'तुम्ही थट्टा करतांय् माझी. पण एवढें ऐका माझें.' काकुळती करीत चंचला म्हणाली.

'हूं ! मस्करी पुरे झाली. तो शेट पैसे देईल लागतील तितके. तुला परवां पैसे पाहिजे होते ना ? मागत होतीस ना माझ्याजवळ ? आजच देतों तुला. तेवढी तयार कर तिला. '

'मुळींच नाहीं करायची. ' चंचलेनें दृढ स्वरांत उत्तर दिलें.

'काय ? नाहीं करायचीस ? ' नुरुद्दीनचा स्वर चढत चालला.

'मुळींच नाहीं. '

'असें कां ? बेइमान झालीस का ? ' नुरुद्दीन उग्र मुद्रेनें तिच्याकडे पहात म्हणाला. चंचला त्याच्याकडे पहात तीव्र शब्दांत म्हणाली,

'बेइमान ? कोण बेइमान ? एका गरीब पोरीला एका बोकडाच्या गळ्यांत पडायला तयार करीत नाहीं, म्हणून मी बेइमान ? अन् मग तुम्ही काय इमानदार आहांत ? तुम्ही हिला तिच्या आईबापांपासून तोडून इथें आणलीत

ती काय मोठी इमानाची गोष्ट झाली काय ? नकटयानें दुसऱ्याला नाक कां खाजवून दाखवावें ? '

' सबूर सजनी ! फार वाढत चाललीस तूं ! आजपर्यंत तुला मोठी लाडाची म्हणून बाळगली---'

' उपकारच झाले माझ्यावर !'

' चूप ! उगीच संतापवूं नकोस मला. तूं नाहीं म्हणालीस काय ? ठीक आहे, आज रात्रीं, तुझ्याच खोलींत ! पहातों पोर कशी तयार होत नाहीं ती ! औषधें आहेत माझ्याजवळ, माहीत आहे ना ? '

' म्हणजे ? ' हतप्रभ होऊन चंचला म्हणाली, ' तुम्ही त्या पोरीवर बेशुद्ध स्थितींत--'

' काय वाटेल तें करून मला त्या शेटचें काम केलें पाहिजे. पैसे घ्यायचे आहेत त्याच्याकडून. '

आपल्या जागेवरून उठत चंचला म्हणाली,

' ऊं हूं ! मी नाहीं करूं द्यायची हें. मी त्या पोरीला-'

' तुला जाऊं कोण देतो तिच्यापर्यंत ! ए झिपरे ! धर तिला ! '

त्या खोलींतल्या स्त्रीनें पट्कन चंचलेला धरलें. तिच्याशी झगडत चंचला म्हणाली, ' टवळे, रांडे, सोड मला ! सोडतेस कीं नाहीं ? '

नूरुद्दीन दारांतून बाहेर पडला आणि दार लावीत म्हणाला, ' चालूं द्या तुमची कुस्ती रात्रभर. सकाळीं उघडेल हें दार ! '

तिकडे गिरिबाला केव्हांची चंचलेची वाट पहात बसली होती. अंधार पडला होता. दिवा कुठें आहे, हेंही तिला माहीत नव्हतें. तिथें त्या काळोखांत एकटें बसायचेंही तिला भय वाटूं लागलें होतें.

तोंच दारावर थाप पडली.

' कोण आहे ? ' गिरिबालेनें विचारलें.

' मी आहें, रेखाबाई. चंचलाबाई बोलावीत आहेत तुम्हांला. ' बाहेरून एका स्त्रीचा शब्द ऐकूं आला.

गिरिबाला उठली आणि अंधारांत चांचपडत तिनें दरवाजा उघडला. ती बाहेर पडणार, तोंच तिच्या तोंडावर कसला तरी कपडा टाकला गेला,

व काय होतें आहे, तें कळण्याच्या आंतच ती बेशुद्ध होऊन खालीं कोसळली !

पटकन् तिला धरीत नुरुद्दीन म्हणाला,

' जा, बटन दाब दिव्याचें. अलीकडील भिंतीला आहे बघ. '

त्याच्या साथीदार स्त्रीनें जाऊन बटन दाबलें मूर्छित गिरिबालेला उचलून आणून पलंगावर ठेवीत नुरुद्दीन म्हणाला,

' चला ! समजूत घालायला नको आणि विनंती करायला नको. हा उपाय बरा आहे आपला. आतां शेट थोडा कुरकुरेल; पण त्याची समजूत घालूं आपण. चल बाहेर. आतां '

गिरिबालेला व्यवस्थित करून तीं दोघेंजण बाहेर पडलीं.

तें निष्पाप फूल, दुर्दैवी समाजांतलें तें एक निरपराध जीवन, ती एक कोंवळी वेल, ती निरागस गिरिबाला एका रांगड्या, निबर, पापी हाता-कडून कुस्करली जाण्याकरितां बेशुद्ध अवस्थेंत त्या पलंगावर पडून राहिली !

तिच्या जीवनांतील पावित्र्य नष्ट होणार होतें आणि तेंही बेशुद्ध स्थितींत ! तिला कल्पना नसतां !

थोड्या वेळानें दिवसभर मृतप्राय असलेली ती चाळ आणि तिच्या आजू-बाजूचा भाग जणूं जागा झाला. भडक शृंगारलेल्या खोल्यांतून तीव्र प्रकाशाचे विजेचे दिवे लागले. तोंडें रंगवलेल्या तरुणी गॅलरींतून व खिडक्यांतून खालील वाटेनें वर बघत हिंडणाऱ्या पुरुषांना संकेत करूं लागल्या. तें नित्याचें अभद्र जीवन झोंपूनच उठलें जणूं काय !

दहा वाजतां एक कोरी करकरीत ऑस्टिन कार त्या चाळीपुढें थांबली. ड्रायव्हरनें दार उघडलें आणि त्या मोटारींतून 'लोखंडी सामानांचे व्यापारी ' बाहेर पडले. एकदां बाहेर थुंकून मग खिशांतील रुमालानें तोंड पुशीत शेट चाळीच्या दरवाजांतून आंत शिरले. त्यांच्या मागोमाग ड्रायव्हर मोटारींतलें एक गांठोडें घेऊन त्यांच्या मागें निघाला ! नुरुद्दीन त्यांस सामोरा येत म्हणाला,

' आइये साहबजी ! ऊपर चलिये ! '

धापा टाकीत नुरुद्दीनच्या मागें जिने चढत शेटजींनीं नुरुद्दीनला विचारलें,

' तयार आहे ना माल ? '

' जी हां ! जरा—' नुरुद्दीन थोडें घुटमळला.

' जरा क्या ? '

'साहबजी, आपला आजच्या आजच निरोप आला आणि मग एवढ्या थोड्या वेळांत ती राजीखुशीनें तयार होणें शक्य नव्हतें. म्हणून जरा औषधि –प्रयोग करावा लागला!'

'असूं दे! असूं दे! हें तिच्याकरितां आणलें आहे, साडी वगैरे. तें ठेवून घ्या तुम्ही. उद्यां द्या तिला. मी पाहून घेतों. कुठें आहे ती?'

नुरुद्दीन सजनीच्या खोलीपुढें थांबला. दरवाजा उघडून त्यानें शेटजीला म्हटलें,

'तो आपला माल!'

गिद्ध दृष्टीनें त्या असहाय, निष्पाप, आणि बेशुद्ध पडलेल्या गिरिबालेकडे पहात शेट नुरुद्दीनला म्हणाला,

'ही शुद्धीवर नाहीं येऊं शकणार?'

'येईल तर काय! थोडे लव्हेण्डर शिंपडलें पाहिजे तोंडावर.'

'लव्हेण्डर नाहीं तुमच्याजवळ?'

'आहे तर काय!'

'मग आणवा पाहूं!'

थोड्याच वेळांत नुरुद्दीन लव्हेण्डरची बाटली घेऊन हजर झाला. ती हातीं घेत शेट म्हणाला,

'बस! हो गया काम! अब आप कल मिलिये दूकानपर! माफ कीजिये!'

'कोई हर्ज नहीं!' असें म्हणत नुरुद्दीन दांत काढीत खोलीबाहेर गेला आणि शेटनें दार लावून घेतलें!

पहांटे नुरुद्दीननें जेव्हां सजनी ज्या खोलींत बंद होती, तिचें दार उघडलें, तेव्हां रात्रभर एकमेकींस बडवून आणि नखांनीं एकमेकींना बोचकारून थकलेल्या त्या दोघी उठल्या. दार उघडें पहातांच सजनी–चंचला धांवतच बाहेर पडली. आणि दारांत हंसत उभ्या असलेल्या नुरुद्दीनकडे एक जळजळीत दृष्टिक्षेप टाकीत ती आपल्या खोलीसमोर जाऊन उभी राहिली. तिनें दाराला धक्के द्यायला सुरुवात केली. थोड्या वेळानें दार उघडलें. अस्ताव्यस्त वेश असलेला शेट दारांत उभा होता. त्याच्याकडे जळत्या नजरेनें पहात सजनी आंत शिरली.

तिनें पाहिलें कीं पलंगावर संज्ञाशून्य गिरिबाला पडली होती ! तें फूल चुरडलें गेलें होतें !

चंचलेनें जो दृष्टिक्षेप केला, त्यानें थोडा शरमून शेट मुकाट्यानें बाहेर पडला. तो आपल्या गाडीजवळ जाऊन पोंचला. ड्रायव्हर रात्रभर गाडींत ताटकळत बसला होता. शेटला पाहिल्याबरोबर त्यानें पटकन् उठून दार उघडलें. शेट झेंपावत मोटारींत बसला आणि मोटार सुरू झाली.

चंचलेनें गिरिबालेजवळ बसून तिचीं वस्त्रें सारखीं केलीं. नंतर ती तिच्या तोंडावरून हात फिरवूं लागली. तिला उशाशीं लव्हेण्डरची बाटली दिसली. त्यांतलें थोडें लव्हेण्डर पदरावर घेऊन तिनें तो पदर गिरिबालेच्या तोंडावर धरला. थोड्या वेळानें गिरिबालेनें डोळे उघडले.

समोर चंचलेला पाहून ती धडपडत उठली आणि तिच्या गळ्यांत पडत पाषाणही पाझरतील, असा आक्रोश करूं लागली. चंचला तिच्या पाठीवर हात फिरवीत तिला म्हणाली,

'उगी बेटा ! उगी ना ! माझी बेटी ती ! रडून काय होईल आतां ? उगी ! उगी ना ! '

पण गिरिबालेच्या आक्रोशांत कांहींही कमी पडलें नाहीं. असहाय्य स्थितींत तिच्या कौमार्याचा गळा निर्दयपणें दाबला गेला होता. तिला आपली छाती फुटते कीं काय, असें वाटत होतें ती ताड्ताड् कपाळावर मारून घेऊं लागली आणि चंचलेच्या गळ्यांतून हात काढून तिनें पलंगावर अंग फेंकलें.

'किती रडशील बेटी ? किती वाहवशील डोळ्यांतलें पाणी ? तुझ्या डोळ्यांतल्या पाण्यानें समुद्राला थोडीच भरती येणार आहे ? सगळ्या जगाचे व्यवहार जसेच्या तसे चालतील. तूं नासलीस, म्हणून कुणाचें अन्नपाणी कांहीं तुटायचें नाहीं. किती रडशील आतां ? '

वारंवार उठत आणि खालीं मस्तक आपटीत गिरिबाला मोठमोठ्यानें रडत म्हणाली ,

' मी काय करूं हो ऽ ? कसें सहन करूं हें ? नाहीं सहन करण्याचें सामर्थ्य माझ्याजवळ ! उठा, दूर व्हा ! मी विटाळलें ! अपवित्र झालें मी ! शिवूं नका मला ! आई ग ! अग आई ऽ ! '

ती उठून दाराकडे पळत निघाली. धांवत जाऊन चंचलेनें तिला धरलें आणि विचारलें,

'कुठें चाललीस ?'

'जाऊं द्या, सोडा मला. उडी घालतें खालीं गॅलरींतून. सोडा ना !'

चंचलेनें तिला धरून ओढीत पलंगावर बसविलें आणि दाराला आंतून कडी लावून कुलूप घालीत ती गिरिबालेजवळ येऊन तिला म्हणाली,

'मरायचें आहे तुला ? एका अत्याचारानेंच एवढी वेडी झालीस ? आम्ही प्रतिदिवशीं अत्याचार सहन करीत आहोंत. आम्ही किती वेळां मरावें ?'

'पण जगून काय करूं हो आतां ? आई, बाबूजी, कुण्णी कुण्णी थारा देणार नाहींत आतां मला ! सर्वस्व लुटलें माझें ! भिकारी झालें हो मी ! कालपर्यंत श्रीमंत होतें मी. पण आतां फुटकी कवडीही राहिली नाहीं माझ्याजवळ. ज्या वेळीं माझे बाबूजी हें ऐकतील, तेव्हां तोंड फिरवून तेही पळत दूर निघून जातील हो ! कध्धीं रागावले नाहींत ते माझ्यावर. पण अशा स्थितींत त्यांच्या त्या मोठ्या थोरल्या मनांतही मला एवढीशी जागा मिळायची नाही !

'मग कुणाकरितां जगूं ?'

'कुणाकरितां ? राखालबाबूकरितां. तूंच मला सांगितलें होतेंस ना, तुझ्या-वांचून त्यांना वेड लागेल म्हणून ? मग त्यांच्याकरितां जग. त्या मनुष्याच्या मनांत तुझ्याविषयीं जो भाव निर्माण झाला आहे, तो अमर आहे. झंझावातां-तही तो अचल राहील. तूं निर्धन होतीस, तरी त्यानें तुझ्यावर प्रेम केलें. आतां तुझ्यांत आणखी एक वैगुण्य निर्माण झालें. पण तो तुझा अपराध नव्हे. तू कलंकित असूनहीं निरपराध आहेस. कोणी न का तुला जवळ करीना, राखाल तरी तुला जवळ करीलच करील.'

'पण मी हें फुटकें भांडें कसें नेऊं त्यांच्यासमोर ?' गिरिबाला हुंदके देत म्हणाली.

'तें भांडें काय तूं आपल्या हातांनीं फोडलेंस ?'

'तरी मला आता जगावेंसें वाटत नाहीं हो !'

'खरेंच, चांगली बडवीन हो तुला मी आतां ! एकदां सांगतें, आतांचें जगणें, हें तुझ्याकरितां नव्हेच मुळीं. हें जगणें राखालकरितां. त्याची ठेव

आहेस तूं, त्याच्या जीवनाचा आश्रय आहेस तूं. आतांपर्यंत स्वतःकरितां जगत होतीस, आतांपर्यंत तुझें जिणें स्वार्थी होतें.

'आतां राखालकरितां जग. त्याच्या सुखाकरितां जग. तो वेडा झाला, तर तुला बरें वाटेल ? आनंद होईल तुला ? समाधान होईल तुझें ? तृप्ति होईल तुझी ?'

'नका हो भलतें कांहीं तरी बोलूं !'

'नको बोलूं ना ? तर मग तुला मरतां येत नाहीं. जगलें पाहिजे तुला. त्याची ठेव नष्ट करायचा तुला काय अधिकार ? त्याचा आश्रय उध्वस्त करायचा तुला काय हक्क ?'

'मग मी काय करूं आतां ?' केविलवाण्या मुद्रेनें गिरिबालेनें विचारलें.

'हां ! अशी ताळ्यावर ये. चल, तोंड धू. नासलीस तर नासलीस. कांहीं फारसें बिघडलें नाहीं. तुझें मन बिघडलें नाहीं ना ? मग तूं अजून पवित्र आहेस. चल ऊठ.'

चंचलेनें गिरिबालेला धरून मोरींत नेलें. तिथें आपल्या हातानें तिच्या तोंडावरून पाण्याचा हात फिरवून मग टॉवेलनें तिचें तोंड पुशीत चंचला तिला म्हणाली,

'बघ बरें ! माझी काय दुर्दशा झाली तुझ्याकरितां ! रात्रभर त्या मेलीनें-जळलें तिचें तोंड – मला किती ओरखाडे काढले आणि किती मारलें तें ! हें सगळें तुझें मन वळवायला तयार झालें नाहीं, म्हणून बरें ! तें असूं दे. तर आतां जगायचें. जगायचें ना ?'

गिरिबाला कांहीं बोलली नाहीं.

'चूप बसून चालायचें नाहीं. तर जगायचें. त्या शेटशीं गोड गोड बोलायचें. त्याच्याबरोबर बाहेर जायचें. तिथें जाऊन राखालबाबूंचा तपास करायचा. हळूच एके दिवशीं त्याच्या घरून पळून जायचें. अन् मग राखालबरोबर संसार करायचा. आलें ध्यानांत ?'

तरी गिरिबाला स्तब्धच राहिली. तिचें तोंड कुरवाळीत चंचला म्हणाली,

'शहाणी बाई माझी ती !'

● ● ●

# १४

सातआठ दिवसपर्यंत नुरुद्दीननें त्या दोघींच्या वार्तालापांत आणि दैनंदिन जीवनांत हस्तक्षेप करण्याचा प्रयत्न केला नाहीं. नवव्या दिवशीं सजनी त्याच्याकडे आली आणि म्हणाली,

'ऐकलेंत ? शेटला निरोप पाठवा पोर तयार आहे त्याच्याकडे जायला.'

नुरुद्दीन बेहद्द खूष होऊन तोंडातली हुक्क्याची नळी काढून हातांत धरीत आणि तक्क्याशीं लेटलेला उठून बसत म्हणाला,

'शाब्बाश् ! शाब्बाश् ! शुक्रिया शहेजादी ! शुक्रिया ? तरी मी म्हटलें कीं आमच्या सजनीजानच्या डोक्यांत हें वेड कुठून शिरलें ! आइये बेगम-साहब, तशरीफ लाइये ! '

फुरगटून त्याच्या शेजारीं बसत सजनी म्हणाली,

'चला ! मला असा राग आला आहे तुमचा ! त्या दिवशीं त्या मेलीनें माझ्या अंगाचे असे वाभाडे काढले ! '

तिला जवळ घेत आणि समजावीत नुरुद्दीन म्हणाला,

'जाने दो शहेजादी ! बंदा गुनहगार है ! आतां बघ. तुला रुपयांनीं अगदीं मढवून काढतों. तो शेट दहा हजारपर्यंत देईन, असें बोलला होता.'

'तें असूं द्या. अगोदर तुम्ही निरोप पाठवा बघूं ! '

त्यानंतर एक तासानें शेटची मोटार खालीं येऊन उभी राहिली, तेव्हां नुरुद्दीन शेटचें स्वागत करीत हंसत म्हणाला,

'आपहीकी राह देखता रहा ! '

आपल्या उदराच्या विस्तारावर रेशमी कोटाचें आवरण घालीत शेट म्हणाला,

'एक बडें गिऱ्हाईक येऊन बसलें होतें दुकानांत. एक सिनेमा थिएटर बांधलें जातंय्, त्यांचा प्रोप्राइटर होता. दोन तीन लाखांचा सौदा होता. पण

तुमचा निरोप आला आणि मग घाईघाईनें निघालों. तें गिऱ्हाईक मुनिमजीवर सोंपविलें. वेळ नाहीं लागायचा ना ? '

जिने चढत चढत नुरुद्दीन म्हाणाला,

' जी नहीं ! तयारच आहे. '

ते दोघेजण नुरुद्दीनच्या खोलींत येऊन दाखल झाले. शेटला गादीवर बसवीत नुरुद्दीन म्हणाला.

' अभी ले आता हूं ! '

नुरुद्दीन सजनीच्या खोलीजवळ आला आणि आंत डोकावीत सजनीला म्हणाला,

' आले शेटजी. '

' तुम्ही व्हा पुढें. आम्ही आलों. '

गिरिबाला खालीं मान घालून सजनीच्या पलंगावर बसली होती. तिला सजनीनें शेटनें पाठविलेली साडी नेसविली होती. सर्वस्व लुटलेली ती अभागी पोर व्यभिचारिणीचा वेश सजून आपल्या दुर्दैवाच्या आगामी कर्तृत्वाची वाट पहात होती.

' चल बाई ! तुला घेऊन चलतें. एकदांची या पिंजऱ्यांतून बाहेर पडलीस कीं सुटलीस. ' असें म्हणत सजनीनें तिचा दंड धरून तिला पुढें घालून चालविलें. बळी द्यायला चालविलेल्या पशूप्रमाणें स्वतःचें शरीर कसें तरी लोटीत गिरिबाला तिच्याबरोबर निघाली.

त्या दोघी नुरुद्दीनच्या खोलींत येऊन पोंचल्या. आंत शिरल्याजर गिरिबाला खालीं मान घालून भिंतीशीं जाऊन उभी राहिली. शेट आपली लहानशी दाढी कुरवाळीत तिच्याकडे अतृप्त नजरेनें पहात राहिला. गिरिबालेच्या खांद्यावर हात ठेवीत सजनी त्याला म्हणाली,

'बरें का ! पोर नुकतीच घरांतून बाहेर काढलेली. तिला जगांतलें कांहीं माहीत नाहीं अजून. जरा सांभाळून, तिची मर्जी पाहून, तिच्या कलानें घेतलेंत, तर सगळें ठीक होईल. '

' बिलकुल ! तिच्या मर्जीच्या खिलाफ मी जाणारच नाहीं. माझ्या इथें तिला कांहीं कमी पडणार नाहीं. खाणें आहे, पिणें आहे, सिनेमा आहे, नाटक आहे, तिला राहण्याकरितां एक स्वतंत्र बंगला आहे, मोटार आहे,

जेवर आहेत, सगळें कांहीं आहे. तिनेंही माझी मर्जी सांभाळावी म्हणजे झालें. तेवढें तिला तुम्ही सांगून ठेवा.'

'तें सांगितलें आहे सगळें.' सजनी गिरिबालेच्या पाठीवर हात फिरवीत म्हणाली.

'तो फिर चलेंगे नुरुद्दीनसाहब ! तुम्ही केव्हां याल दुकानावर ? लगेच दोन तासांनीं आलांत तरीसुद्धां चालेल.' शेट उठत म्हणाला.

'जी हां ! येतों दोन तासांनीं.'

शेट व नुरुद्दीन, दोघेही उठून पुढें चालूं लागले. त्यांच्या मागें गिरिबालेला हातीं धरून सजनी चालली. मोटारीजवळ ही मंडळी जाऊन पोंचतांच पटकन् ड्रायव्हरनें गाडींतून खालीं उतरून मागील दार उघडलें. तें दार हाती धरून शेट म्हणाला,

'बसा गाडींत.'

डोकीवरील पदर खालपर्यंत ओढलेल्या गिरिबालेला मोटारींत नेऊन बसवीत सजनी म्हणाली,

'जा बेटा ! सुखाची अस. सांगितलेलें सगळें लक्षांत ठेव. देव तुझें भलें करो !'

गिरिबालेच्या पाठोपाठ शेट मोटारींत जाऊन तिच्या शेजारीं बसला आणि त्यानें नुरुद्दीनकडे पहात दंतपंक्तीचें उद्घाटन करीत ड्रायव्हरला चलण्याचा हुकूम सोडला. गाडी चालू झाली. सजनी एक लांब उसासा टाकून डोळे पुशीत मागें फिरली.

थोडयाच वेळांत गाडी गल्ल्या मागें टाकून भर रस्त्यावरून धांवूं लागली. शेजारीं बसलेल्या गिरिबालेच्या मांडीवर हात ठेवीत शेट म्हणाला,

'पहा, तुला माझ्या घरीं कांहीं कमी पडायचें नाहीं. राहाण्यासाठीं एक स्वतंत्र बंगला आहे तुला. तैनातीला एक म्हातारी बाई आहे तिथें. तुला स्वयंपाक आपल्या हातांनीं करायचा असेल, तर तसें करतां येईल. आमचें चालेल तुला, तर तशी व्यवस्था करूं. मी रोज येत जाईनच. कोणतीही गोष्ट पाहिजे असली, तर मला मागत जा. नव्या नव्या साडया आहेत, उंची पोलकीं आहेत, सगळें आहे. काय समजलें ? जरा खुशींत रहा म्हणजे झालें. हें सगळें तुझ्याकरितां. तूं याची मालकीण.'

गिरिबालेनें एका शब्दानेंही प्रतिवाद केला नाहीं. ती मनांत म्हणाली,

'एक अंक संपला ! या दळभद्रीच्या लहानशा आयुष्यांतला एक भाग समाप्त झाला. आतां दुसरा. घर सुटलें, घरचीं सुटलीं, ज्यांच्या बरोबर निघालें, ते सुटले, ज्या धनानें मी श्रीमंत होतें, तेंही या लुटारूनें लुटलें आणि आतां मी बंगल्यांत रहायला चाललें आहे !

'कुणीं मागितला होता बंगला ? कुणाला पाहिजे होत्या साड्या ? दागिनें, पोलकीं, सिनेमा, नाटकें, हें सगळें कुणीं मागितलें होतें ?

'मीं ?

'मुळींच नाहीं ! मी तर तुटक्या झोंपडींतही संतुष्ट होतें ! फाटकी साडी नेसूनही माझ्या पतींबरोबर सुखानें संसार केला असता मीं. मला दागिने नको होते, पोलकीं, सिनेमा, मोटार, यांतल्या एकाचीही मीं कधीं इच्छा केली नव्हती !

'हें सगळें अनिच्छेनें माझ्यावर लादलें जात आहे. मला विचारलें होतें का कुणीं ?

'ऊंहूं ! माझें सर्वस्व हिरावून घेतांना मला कुणींही विचारलें नाहीं ! आणि बेशुद्ध स्थितींत—'

गिरिबालेला एक जबरदस्त हुंदका आला. पण तो तिनें तसाच दाबला. तिचें विचारचक्र पुढें चालू झालें,

'आतां मी कुठें चाललें आहें ? ते कुठें आहेत ? कुठें असतील ते ?

'अरे देवा ! माझा तपास करीत वणवण हिंडत असतील ते ! वेड्या-सारखे इकडे तिकडे मला शोधीत फिरत असतील. मी ओंडलला नाहीं, असें जेव्हां त्यांना कळलें असेल !

'त्यांच्यावर आकाश कोसळून पडलें असेल ! खरोखर या वेळीं त्यांना माझी अतिशय आवश्यकता आहे ! पण कुठें भेटतील ते ?

'कुठें का भेटेनात ! मी त्यांना शोधून काढीन. आतां माझ्या अंगीं शंभर हत्तींचें बळ एकत्र झालें आहे. त्रिभुवनांतूनही त्यांना हुडकून काढीन मी. या मेल्याला फसवीन. याच्या हातावर तुरी देऊन याच्या घरून पळून जाईन. संधी सांपडतांच जाईन मी.

'अन् त्या माझ्या सख्याला शोधीन मी. मग मी त्यांना कुठेंतरी चांगल्या

गांवीं घेऊन जाईन आणि तिथें त्यांचें एखाद्या चांगल्या मुलीशीं लग्न करून देईन.

' हो ना ! लग्न करून देईन त्यांचें. मी नासलें. आतां देवाब्राम्हणांसमक्ष त्यांच्या हातीं हात कशी देऊं मी ?

'ऊंहूं, ऊंहूं ! तें साहस नाहीं व्हायचें माझ्याच्यानें. त्यांच्याकरितां या जन्मीं तरी निरुपयोगी आहें मी. असें हें दुसऱ्यांनीं हुंगलेलें, चुरगळून टाकलेलें फूल त्यांच्या डोक्यावर नाहीं वहाणार मी. हा दुसऱ्यांनीं हुंगलेला, अपवित्र भावनांनीं उष्टावलेला नैवेद्य त्यांना नाहीं दाखविणार !

'मी त्यांचें लग्न करून देईन. अन् मग त्यांची दासी म्हणून राहीन जन्मभर.

' पण माझें राहणें त्यांच्या पत्नीला न आवडलें तर ?

' तर मग मी कुठेंही निघून जाईन. आई पृथ्वी मला रहाण्यापुरती जागा कुठेंही देईल. कुठेंही कोण्या झाडाच्या छायेंत एखादी झोंपडी बांधून –'

मोटार एका बंगल्याच्या पोर्चमध्यें जाऊन उभी राहिली. दार उघडून खालीं उतरत शेट म्हणाला,

' उतरा ! हा तुमचा बंगला. '

हळू हळू गिरिबाला खालीं उतरली. मोटार आली, हें पाहतांच बागेंतला एक माळी व पन्नाशी उलटून गेलेली स्त्री अशीं दोघें जणें धांवत धांवत पुढें आलीं. माळ्यानें येऊन शेटला सलाम केला. तो सलाम घेत शेट म्हातारीला म्हणाला,

' अम्मी, ही तुमची मालकीण बरें का ! हिला आंत नेऊन सगळें दाखवून दे. थांब थोडी. आत्तांच नको. तर ऐकलेंत, ही बाई आहे तुमच्या दिमतीला, अन् हा माळी. ऐकलेंस ना माली ? ही माझी दाई आहे. सगळें दाखवील ही तुम्हांला. तें सगळें पाहून घ्या. काय लागेल तें घेत चला. हें सगळें तुमच्यासाठीं आहे. एकच गोष्ट. तुम्हांला कुठें बाहेर जातां येणार नाहीं एकटीला. मी येत जाईन, तेव्हां माझ्याबरोबर फिरायला नेत जाईन. कुठें बाहेर जायचा प्रयत्नही करूं नका.

' तर अम्मी, ने यांना आंत. तिथलें सगळें दाखव यांना. मी जातों आतां उद्यां संध्याकाळीं येईन. '

शेट मोटारींत बसला. मोटार सुरू होण्यापूर्वीं त्यानें अम्मीला आणि माळ्याला जवळ बोलावून त्यांच्या कानांत कांहीतरी सांगितलें. त्या दोघांनींही मान हलविली. मोटार निघाली.

मोटार बंगल्याच्या आवारांतून बाहेर पडतांच अम्मी गिरिबालेजवळ आ[ली] आणि तिला म्हणाली, ' चला बाई, दाखवतें तुम्हांला सगळा बंगला. '

गिरिबाला तिच्याबरोबर बंगल्याच्या पायऱ्या चढून वर गेली आणि तिथें गॅलरींतल्या कठड्यावर रेलून चौबाजूंचें दृश्य पाहूं लागली. अम्मी थोडा वेळ थांबून म्हणाली,

' चलतां ना बाई ? दाखवतें तुम्हांला सगळें. काय लागेल तें आहे इथें. बिजलीच्या बत्त्या आहेत, भलें मोठें न्हाणीघर आहे, एक नळ थंड पाण्याचा, एक गरम पाण्याचा, मोठाले आरसे, अंगाला लावायचे साबण चांगले वासाचे, डोक्याला लावायचीं तेलें -- '

गिरिबाला शांतपणें तिच्याकडे पहात म्हणाली,

' मला यांतलें कांहीं नको. थोडा वेळ मला एकटीला उभें राहूं द्या. मग मला लागलें म्हणजे मागून घेईन. तुम्ही थोड्या बाजूला जा. '

आपण एवढ्या या सगळ्या सुखसोई दाखवून देत असतां त्या झिडकारीत आपल्यालाच जायला सांगणाऱ्या त्या एवढ्याशा पोरीवर अम्मी रागावली. ती कमरेवर हात ठेवीत म्हणाली,

' बाजूला जा ? कशाला ? म्हणजे तुम्हांला पळून जायला ? मुळींच नाहीं जायची बाजूला. इथ्थें अशी उभी राहीन. शेटनीं सांगूनच ठेवलें आहे मला तुमच्यावर नजर ठेवायला. बाजूला बरी जाईन ? '

' नका जाऊं. इथेंच उभ्या रहा. पण कृपा करून बोलूं नका. मला एकदां हें सगळें शांतपणें पाहूं द्या. '

' बोलूं नको ? कां बाई ? मी काय वाईट बोलत होतें ? चांगलें सगळें समजावून सांगत होतें. तुमच्या पूर्वीं इथें दुसरी एक बाई ठेवली होती शेटनीं. तिला तर भारी आवडायची मी. पण मेली एके दिवशीं दागिने घेऊन पळून गेली ! सांगून ठेवतें. इथून बाहेर पळायला बघूं नका. माझी नजर आहेच म्हणा तुमच्यावर ! '

गिरिबालेनें विचार केला कीं आपण कांहींही बोललों, तरी एक पाटीभर

उत्तर देणाऱ्या एका कजाग बाईशीं आपली गांठ पडली आहे. तेव्हां आतां न बोलणेंच श्रेयस्कर आहे. म्हणून ती तशीच तोंड वळवून त्या बंगल्याच्या भोंवतालचें दृश्य पाहूं लागली.

तो बंगला कलकत्त्याच्या एका उपनगरांत अगदीं एकीकडे होता. आवतीं-भोंवतीं डोलणाऱ्या नारळींच्या खालीं शेजारच्या बंगल्यांचीं विस्तीर्ण आवारें पसरलीं होतीं आणि एका बाजूला दोनशें पावलांवर एक रेल्वेचा फांटा कुणीकडे तरी जात होता. भोंवतालचें दृश्य मोठें नयनरम्य होतें.

पण गिरिबाला त्या दृश्याशीं तद्रूप होऊं शकली नाहीं. या दोन पहारे-कऱ्यांच्या तडाक्यांतून आपली सुटका कशी करून घ्यावी, अशा विचारांत ती मग्न झाली. अम्मीच्या स्वभावाशीं तर ती नुकतीच परिचित झाली होती. माळ्याच्या मुद्रेवरून तोही मनुष्य कांहीं फारसा चांगला असेलसें तिला वाटलें नाहीं.

बराच वेळ ती त्याच विचारात गुंगून जाऊन तिथेंच उभी राहिली. नंतर तिनें वळून पाहिलें, तों अम्मी एखाद्या खुंटासारखी तिच्या पाठीमागें भिंतीशीं ठाण मांडून उभी होती. गिरिबाला तिला म्हणाली,

' चला आतां. मला न्हाणीघर दाखवा. '

तुरुतुरु चालत अम्मीनें तिला न्हाणीघराकडे नेलें. गिरिबालेनें स्नान उर-कलें आणि ती एक अगदीं साधी साडी नेसली. नंतर तिनें अम्मीनें दाख-विलेल्या स्वयंपाकघरांत जाऊन दोन मुठींचा भात टाकला आणि दूधभाताचे चार घांस गिळून ती तिच्याकरितां ठेवलेल्या पलंगावर न झोंपतां खालीं एक चटई आंथरून तीवर पडली. नानाविध भोगसाधनें उपलब्ध असूनही त्यांचा उपयोग न करतां विरागी वृत्तीनें राहणाऱ्या त्या पोरीला मनातल्या मनांत दळभद्री, कपाळकरंटी, अशा अनेकविध विशेषणांनीं विभूषित करून म्हातारी अम्मी आपल्या चुल्लिकासाधनेंत निमग्न झाली.

रात्रींही गिरिबाला त्याच चटईवर झोंपली. तिनें आपल्या रहाण्याझोंपण्याचे कांहीं नियम ठरवून टाकले. इथें या दोघांचें लक्ष चुकवून पळून जायचा अवसर मिळेपर्यन्त तिनें त्या नियमांचें कसोशीनें पालन करायचें ठरविलें. पडल्या पडल्या राखाल कुठें असेल आणि आपली व त्याची भेट कशी होईल,

हेच विचार तिच्या डोक्यांत धुमाकूळ घालीत होते. तिच्या शेजारींच आपलें अंथरूण घालून अम्मी झोंपली. त्या रात्रीं गिरिबालेला असा अनुभव आला कीं अम्मीची झोंप अत्यंत सावध आहे.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं मोटार घेऊन शेट आला. तो येतांच अम्मीनें त्याच्याजवळ गिरिबालेच्या कालच्या वर्तनाबद्दल व विरागी वृत्तीबद्दल तक्रार केली. शेट गिरिबाला जिथें बसली होती, त्या हॉलमध्यें जाऊन एका खुर्चीवर बसत म्हणाला,

'तुम्ही असें काय केलेंत ? हें सगळें तुमच्याकरितां आहे. तुम्ही या सगळ्याचा उपयोग केला पाहिजे. अम्मी म्हणत होती — '

'तुम्ही माझें ऐकाल ? ' शांत स्थिर दृष्टीनें शेटकडे पहात गिरिबाला म्हणाली.

'हो हो ! जरूर ! '

'तर मग आठदहा दिवस मला त्रास देऊं नका. जरा स्थिर होऊं द्या माझें मन. '

'हो हो ! माझी कांहीं गडबड नाहीं. त्या दिवशींच जरा चुकलें माझें. तुम्ही शुद्धीवर नव्हतांत, तेव्हां —- '

गिरिबालेची मुद्रा विवर्ण झाली. तें पाहून शेट म्हणाला,

'जाऊं द्या, जाऊं द्या. तुमच्या मनाप्रमाणें होऊ दे. पण मी हें सगळें तुमच्याकरितां करतों आहें, फार चांगला वागतों आहें तुमच्याशी, एवढें लक्षांत असूं द्या, म्हणजे झालें. तुम्हांला कांहीं पाहिजे का ? '

'हो, मला बंकिमचन्द्रांचें चौधुराणी आणि भगवद्गीता हीं दोन पुस्तकें पाहिजेत. '

'पाठवतों उद्यां. '

दुसरे दिवशीं पुस्तकें आलीं. त्या पुस्तकांच्या वाचनांत गिरिबाला आपला काळ घालवूं लागली. अम्मी व माळी, अशीं दोघेंही सारखीं तिच्या पाळतीवर असत. त्यांना या कामापलीकडे दुसरा कांहीं उद्योगच नव्हता. अम्मीनें अनेक वेळां प्रयत्न करूनही जेव्हां गिरिबाला आपणाशीं आवश्यकतेपेक्षां अधिक बोलत नाहीं, असें पाहिलें, तेव्हां मग तिनें तिचा नाद सोडून दिला.

पण शेटला अधिक दिवस थोपवून ठेवणें गिरिबालेला शक्य झालें नाहीं.

दहाव्या दिवशीं तो दारू पिऊन आला आणि परत त्या दिवशीं—!

जसजसे दिवस जात चालले आणि शेटच्या पाशवी इच्छेला बळी पडायचे अधिकाधिक प्रसंग येऊं लागले, तसतशी गिरिबाला अधिकाधिक उदास होत चालली. तिच्या जीवनाचा एकच आधार राहिला होता, राखाल. पण तोही आतां अंधुक होत चालला. राखाल कुठें असेल, जर मी त्याच्याकडे गेलें, तर तो माझा स्वीकार करील काय, मीं अशा अपवित्र अवस्थेंत त्याला तोंड दाखविणें इष्ट आहे काय, असे नानाविध निराशाजनक विचार अलीकडे तिच्या मनांत धुमाकूळ घालीत. कधीं कधीं ती अगदीं दिङ्मूढ, संज्ञाशून्य होऊन जात असे.

अम्मी आणि माळी, या दोघांचा पहारा यत्किंचिन्मात्र ढिला पडण्याचें लक्षण दिसेना. दोनचार वेळां ही उदासवाणी जीवनयात्रा इथेंच थांबवावी, असाहि विचार गिरिबालेच्या मनांत चमकून गेला. पण आतां राखालकरितां जगायचें, हे चचलेचे शब्द आठवून गिरिबाला निसटायची संधी शोधीत राहिली.

फाल्गुन गेला, चैत्र उजाडला. सृष्टीमध्यें वसंताच्या आगमनानें बदल झाला. गिरिबालेचें जीवन मात्र त्याच ठरलेल्या चाकोरींतून जात राहिलें. वैशाख, ज्येष्ठ, आषाढही गेला आणि श्रावण उजाडला.

दर चारसहा दिवसांनीं शेट येई आणि त्या कोंवळ्या जिवाचा कुस्करा करून जाई. तो गोड बोले, गिरिबालेकरितां काय वाटेल तो खर्च करण्याची त्याची तयारी असे, पण त्याबद्दल —! प्रतिक्षणीं जीवनांतील प्रत्येक गोष्टीबद्दल गिरिबाला निराश होत चालली. हळू हळू जगणें, मरणें, राखाल, या सर्व विषयांपासून सुटावून जाऊन तिचें मन जिथें जाणीव नाहीं, केवळ संज्ञाशून्यता मात्र आहे, अशा अज्ञात अवस्थेंतच जाऊन राहूं लागलें. त्यांतली चेतना जणूं काय लोपच पावली !

श्रावणाची झड सुरू झाली. एके दिवशीं जणूं काय आकाशच कुठें तरी फाटून भुळुभुळु गळावें, तसा त्यांतून पाऊस गळूं लागला. तो दिवस गेला, दुसरा दिवस गेला, तिसरा दिवस उजाडला. संध्याकाळपर्यन्त पाऊस तसाच अविरत सुरू होता. आज तीन दिवसांत गिरिबालेनें अन्न शिजविलेंच नाहीं. ती उदासवाणी बसून होती.

सायंकाळीं ती उठली. सहज नेहमींची या सातआठ महिन्यांतील सवय म्हणून तिनें अम्मी कुठें आहे, तें बघितलें. रोज रात्रंदिवस तिच्या उशापायथ्याशीं असणारी अम्मी आज कुठें दिसेना. गिरिबाला आपल्या खोलींतून उठून बाहेर गेली. आणि व्हरांड्यांत येते, तों तिला संडासाकडील पायऱ्यांवर मुख विवर्ण झालेली अम्मी बसलेली दिसली. गिरिबालेच्या अंतरांतली मानवता जागी झाली. ती धांवतच अम्मीजवळ गेली. तिला पाहातांच अम्मी स्फुंदत स्फुंदत क्षीण आवाजांत म्हणाली,

'बाई, मला जुलाब होताहेत, आणि उलटया!'

गिरिबाला तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाली,

'केव्हांपासून ?'

'तोनचार तास झाले! मरतें मी आतां! माळीही किडेपडा कुठें उलथलाय्! त्याला डागदराकडे पाठविला असता! अग आई ग!'

तिनें मुरडणारें पोट आवळून धरलें, तोंच बसल्या जागीं तिला, रेच झाला. गिरिबाला तिला आश्वासन देत म्हणाली,

'कांहीं काळजी नका करूं अम्मी; मा पाठवतें माळ्याला. होऊं द्या रेच. तुम्ही इथेंच असा. मी माळ्याला डागदराकडे धाडून येतें.'

ती तशीच निघाली आणि पावसांत भिजत माळ्याच्या झोंपडीकडे गेली. माळी अंधारांतील तिच्या अंधुक आकृतीला पहातांच झोंपडींतूनच ओरडला,

'बाई, कुठें जातांय्?'

गिरिबाला त्याच्या दाराशीं आली आणि तिनें त्याला अम्मीची हकीगत सांगून डॉक्टरकडे जाण्यास विनविलें. माळीही हादरून गिरिबालेबरोबर बाहेर पडला आणि त्यानें जाऊन बटन दाबून दिवा लावीत अम्मीला पाहिलें. तिची अवस्था पहातांच तो मागें सरला आणि गिरिबालेलाही त्यानें मागें ओढीत हळूच म्हटलें,

'बाई मागें सरा! कालेरा झाला हिला! जाऊं नका तिच्याजवळ! मी डॉक्टरकडे जाऊन येतों लगेच. हातीं लागायची नाहींच ही. पण आपले प्रयत्न करून पहावे!'

धांवतच माळी त्या उभ्या पावसांत बाहेर पडला. बंगल्याचा लोखंडी

दरवाजाही लावून घेण्याचें तो विसरला. गिरिबाला गॅलरींतील कठड्यावर रेलून त्याची वाट पहात राहिली.

अचानक तिला स्फुरलें. आपण एकट्या आहोंत ! पाऊस कोसळतो आहे. आपणावर रात्रंदिवस पहारा करणारी म्हातारी मरणाची वाट पहात आहे. माळी इथें नाहीं आणि आपण एकट्या आहोंत ! स्वतंत्र आहोंत ! क्षणमात्र तिला अम्मीची क्षीण हांक ऐकूं आली. पण तिला वाटलें,

'मी हिच्या मदतीस कां जावें ? माझ्यावर रात्रंदिवस पहारा करणाऱ्या या थरडीचें मी काय घेतलें आहे ? नाहीं ! मी बाहेर पडणार ! स्वतंत्र होणार ! अशी संधी मिळायची नाहीं ! मी जाणार ! '

विचारांच्या आवेगाची गति एका ठिकाणीं येऊन स्थिर झाली आणि तिचा धक्का बसून जागी झाल्यासारखी गिरिबाला त्याच पावलीं गॅलरींतून धांवतच बाहेर पडली. पाऊस वदवद गळत होता; पण तिचें त्याकडे लक्ष नव्हतें. माळ्यानें उघडचा टाकलेल्या दरवाजांतून पाऊल बाहेर टाकून ती त्या स्वतंत्रतेचा आनंद उपभोगीत कुणीकडे तरी चालली. थोड्या वेळानें तिच्या लक्षांत आलें कीं आपण बंगल्यांतून दिसणाऱ्या रेल्वे लाइनजवळ येऊन पोंचलों आहोंत. तिनें दुतर्फा पाहिलें. दीडशें पावलांवर तिला त्या पावसाच्या धारांतून एका स्टेशनचे दिवे दिसले. ती घाईघाईनें पावलें टाकीत स्टेशनमध्यें पोंचते, तोंच स्टेशनांत एक पॅसेंजर येऊन उभा राहिली. पावसानें आंली चिंव होऊन कुडकुडत असलेली गिरिबाला एका डब्याचें दार उघडून आंत शिरली आणि तिनें डब्यांत बसलेल्या एका म्हाताऱ्याला विचारलें,

'गाडी कुठें जाते ? '

'पश्चिमेकडे ! ' म्हाताऱ्यानें पेंगत उत्तर दिलें. गिरिबाला एका बाकावर बसून राहिली.

● ●

# १५

गार्डनें शिटी दिली आणि गाडी चालू झाली. जसजशी आगगाडी कलकत्ता सोडून अधिकाधिक दूर जाऊं लागली, तसतसा गिरिबालेच्या मनावरील भार कमी होत चालला. वस्तुतः या सुटकेबद्दल आनंद मानण्याइतकें तिचें मन ताळ्यावर नव्हतें. तरी ही मुक्तता तिला सुखदायी वाटली. थोडा वेळ ती त्याच आनंदाचा उपभोग घेत राहिली. मुसळधार पावसांतून ती जवळ जवळ तीनचारशें पावलें चालून आल्यामुळें ओली चिंब झाली होती. तिच्या विपुल केशभारांतून आणि अंगावरील वस्त्रांतून ती बसलेल्या बांकावर पाणी ठिबकत होतें. ती सारखी थंडीनें कुडकुडत होती.

तिचें मन मुक्ततेच्या सुखाचा आस्वाद लुटीत होतें. अगदीं शांतपणें ती त्या आस्वादाचा मजा चाखीत बसली होती. तिच्या मनांत कोणतेही विचार नव्हते. जणू काय तिची समाधीच लागली होती.

दुसरें स्टेशन आलें आणि गाडी उभी राहिली. त्या धक्क्यासरशीं गिरिबालेची तन्द्री भंगली. तिच्या त्या शांत स्थिर मनांत अचानक विचार उद्‌भवला,

' कुठें जायचें ? '

ती कुडकुडत विचार करूं लागली,

' कुठें जायचें ! '

तिचा मुक्ततेचा आनंद ओसरूं लागला. खरोखरीच कुठें जायचें हा प्रश्न निर्माण झाल्याबरोबर ती गांगरली.

' कुठें जायचें ? मला आश्रय देऊं शकेल असें स्थान कुठें आहे ?

' घरीं ?

' नाहीं. त्या माझ्या घरांत आतां माझ्याकरितां एवढेंसेंही स्थान नाहीं. त्या पवित्र घरीं या घरांतून पळून जाऊन आयुष्याचे धिंडवडे झालेल्या मुलीकरितां

एवढेंसेंही स्थान नाहीं. मी घरीं जाणार नाहीं. हें अपवित्र, काळोखीनें बरबट-लेलें, अमंगल थोबाड मी घरीं नेणार नाहीं.

'मग मी कुठें जाऊ ?

'राखालबाबूंकडे ?

'ते मला कुठें भेटूं शकतील ? मी कुठें शोधूं त्यांना ? कसें शोधूं ? ते घरीं परतले असतील का ?

'कोण जाणे त्यांनीं काय केलें असेल तें. कदाचित् घरींही परत गेले असतील. त्यांनीं माझी वाट पाहिली असेल, माझा तपास केला असेल, मला शोधीत हिंडले असतील आणि मी सांपडत नाहीं असें पाहून दुःखी मनानें घरीं परतले असतील.

'चार दिवस त्यांना वाईट वाटलें असेल. चंचलाबाई म्हणत होत्या, अघोर-नाथ मेला म्हणून. त्यामुळें माझा तपास लावण्याकरितां त्यांच्या हातीं कसलें-ही साधन उरलें नसेल. ते हताश झाले असतील. मजवर फार जीव होता त्यांचा. त्यांना दुःखही झालें असेल. ते उदासवाणे गांवाबाहेर रात्र पडेपर्यन्त भटकत राहिले असतील.

'पण मग नंतर त्यांच्या आईनें एखादी चांगलीशी मुलगी पाहून त्यांचें लग्न– !'

क्षणभर तिच्या अंतरांतून जणूं काय विजेचा झटका चमकून गेला. पण ती पुढें विचार करूं लागली,

'हो ! त्यांचें लग्न झालें असेल. नक्कीच झालें असेल. मला त्याबद्दल वाईट कां वाटावें ? मीच नव्हतें का त्यांचें लग्न लावून देण्यास तयार झालें ? कां थांबावें त्यांनीं माझ्याकरितां ? कां माझी वाट पहावी ? मी परत येईन ही काय खात्री ?

'अन् जर मला माझ्या घरींच स्थान नाहीं, माझी स्वतःचीं माणसें जर मजकडे अशा स्थितीत ढुंकूनही न पाहतां तोंडें फिरवितील, तर राखाल-बाबूंनीं तरी मला कां जवळ करावें ? हें दुसऱ्यांनीं आपल्या घाणेरड्या, ओंगळ हातांनीं कुस्करलेलें फूल त्यांनीं तरी कां मस्तकीं धारण करावें ? कां त्यांनीं माझा नासलेलीचा स्वीकार करावा ?

'आणि मी तरी त्यांच्या त्या नव्या संसारांत विघ्न निर्माण करायला

कशाला त्यांच्याकडे जाऊं ? ते आणि त्यांची पत्नी यांची परस्परांशीं नवीनच ओळख झाली असेल. त्यांच्या सुखांत मी कशाला बिब्बा घालूं ?

'मी नाहीं जाणार त्यांच्याकडे. निश्चितच नाहीं जाणार. मुळींच नाहीं जायची !

'पण मग कुठें जाऊं ?

'कीं परत जाऊं त्या कोंडवाड्यांत ? बाहेर मला कोण आश्रय देईल ? कोण मला स्नेहानें जवळ घेईल ? कोण माझ्या अंगावर मायेनें हात फिरवील ?

'मी एकटी आहें ना ! अगदीं एकटी ! मला कुणाची तरी आवश्यकता आहे. कोणा तरी निष्पाप, हेतूशून्य मायेनें माझ्या अंगावरून हात फिरविणाऱ्या माणसाची मला या वेळीं अत्यंत आवश्यकता आहे. खरोखरीच असें कोणी तरी हवें आहे मला !

'कुणाच्या कुशींत शिरूं मी ? कोण जवळ घेईल मला ?' तिच्या मनानें आर्त प्रश्न विचारला.

'कुणीही नाहीं ! कुणीही नाहीं !' तिच्या अंतर्मनानें जोरजोरानें गवगवा करीत उत्तर दिलें.

'कुणीही नाहीं ! कुणीही नाहीं !' तिच्या मनांत प्रतिध्वनी उमटूं लागले. तिला आपलें मन आपला धिःकार करीत आहे असें वाटूं लागलें. तो धिःकार सहन न होऊन ती दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेऊन बसल्या ठिकाणींच सज्ञाशून्य स्थितींत पडून राहिली.

डब्यांत फारशी गर्दी नव्हती. वीस माणसांच्या त्या डब्यांत केवळ पांच-सातच काय तीं माणसें असल्यामुळें प्रत्येक जण झोंपला होता. एक म्हातारा व म्हातारी, अशीं दोघें पेंगत बसलीं होतीं. म्हातारा वारंवार जागा होऊन सावध असण्याबद्दल म्हातारीला बजावीत परत यथावदनुपूर्वशः आपल्या पेंगण्याच्या कार्यक्रमांत खंड पडूं न देण्याची काळजी घेत होता. पॅसेंजर एखाद्या मंथर गतीनें चालणाऱ्या म्हशीसारखी अगदीं सावकाश एकेका स्टेशनवर चांगला भरपूर वेळ थांबत प्रवास करीत होती. मध्येंच एके ठिकाणीं ती थांबली आणि जोरजोरानें शिट्या फुंकूं लागली. सिग्नल पडला नव्हता.

त्या शिट्यांच्या आवाजानें गिरिबालेची जड समाधि भंगली. ती जागी झाली. जागी होतां क्षणींच तिला असें वाटूं लागलें, कीं तिचें डोकें भयंकर जड झालें

आहे, त्यावर कोणी घणाचे घाव घालीत आहे आणि तिच्या अंगांत कोणी तरी भला मोठा जाळ पेटविला आहे.

तिला ती स्थिति सहन करणें अशक्य झालें. ती मोठमोठ्यानें कण्हू लागली. तिचें कण्हणें ऐकून शेजारच्या म्हातारीनें आपलें पेंगणें थांबविलें आणि आपल्या जाग्यावरून उठून गिरिबालेजवळ येत ती तिला म्हणाली,

' पोरी ! कुठची तूं ? कां कण्हतेस ? कुठें जायचें आहे तुला ? '

कांहींतरी उत्तर देणें क्रमप्राप्त होतें. म्हणून गिरिबाला विकल स्वरांत म्हणाली,

' इकडे, पश्चिमेकडे. '

म्हातारीनें तिच्या डोक्यावर हात ठेवला. तोंच ओरडून ती म्हणाली,

' अगो बाई माझी ! ताप किती आहे तुझ्या अंगांत ! हात भाजतोय् माझा ! अन् हे तुझे केंसही ओलसरच आहेत. साडीही ओली आहे वाटतें ! अहो ऐकलेंत काय, पेंगताय् काय असे ? हें पहा या पोरीची साडी ओली गच्च आहे केंस ओलसर आहेत अन् अंग किती गरम आहे ! '

म्हातारा आपल्या पेंगण्याची सांगता करीत उठून गिरिबालेजवळ आला आणि म्हणाला,

' काय ? अंग तापलें आहे तिचें ? ताप आहे अंगांत ? तर तूं एवढी तिला खेटून काय उभी राहिलीस ? दूर हो ना ! पिलग असला तर ? हो पलीकडे. हँा, अशी ! तर काय म्हणालीस ? ताप आहे अंगांत ? लुगडें ओलें आहे? बरोबरच आहे. पाण्यांत भिजली असेल, म्हणून ताप आला असेल. किंवा अगोदर ताप येऊन मगही ती पाण्यांत भिजूं शकते. दोन्ही बरोबरही झालीं असतील कदाचित्. हेंही कांहीं अशक्य– '

' जळलें तुमचें निदान ! अहो, कांहीं उपाय कराल कीं नाहीं ? '

' उपाय ? उपाय काय करतां येतील ? त्रिभुवनकीर्ति आल्याच्या रसांत, प्रमाण एका पाळीला दोन गुंजा. पथ्य मात्र सांभाळलें पाहिजे. काय ? ए पोरी, आलें का लक्षांत ? पथ्य पाळलें पाहिजे व्यवस्थित. लोक अलीकडे पथ्यच पाळीत नाहींत अन् मग माझ्याकडे येतात कण्हत कण्हत. आतां मी काय धन्वंतरी आहें ? '

गाडी स्टेशनवर उभी राहिली आणि तिकिट चेकर डब्यांत शिरला. त्याला पहातांच म्हातारा म्हातारीला म्हणाला,

'चल पाहूं ! जाग्यावर बस. साहेब आले आहेत, त्यांना तिकीट दाखविलें पाहिजे.'

दोघेंही मुकाटचानें येऊन जाग्यावर बसलीं. चेकर सगळचांचीं तिकिटें तपाशीत या दोघांजवळ आला. म्हाताऱ्यानें आपलें गांठोडें सोडून त्यांतून एक मोठा डबा बाहेर काढला. त्या डब्यांतून एक बारकी डबी बाहेर काढीत तिच्या तळाशीं ठेवलेली पुडी सोडून तींत असलेलीं आपलीं तिकिटें म्हाताऱ्यानें आदरभावानें चेकरला प्रस्तुत केलीं. धसमुसळेपणानें तीं हातीं घेऊन त्यांवर पेन्सिलनें किडमिड रेघोटचा काढीत आणि तीं परत देत चेकर गिरिबालेजवळ गेला आणि त्यानें तिला विचारलें,

'तिकिट ?'

हताशपणें त्याच्याकडे पहात आणि कण्हत गिरिबालेनें उत्तर दिलें,

'तिकिट नाहीं माझ्याजवळ !'

'तिकिट नाहीं ? मग बसलीस कां ? कुठून बसलीस ? चल, पैसे काढ. कलकत्त्यापासून भरले पाहिजेत तुला डबल पैसे.'

धडपडत उठून उभी राहात गिरिबाला म्हणाली,

'पैसेही नाहींत माझ्याजवळ !'

'पैसेही नाहींत ? तर मग तुला पुलीस-कस्टडींत पाठवून देतों. ते करतील वसूल. अलीकडे फार माजलां अहांत तुम्ही लोक ! विदाउट तिकिट प्रवास करतांना शरम नाहीं वाटत ? काय झालें आहे तुला ? काय लंगडी आहेस ? पांगळी आहेस ? आंधळी आहेस ? चांगली गोरी गोमटी पोर तूं ! कोणीही देईल तुला पैसे. चल पैसे काढ !'

आतां मात्र म्हातारीला स्वस्थ बसवेना. ती चेकरला भीत भीत म्हणाली,

'अहो साहेब ! तिच्या अंगांत ताप आहे चांगला भरपूर. कुठें चालली आहे कोण जाणे !'

'तूं गप्प बैस ग !' म्हातारीवर खेंकसत म्हातारा हात जोडून चेकरला म्हणाला,

'साहेबबहादुर, या मुलीच्या अंगांत ताप आहे. कदाचित् तिला पिलगही झाला असेल. आपण तिला त्रास देऊं नये, अशी प्रार्थना आहे माझी.'

'काय प्लेग ?' चेकर थबकत म्हणाला, 'अरे! मग हॉस्पिटलमध्यें कां नाहीं गेलीस ? इथेंच उतर तूं. तुझें कोणी आहे कीं नाहीं ? नाहींच वाटतें. कुठून पळून आलेली दिसते. असूं दे. इथें उतर. या गांवीं हॉस्पिटल आहे. त्यांत जा. चल, शिटी झाली. उतर खालीं.'

चेकरनें दंड धरून गिरिबालेला खालीं उतरविलें, तोंच गाडी सुरू झाली. त्या लहानशा स्टेशनवर एकटी गिरिबालाच काय ती उरली. सगळे उतारू निघून गेले होते. अजून पाऊस पडतच होता. प्लॅटफॉर्मवर दुसरें कुणीही नव्हतें. त्या पावसाच्या सरींतून मंदपणें स्टेशनवरील दिवे जळत होते. गाडी निघून जातांच पोर्टरनें शिडीच्या सहाय्यानें खांबांवर चढून तेही विझवून टाकले. चहूंकडे अंधारच काय तो शिल्लक राहिला आणि त्या अंधारात असह्य मानसिक वेदनाच्या भाराबरोबर हातास चटका बसेल असा ताप अंगीं भरलेली गिरिबाला पावसाच्या धारा अंगावर घेत उभी होती!

चहूंकडे पाणी सांचलें होतें. त्या पाण्याच्या डबक्यांत बसलेले बेडूक जोरा-जोरानें आक्रोश करीत होते. पण तो आक्रोश गिरिबालेच्या कानीं जाऊन पोहोंचला नाहीं. तिचें मन या आन्तरिक आणि बाह्य वेदनांच्या असह्य माऱ्यानें जखमी होऊन पडलें होतें. थोडा वेळ ती तशीच आणि तिथेंच उभी राहिली. मग तिला अशी जाणीव झाला, कीं आतां अधिक वेळपर्यंत पाय शरीराचा भार सहन करूं शकणार नाहींत. तोंच वीज चमकली. तिच्या उजेडांत शजारीं असलेलें वेटिंगरूमचें शेड गिरिबालेच्या दृष्टीस पडलें. त्याच्या अनुरोधानें अंधारांत चांचपडत ती त्या शेडकडे निघाली.

स्टेशनमास्तरच्या खोलींत टेलिफोनशीं डोकें करून रात्रपाळीचा स्टेशन-मास्तर झोंपला होता. खोलीच्या बाहेर असलेल्या खोक्यावर एक पोर्टर घोरत पडला होता. वेटिंग रूममध्यें जाण्याचा दरवाजा मोकळाच होता. वेटिंग रूममधील दिवाही घासलेटची काटकसर करण्याच्या हेतूनें विझवून टाकला गेला होता.

गिरिबाला शेडमध्यें कशीबशी शिरली आणि तिथें पोंहचतांक्षणीं तिनें आपलें शरीर जमिनीवर टाकून दिलें. तिच्या पायांतील उभें रहाण्याची

शक्तीच जणूं काय हरपली. खालीं पावसाच्या शिंटेनें ओली झालेली फरशी होती. पण गिरिबालेच्या अंगावरील साडी तरी कुठें कोरडी होती ? त्या ओल्या फरशीचें किंवा साडीचें सुखदु:ख मानण्याच्या स्थितीपलीकडे तिचें मन जाऊन पोहोंचलें होतें.

रात्रभर ती तशीच कुशी न बदलतां पडून राहिली. पहांट होईपर्यंत तिच्या अंगांतला ताप भरपूर वाढला. ती जवळजवळ संज्ञाशून्यच झाली.

सकाळीं पोर्टर उठला आणि वेटिंग रूममध्यें येऊन पहातो, तों ओली साडी नेसलेली गिरिबाला बेशुद्ध अवस्थेंत पडलेली त्यानें पाहिली. धांवत धांवत त्यानें स्टेशनमास्तरांना बोलावून आणलें. पन्नाशी उलटून गेलेले स्थूल स्टेशनमास्तर आपला चष्मा सांवरीत गिरिबालेजवळ आले आणि त्यांनीं तिला हलवून उठविण्याच्या उद्देशानें तिच्या शरीरास हात लावला. चटका बसून त्यांनीं हात मागें घेतला आणि ते पोर्टरला म्हणाले,

' अरे मोटू, ताप आहे रे भयंकर हिच्या अंगांत ! कोण आहे कोण जाणे विचारी ! हॉस्पिटलमध्यें नेऊं या हिला. चला, चाटर्जीमोशायनीं मोठ्या कौतुकानें आपल्या गांवीं हॉस्पिटल बांधलें, एक डॉक्टर ठेवला आहे. त्याला बिचाऱ्याला काम मिळेल. जा तर ! एक गाडी घेऊन ये, मी पत्र देतों डॉक्टरांना. '

थोड्या वेळानें एका तट्टाच्या गाडींत गिरिबालेला ठेवून आणि मास्तरांचें पत्र घेऊन पोर्टर दवाखान्याकडे निघाला. गाडी निघाल्यावर मास्तरांची पत्नी हळहळत त्यांना म्हणाली,

' चांगल्या घरची दिसते बिचारी ! कुठून आली कोण जाणे ! '

' असूं दे. फारसें हळहळूं नये. किती तरी जीव आहेत दु:खी. आपल्या कडून होईल, तितकें करावें. बाकीचें देवावर सोंपवावें. '

गाडी हॉस्पिटलमध्यें पोंचली. त्या गांवच्या चाटर्जीमहाशयांनीं कलकत्त्यास खूप पैसे मिळविल्यावर आपल्या गांवीं कांहींतरी आपली खूण म्हणून तें हॉस्पिटल बांधलें होतें. एक म्हातारा डॉक्टर आपल्या आयुष्याचे शेवटचे दिवस त्या गांवीं काढायला तयार झाला होता. आपल्या खुर्चीवर बसून आपला चिडका चेहरा शक्य तितका शांत करण्याचा प्रयत्न करीत तो टेबला-

वर ठेवलेल्या पांचसात मोठमोठाल्या बाटल्यांतील पाणी प्रत्येक रोग्याला वेगवेगळ्या प्रमाणांत भरून देत होता.

पोर्टरनें त्याला मास्तरांचें पत्र दिलें. त्यानें पत्र वाचून पाहिलें आणि त्याच्या मुद्रेवरील चिडकेपणा अधिकच वाढला. तो कुरकुरत म्हणाला,

' आता कुठे ठेवायचा हा पेशंट ? जागा आहे म्हणा ! पण नुसती जागा काय पेटवायची आहे ? औषधें नाहींत पुरेशीं. अन् याची शुश्रूषा कोण करणार ? चला, करतां काय ! मास्तरबाबूंची चिठ्ठी आहे. व्यवस्था न केली तर तिकडून रागवायचे. कुठें आहे बाबा तुझा पेशंट ? '

' बाहेर गाडींत आहे. '

डॉक्टर आपला फुटका स्टॅथास्कोप सांवरीत उठले. ते दोघे गाडीजवळ गेले. अजून गिरिबाला तापाच्या भराभुळें संज्ञाशून्यच होती. डॉक्टरांनीं तिचें प्रकृतिमान तिथेंच तपासलें. नाडी हातीं घेत ते म्हणाले,

' ओ ! व्हेरी हाय् फीव्हर ! मे बी मलेरिआ, ऑर परहॅप्स् टायफॉइड ! भिजली आहे सपाटून. इन्फ्ल्युएंझाही असूं शकता. कदाचित् निमोनियाही असण्याची शक्यता आहे. चला घ्या हिला तिकडे कॉटवर. पुत्तल, ए पुत्तल ! '

डॉक्टरांचा कंपाउंडर, घरकाम्या, शिपाई, रखवालदार, इत्यादि सगळीं कामे एकटाच पार पाडणारा पुत्तल येऊन हजर झाला. त्याला डॉक्टरांनीं कॉट तयार करायला सांगितली. चाटर्जीमहाशयांनीं जे दोन पलंग इन्डोअर पेशन्टस्‌करितां पाठविले होते, त्यांपैकीं एक स्वतः डॉक्टर वापरीत असत आणि दुसऱ्याचा उपयोग पुत्तल करीत असे. आजपासून आपणास खालीं झोंपावें लागणार, याबद्दल कुरकुरत पुत्तलनें आपला पलंग आउटडोअर पेशंटांच्या मदतीनें आणून इन्डोअर रूममध्यें ठेवला. त्यावर काथ्या भरून तयार केलेली गादी ठेवली. ती गादी एका फाटक्या चादरीनें झांकून त्यानें डॉक्टरांना कॉट तयार असल्याबद्दलचा रपोट दिला.

मग डॉक्टरांच्या सूचनांप्रमाणें गिरिबालेला पुत्तलनें आणि पोर्टरनें उचलून कॉटवर नेऊन ठेवून दिलें. डॉक्टरांनीं आपल्या टेबलाशेजारची पेटी उघडून तींतून कांहीं औषधें काढलीं. त्यांचें मिश्रण एका बाटलींत तयार करून त्यांनीं ती बाटली पुत्तलच्या स्वाधीन केली आणि त्याला म्हणाले,

' अरे पुत्तल, तुझ्या घरीं एखादी जुनी साडी असेल, तर ती आणून तुझ्या बायकोच्या मदतीनें पेशंटला नेसव, तिची साडी वाळेपर्यन्त. आणि तूं तिची नर्स. घाबरूं नकोस. नर्सचें काम केल्यानें कांहीं पुरुष बाई बनत नाहीं. पैसे देतों तुला. थोडा साबूदाणा घेऊन ये पेशंटकरतां. नर्सिंग म्हणजे तिला वेळेवर औषध पाजायचें आणि तीनदां साबुदाणा खाऊं घालायचा. आलें काय लक्षांत ? '

डॉक्टरांच्या सूचनांप्रमाणें गिरिबालेची शुश्रूषा सुरू झाली. संध्याकाळीं तिच्या तापाचा जोर थोडा कमी झाला. ती शुद्धीवर आली आणि इकडे तिकडे पाहूं लागली. तिला या जागीं आल्याचें कांहीं आठवेना. आपला पलंग पाहून आपण परत जिथून पळालों, तिथेंच येऊन पडलों कीं काय, अशी भीति तिच्या मनांत निर्माण झाली. पण थोड्या वेळानें जेव्हां डॉक्टर येऊन तिची प्रकृति तपासूं लागले, तेव्हां तिला उमग पडला. तिची नाडी पहात आणि आपल्या त्या फुटक्या टॅथास्कोपनें तिची छाती तपाशीत डॉक्टर म्हणाले,

' आलीस शुद्धीवर ? कुठली बाई तूं ? घरीं कोण आहे तुझ्या ? इथें कशी आलीस ? बरोबर कोणी नव्हतें तुझ्या ? असूं दे, असूं दे. बोलूं नकोस. पत्ता सांग घरचा. म्हणजे तुझ्या माणसांना बोलावून घेतों. '

पण गिरिबालेनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. कारण उत्तर देण्याजोगें कांहीं उरलेंच नव्हतें. ती स्तब्ध राहिली असें पाहून डॉक्टर म्हणाले,

' अरे ! तापाच्या जोरानें स्मृतिभ्रंशही झालेला दिसतोय् ! मोठी सीरीयस केस आहे बुवा ! असूं दे. आपल्याला काय करतां येईल तेवढें करावें. पडून रहा पोरी. '

रात्रीं डॉक्टरांनीं तिला पांघरण्याकरितां आपली एक जुनी घोंगडी पाठविली. रात्रीचें औषध देऊन आणि साबूदाणा खाऊं घालून पुत्तल निघून गेला आणि त्या हॉस्पिटलमध्यें एकटी गिरिबालाच काय ती राहिली. एक घासलेटचा अगदीं बारीक केलेला दिवा तिच्या उशाशीं ठेवला होता.

आपण एका हॉस्पिटलमध्यें आहोंत, इतकें अंधुक ज्ञान गिरिबालेला झालें यापलीकडे विचार करून निर्णय घेणारें तिचें मन तिच्या ताब्यांत राहिलें नाहीं. तें वाटेल तिकडे भटकूं लागलें. कधीं तें गोलगांवला घरीं जाऊन येई,

तर कधीं चंचलेच्या खोलींत जाई. कधीं तें राखालच्या बरोबर हिंडून येई, तर कधीं अघोरनाथाबरोबर. कधीं तें शेटच्या बंगल्यावर जाई, तर कधीं बिपिनशीं गोष्टी बोले. कधीं कधीं गिरिबालेला भीति वाटे. पण इच्छा असूनही ओरडण्याचें सामर्थ्य तिच्या अंगीं नव्हतें.

दुसरे दिवशीं तिचा ताप निघाला नाहीं. तिसरे, चौथे, पांचवे, सहावे दिवशींही नाहीं. एकदां स्टेशनमास्तर येऊन तिची प्रकृति पाहून गेले; पण याहून तिची अधिक चांगली व्यवस्था त्या हॉस्पिटलमध्यें होणें अशक्य आहे, हें डॉक्टरांचें विधान त्यांनाही पटलें.

रोज प्रकृति पाहून डॉक्टर कधीं कधीं औषधांत बदल करीत. मोसंबीं वगैरे फळें तिथें मिळूं शकत नव्हतीं. त्यामुळें नुसत्या साबूदाण्यापलीकडे गिरिबालेला कांहीं खायला देण्यासारखेंही नव्हतें. पुत्तलची बायकोही अलीकडे तिच्याकडे लक्ष देऊं लागली होती. तीं दोघें मिळून तिची सेवा करीत.

पण वीस दिवस होऊन गेले, तरी जेव्हां गिरिबालेचा ताप तीन खालीं उतरण्याचें चिन्ह दिसेना, तेव्हां डॉक्टरांनीं तो टॉयफाइड असल्याचें जाहीर करून टाकलें. क्षीण झालेली गिरिबाला आपल्या दैवांत आणखी काय लिहिलें आहे, याचा विचार करीत पडून असे. तिला वाटे, कशाला हे मला औषधोपचार करताहेत ? मरूं कां देत नाहींत ? जगण्यालायक असें कोणतें आकर्षण आतां शिल्लक राहिलें आहे ? पण ती त्यांना नकोही म्हणूं शकली नाहीं. परत एकदां डॉक्टरांनीं विचारलें असतां तिनें उत्तर दिलें होतें,

‘ मला घरीं कोणी उरलें नाहीं. मी पश्चिमेकडे काशीला निघालें होतें. ताप भरला, म्हणून इथें उतरलें. ’

प्रतिदिवशीं ती अधिकाधिक क्षीण होत चालली. चाळीस दिवसांनंतर तिचा ताप दीडपर्यन्त उतरला. पण तो अधिक खालीं उतरतां दिसेना. डॉक्टरांच्या मनांत एक शंका उद्‌भवली. ती अलीकडे थोडी अधिक खोकूं लागली होती. एके दिवशीं तिची प्रकृति पहातांना डॉक्टर शेजारीं उभा असलेल्या पुत्तलला म्हणाले,

‘ पुत्तल, केस टी. बी. वर गेली ! ’

टी. बी. म्हणजे काय तें कांहीं पुत्तलला कळलें नाहीं. त्याला एवढें कळलें, कीं केस डॉक्टरांच्या हाताबाहेरची आहे.

दुसरे दिवशीं डॉक्टरांना चाटर्जीमोशायचें पत्र आलें कीं, 'इथले तीन पेशन्ट हवाबदलाकरितां मी तिकडे पाठवीत आहें. कॉटस् मोकळ्या ठेवा. पेशंट घरचेच असल्यासारखे आहेत. त्यांची चांगली व्यवस्था ठेवा.'

डॉक्टर लगेच स्टेशनमास्तरांकडे गेले आणि त्यांना पत्र दाखवीत ते म्हणाले,

'मास्टरमोशाय, केस टी. बी. वर गेली ! तिला पटण्याला टी. बी. हॉस्पिटलमध्यें पाठविलें पाहिजे. तिथें माझा एक मित्र आहे डॉक्टर. त्याला पत्र देतों. तिकिटाची व्यवस्था तुम्ही करा.'

मास्तरांनीं हें कबूल केलें. डॉक्टरांनीं पुत्तलच्या मदतीनें गिरिबालेला बैलगाडीत बसविलें आणि तिच्याजवळ पत्र देत ते म्हणाले,

'आलें काय ध्यानांत पोरी ? पटण्याला उतर. कुणाही टांगेवाल्याला सांग, म्हणावें मला टी. बी. हॉस्पिटलमध्यें जायचें आहे. तो नेऊन पोंचवील तुला तिथें. डॉक्टरला हें माझें पत्र दे. तुझी व्यवस्था होईल सगळी.'

गिरिबालेच्या डोळ्यांत पाणी भरून आलें. तिला वाटलें, कुठलीं कोण माणसें ! यांना काय आवश्यकता माझ्याकरितां एवढें करण्याची ?

आणि स्टेशनमास्तरांनीं जेव्हां तिला नीट धरून गाडींत बसवून तिच्या हातीं पटण्याचें तिकिट दिलें, तेव्हां तिनें अतिकृतज्ञ मुद्रेनें डोळ्यांतलीं आंसवें वाहवीत मास्तरांकडे पाहिलें. ती कांहीं बोलली नाहीं.

गाडी चालू झाली. गिरिबालेला बसवेना. ती गाडींत पडून राहिली. तिची प्रकृति पाहून डब्यांतल्या उतारूंनींही तिला प्रतिबंध केला नाहीं. खोकल्याची ढांस वारंवार तिला त्रास द्यायची. त्या ढांसेला तोंड देत गिरिबाला विचार करूं लागली,

'आतां हें जीवन लौकरच संपणार. मला मास्तरांनीं पटण्याचें तिकिट काढून दिलें. कां ? कशाला ? पटण्याच्या दवाखान्यांत जाऊन तिथें एक खाट कशाला अडवून बसूं मी ? ती खाट कुणा तरी दुसऱ्याकरितां मोकळी असूं दे. जो जगल्यानें जगाचा कांहीं तरी लाभ होणार असेल, अशाकरितां.

मी नाहीं जाणार पटण्याला. आतां लौकरच ही जीवनयात्रा शेवटास येईल. तर मग मी ओंडलला उतरेन. तिथून सहा मैल खोलगांव. अश्विन सुरू झाला आहे. तिथली कालीची यात्रा चालू झाली असेल. लहानपणीं आईनें मला खोलगांवच्या कालीच्या पायांवर आणून घातलें होतें. मरतां मरतां तिचें दर्शन घेईन आणि मग मरणाची वाट पहात राहीन. ठरलें हें. ओंडललाच उतरायचें.'

स्टेशनामागें स्टेशनें मागें टाकीत गाडी ओंडलला जाऊन थांबली. गिरिबाला धडपडत, प्रकृतीशीं झगडत उठली आणि उभी राहिली. ती दाराकडे जाऊं लागली, तशीं माणसें बाजूला सरलीं. पण तिला हात देऊन दारापर्यंत पोंचविण्याचें कुणालाही सुचलें नाहीं. डोळे खोल गेलेले, गाल परस्परांस भेटूं पहात असलेले, शरीराचा अस्थिपंजर झालेला, अशी ती गिरिबाला अगदीं सावकाश, डब्यांतून खालीं उतरली. एका फाटू लागलेल्या नेसत्या साडीपलीकडे तिच्याजवळ कांहींही नव्हतें. खालीं उतरण्याच्या श्रमानेंच तिला थकवा येऊन ती खालीं बसली. केविलवाणेपणें ती स्वतःशीं म्हणाली, 'आई कालीमाते! तुझें दर्शन होईल कीं नाहीं ? का हें जीवन मध्येंच संपेल ?'



# १६

खोलगांव हें एक साधारण वस्तीचें गांव खरें; पण तिथल्या कालीच्या जागृत स्थानामुळें त्याची कीर्ति त्या भागांत चहूंकडे पसरली होती. अश्विन शुद्ध प्रतिपदा ते विजयादशमीपर्यंत तिथें चांगलीच मोठी यात्रा भरत असे. जवळजवळ पन्नास हजारापर्यंत माणसें जमत. ते दहा दिवस खोलगांवला उत्सवासारखेच असत. मिठाईची दुकानें, लहानशी सर्कस, चक्रें, पाळणे, बहुरूपिये, सहा आण्यांत लगेच फोटो हातीं देणारे फोटोग्राफर, अशा थाटांत ती यात्रा संपन्न होत असे.

हरिमतीची त्या कालीवर मोठी श्रद्धा होती. गिरिबाला घरांतून निघून गेल्यावर तिला जें मरणप्राय दुःख झालें, त्याची कारणमीमांसा करतां करतां तिच्या मनांत असें आलें कीं आपण खोलगांवच्या कालीच्या पायांवर लहानपणीं गिरिबालेला घातलें होतें, तेव्हां दरवर्षी तिची ओटी भरायचें कबूल केलें होतें. तें चुकलें, म्हणूनच कालीमातेनें आपल्याला ही शिक्षा केली.

गिरिबाला गेली, हें जेव्हां बनबिहारींना उमगलें, तेव्हां त्यांच्या मस्तकावर कुणी वज्रप्रहार केल्यासारखें त्यांना वाटलें. आठदहा दिवस ते घरांतून बाहेर निघाले नाहींत. त्यानंतर त्यांना कळलें, कीं एकटी गिरिबालाच नव्हे, तर राखाल आणि अघोरनाथही त्याच दिवशीं नाहींसे झाले. मधुबाबूंच्यावर ही आकाशींची कुऱ्हाड कोसळली. खूप तपास करूनही राखाल कुठें सांपडू शकला नाहीं. कांहीं दिवसांनीं असें कळलें, कीं कलकत्त्याच्या जनरल हॉस्पिटलमध्यें डोक्याचा चुराडा झालेलें एक प्रेत कॉरोनरकडून तपासणीसाठीं आलें होतें. त्याच्या अंगावरील कपडे राखालच्या कपड्यांसारखे होते ! मधुबाबू बनबिहारींशीं बोलेनासे झाले. त्यांनीं त्यांना नोकरीवरून काढून टाकलें नाहीं. हीच मधुबाबूंची कृपा.

हरिमतीनेंही घरांतून बाहेर निघणें अजिबात बंद केलें. हेमू आणि बिपिन कधीकधीं तिला विचारीत,

'आई, दीदी कुठें गेली ग ?'

ती उत्तर देई, 'देवाकडे गेली ! '

पण हेमू गुपचुप बिपिनला सांगे,

'ऊं हूं! ती कांहीं देवाकडे नाहीं गेली ! राखालबाबूंबरोबर गेली ती. ते डॉक्टर आहेत ना, त्यांच्याबरोबर.'

अश्विनाचा महिना सुरू होणार होता. हरिमती बनबिहारींना म्हणाली,

'ऐकलेंत का ? खोलगांवला जाऊन कालीची ओटी भरून यायची आहे. तिनें जी काय संसाराची विधुळवाट लावावयाची होती, ती लावलीन; पण मी तिची ओटी भरायचें कबूल केलें होतें. माझ्याच्यानें कांहीं येववायचें नाहीं. तुम्ही आणि बिपिन जाऊन या. हेमीला न्या हवें असलें तर. जाल ना ? '

'होय. '

अश्विन शुद्ध सप्तमीला शनिवार होता. त्या दिवशीं सुट्टी घेऊन पहांटे

बनबिहारी, बिपिन आणि हेमू अशीं तिघें बैलगाडींतून खोलगांवला निघालीं. वाटेंत हेमूनें बिपिनला सांगितलें,

'खोलगांवला कां चाललोंय् आपण, माहीत आहे का तुला बिपिन ?'

'कशाला चाललोंय ?'

'आईनें किनई, नवस केला होता दीदीकरितां. तो फेडायला चाललों आहोंत आपण. कायरे बिपिन, जर आपल्याला दीदी भेटली खोलगांवाला तर ?'

हर्षानें फुलून जाऊन बिपिन म्हणाला,

'ओ हो ! मी तर मिठीच मारीन तिला ! सोडायचा नाहीं. म्हणेन, कुठें गेली होतीस आम्हांला सोडून ? चल घरीं. अजिबात जाऊं द्यायचा नाहीं.'

'अहा रे ! मलाही नाहीं वाटतें मिठी मारूं द्यायचास ?'

'ऊं हूं ! मुळींच नाहीं. मी एकटाच धरून ठेवीन !'

पण त्या लेंकरांची ती आवडती दीदी ! कुठें होती ती ?

ओंडलच्या स्टेशनवर गिरिबाला खालीं उतरली, ती खालींच बसली. पण थोड्या वेळानें तिला ऊन्ह सहन होईना. म्हणून मग तो परत जिवाच्या शर्थीवर तेथून उठली आणि स्टेशनच्या वेटिंगरूमकडे चालली. तिथें पोंचेतोंवर परत तिला खोकल्याची ढांस आली. तिच्याशीं झुंजत तिथें ती खालीं बसली. चट्कन् तिच्या भोंवतीं माणसें गोळा झालीं. कोणी तिच्याजवळ येईना. दुरूनच आपापसांत त्यांची चर्चा सुरू झाली,

'कुठून आली कोण जाणे!'

'फार दिवस जगायची नाहीं.'

'चेहरा कसा ओढलाय् पहा आंत !'

'हातपाय नुसते काड्या झाले आहेत !'

'आतां कुठें जाणार ही ?'

'ईश्वर हिची लवकर सुटका करील तर बरें होईल.'

थोड्या वेळानें तिच्या त्या दुःखद स्थितीबद्दल खेद प्रदर्शित करीत गर्दी मावळली. गिरिबाला त्यांच्याकडे पहात तशीच बसून राहिली. सगळ्यांनीं तिच्या त्या दुर्दशेबद्दल खेददर्शनाचे प्रस्ताव संमत केले पण एकानेंही तिला खाण्यापिण्याविषयीं विचारलें नाहीं.

ती गर्दी मावळते आहे, तोंच एक भद्र कुटुंब आपल्या सामानासुद्धां वेटिंग-

रूममध्यें येऊन उतरलें. त्या कुटुंबाला कलकत्त्यास जायचें होतें. गाडीला अजून दोन तास अवधि होता. त्या कुटुंबांतील गृहस्थ आपल्या पत्नीकडे वळून म्हणाला,

'तर तूं बैस त्या बांकावर. मुलेंही असूं देत तुझ्याजवळ. इकडे तिकडे जाऊं देऊं नकोस त्यांना. मी गाडीची नक्की वेळ पाहून येतों.'

ती प्रौढ स्त्री आपल्या दोन्ही मुलांना घेऊन गिरिबाला बसली होती, त्याच्या पलीकडे असलेल्या बांकावर जाऊन बसली. परत गिरिबालेला एक खोकल्याची ढांस आली. ती ढांस अगदीं असह्य होऊन गिरिबाला खालीं लेटली. तिचा जीव घाबरा झाला.

त्या स्त्रीनें हें पाहिलें आणि पटकन् ती उठून गिरिबालेच्या पाठीवर हात फिरवूं लागली. थोडचा वेळानें ढांस थांबली. गिरिबाला थोडी शांत झाली, असें पाहून ती स्त्री मायाळूपणें म्हणाली,

'बाई माझी ती! फार त्रास होतोय् तुला; कुठें जायचें आहे? कुठून आलीस तूं? कोणी बरोबर नाहीं का तुझ्या?' तिच्या भाषेंतला मायाळू-पणाचा ओलावा गिरिबालेच्या अंतरापर्यंत जाऊन पोंचला. तिच्या त्या खोल गेलेल्या डोळचांतून टच्कन् पाणी आलें. ती खोल घोगऱ्या आवाजांत म्हणाली,

'मला कीं नाहीं, खोलगांवला जायचें आहे.'

'देवीच्या दर्शनाला?'

'हो!'

'पण तिथपर्यंत कशी जाशील तूं? तुझ्याबरोबर तर कोणी दिसत नाहीं! एकटीच जाशील?'

'कोणी नाहीं माझ्याबरोबर!'

एवढचांत त्या स्त्रीचा पति परत आला. त्याला पाहून ती स्त्री म्हणाली,

'ऐकलेंत का? ही बिचारी खोलगांवला जायचें म्हणतेय्, देवीच्या दर्शनाला. कोणी नाहीं तिच्या बरोबर. कशी जाईल ही?'

'मग? आपल्याला काय करतां येईल?'

'एखादी गाडी पहावी भाडचानें मिळाली तर. पुष्कळ गाडचा जातात यात्रेकरितां. कुणाला द्यावे रुपया दोन रुपये आणि हिला पाठवावें गाडींतून. देवीचें दर्शन तरी घडेल बिचारीला.'

‘ पहातों मिळाली तर. ’

तो गृहस्थ गाडी पहायला बाहेर गेला. ती स्त्री गिरिबालेला म्हणाली,

‘ खातेस का पोरी थोडें ? ’

तिच्या त्या अपूर्व, दुर्लभ स्नेहानें गिरिबालेचें पोट भरून गेलें. ती डोळ्यांतलीं आसवें न पुसतां तिला म्हणाली,

‘ नको मला कांहीं; करीत आहांत तेंच फिटायचें नाहीं जन्मोजन्मीं. ’

गिरिबालेनें नाहीं म्हणतांच त्या स्त्रीचें आदरातिथ्यप्रेम दुप्पट जोरानें वर उसळलें. गिरिबालेच्या या उत्तरामुळें तर तिच्याविषयीं त्या स्त्रीच्या मनांत विलक्षण आपुलकी निर्माण झाली. ती उठत म्हणाली,

‘ नाहीं कसें ? उशीर होईल तुला खोलगांवीं पोंचेपर्यन्त. खाऊन घे थोडेंसें ! ’

तिनें आपल्या बरोबरचा डबा उघडून त्यांतली थोडी मिठाई बाहेर काढली आणि वॉटर बॅगमधील पाणी एका प्याल्यांत ओतून ती मिठाई गिरिबालेला आग्रहानें खाऊं घातली. ती मिठाई खाल्ल्यानें खोकल्याचा जोर वाढेल, याची दोघींनाही कल्पना नव्हती.

त्या स्त्रीचा पति येऊन म्हणाला,

‘ मिळाली गाडी. तीन रुपये घेईन म्हणाला. असूं दे. झालें का हिचें ? गाडी उभी आहे बाहेर. ’

कृतज्ञ दृष्टीनें त्या स्त्रीकडे पहात गिरिबाला तिच्या हाताच्या आधारानें उठली आणि अगदीं सावकाश चालत बाहेर येऊन तिच्या मदतीनें गाडींत चढून बसली. तिच्याजवळ एक पांच रुपयांची नोट देत ती स्त्री तिला म्हणाली,

‘ तीन रुपये याला द्यायचे. दोन तुझ्याजवळ असूं दे. ऐकलेंस काय रे, सांभाळून ने बरें का ! धावडवूं नकोस गाडी. सावकाश पोंचलास तरी चालेल. आणि तिथें जाऊन हिला देवीजवळ उतरवून दे. ’

गिरिबालेला परत एकदां खोकल्याची ढांस लागली. तिचा जीव घाबरा झाला. ती स्त्री व्याकुळ होऊन गिरिबालेच्या पाठीवर हात फिरवूं लागली. ढांस थांबल्यावर खोल आवाजांत गिरिबाला तिला म्हणाली,

‘ आई ! पोंचलें कालीमाईपर्यन्त, तर तुमच्याकरितां हात जोडून तुमचें

कल्याण कर, अशी प्रार्थना करीन तिची ! ' गाडी चालू झाली. त्या स्त्रीचा पति मान हलवीत म्हणाला,

' मला नाहीं लक्षण दिसत, एवढे गाडीचे धक्के खाऊन ही तिथपर्यन्त पोंचेलसें. कदाचित् मध्येंच गचकेल ! '

जड आवाजांत स्त्री म्हणाली,

' बिचारी कालीमातेच्या वाटेवर मरेल. चटका लावून सोडला तिनें मला ! '

गाडी खोलगांवच्या वाटेला लागली. रस्ता अजून कांहीं फारसा चांगला सुधारला नव्हता. पावसाळ्यानें त्याच्यावर केलेल्या अत्याचारांच्या खुणा त्याच्या अंगावर अजून ताज्या होत्या. त्यामुळे गाडीवाल्यानें जरी कितीही काळजीपूर्वक गाडी चालविली होती, तरी रस्त्यांतील चढउतारांपुढें त्याचा कांहींच इलाज नव्हता. गाडीचें एक चाक हातभर खालीं जाई, तर दुसरें दोन हात वर उठे एखादे ठिकाणीं असा गचका बसे, कीं त्यामुळें चांगल्या सुदृढ माणसाचा जीवही कासावीस व्हावा.

ते सगळे गचके आणि धक्के गिरिबाला जीव मुठींत धरून सहन करीत होती. त्यांतच मघांशी खाल्लेल्या मिठाईमुळे तिच्या खोकल्याचा जोर अधिक वाढला. दोनतीन वेळां तर तिला असें वाटलें, कीं आतां संपलें सगळें ! कालीमातेचें दर्शन कांहीं घडत नाही !

पण तिचें मरण एवढ्यांतच तिला नेणार नव्हतें. कारण अजून तिच्या वांट्याच्या कांहीं यातना शिल्लक राहिल्या होत्या. गाडी खोलगांवीं पोंचे-तोंवर सायंकाळ झाली. यात्रेची गर्दी दिसू लागली. सगळीकडे बत्त्या लागल्या होत्या. सगळी मिठाईचीं, खेळण्यांची, इत्यादि दुकानें त्या बत्त्यांच्या उजेडांत झगमगत होतीं. ग्रामोफनचे आवाज, पाळण्यांचा करकराट, सर्कसचा बँड, यात्रेकरूंचा गलगा, या सगळ्या एकसमयावच्छेदेंकरून उठणाऱ्या ध्वनीनें वातावरण भरून गेलें होतें.

यात्रेचा विस्तार सुरू होतांच गाडीवाल्यानें गाडी थांबविली आणि तो गिरिबालेला म्हणाला,

' उतरा बाई इथेंच. पुढें गाडी जाऊं देत नाहीत. कुठें ओळखीचें आहे का कोणी ? नसेल तर आजची रात्र या निंबाच्या झाडाखालीं काढा आणि उद्यां सकाळीं उठून देवीचें दर्शन घ्या. द्या पैसे माझे. '

गिरिबालेनें पांचची नोट त्याच्या हातावर ठेवली. पुलकित होऊन गाडी-वाला म्हणाला,

' दोन रुपये देतों आणून आत्तां. तुम्ही इथंच थांबा. अरे ! तुम्हांला उतरता येत नाही ? '

तो खालीं उतरून त्यानें गिरिबालेचा हात धरला. त्याच्या आसऱ्यानें ती मरणोन्मुख झालेली पोर खालीं उतरली. तिला त्यानें धरून शेजारीं असलेल्या निंबाच्या झाडाखालीं पोंचविलें आणि रुपये आणून देण्याचें आश्वासन देत तो गाडींत जाऊन बसला, तो परत आलाच नाहीं !

त्या निंबाच्या झाडाच्या पलीकडे कांहीं गाड्या उतरल्या होत्या. त्या गाडी-वाल्यांचे स्वयंपाक चालले होते. त्या झाडाखालीं मात्र कोणीही उतरलें नव्हतें. जणूं काय तें झाड यात्रेकरूंनीं गिरिबालेकरितांच मोकळें सोडलें होतें. गिरिबाला त्या झाडाखाली गेल्याबरोबर तिथें लेटली. खालीं गवत उगवलें होतें. जमीनही उंचसखल होती. पण गिरिबालेला बसणें शक्यच नव्हतें. कारण आज तिला ज्या यातना झाल्या, त्या सहन करणें तिच्या जिवापलीकडचें होतें. तिला असा भास होत होता, कीं आपलें मरण क्षणोक्षणीं जवळ येत आहे. मृत्यु आपल्या शेजारींच येऊन घोटाळतो आहे. ती वारंवार देवीची प्रार्थना करीत होती.

' माते, तुझें दर्शन होऊं दे आणि मग खुशाल येऊं दे मरण. मी वाटच पहातें आहे त्याची. पण सकाळपर्यंत थांब ! आई, सकाळपर्यंत थांब ! '

रात्र लोटत चालली, तसतसा गिरिबालेच्या खोकल्याचा जोर वाढूं लागला. तिचा जीव प्रतिक्षणीं घाबरा होऊं लागला. तिच्या डोक्यावर आकाशाचें पांघरूण होतें आणि खालीं पृथ्वीमातेचें आसन होतें. त्या रात्रीं थंडीही थोडी अधिक पडली. मध्यरात्र उलटल्यावर ओस पडायला प्रारंभ झाला. ती निष्पाप दुर्दैवी पोर ते सगळे सृष्टीचे आघात सहन करीत, त्यांच्याशीं झुंजत दुसऱ्या दिवसाचा सकाळ होण्याची वाट पहात होती.

मध्येंच तिला ग्लानी येई. त्या ग्लानींत तिला निरनिराळीं दृश्यें दिसत. कधीं मोठमोठ्या दाढा असलेला नुरुद्दीन तिला गिळायला येई. तर कधीं अघोरनाथ मोठ्यामोठ्यानें हंसत तिला एखाद्या कड्यावरून लोटून देई. कधीं शेट एका नावेंत तिला बसवून दूर समुद्रांत नेऊन तिला ढकलून देई. तीं

दृश्यें दिसायला लागलीं, म्हणजे गिरिबाला व्याकुळ होऊन कालीमातेला म्हणे,

'आई ! नको ग नको ! हे सगळे छळताहेत मला ! मीं काय केलें आहे यांचें ? कांहीं तर नाहीं केलें ! ने ना यांना दूर ! आज, शेवटच्या रात्रीं तरी ने ! आज तरी मला शांतपणें 'तुझ्या पायाशीं झोंपूं दे. जन्मभर नाहीं नाहीं त्या यातना सोसाव्या लागल्या; आतां हो शेवटची रात्र तरी सुखाची, स्वस्थपणें जाऊं दे !

पण कालीमाता हें तिचें गाऱ्हाणें ऐकूं पावली नाहीं. तशाच त्या अनंत यातना सोशीत गिरिबालेची ती रात्र व्यतीत झाली. पहांट झाली. सगळी यात्रा जणूं काय जागी होऊं लागली. सूर्योदय होतांच सगळ्यांचे आमोद-प्रमोद पूर्ववत् सुरू झाले. सूर्याचीं कोंवळीं किरणें गिरिबालेपर्यंत येऊन पोंचलीं. तिला वाटलें, हे मातेचे दूतच आपल्याला बोलविण्याकरितां आले आहेत.

तिनें उठून बसत उभे राहण्याचा प्रयत्न केला. पण तिला आढळून आलें कीं इन्द्रियांच्या शक्ती त्यांना सोडून जात आहेत. ती काकुळतीस येऊन मनाशीं म्हणाली,

'आतां आणखी थोडा वेळ. आईचें दर्शन होऊं दे. मग खुशाल येऊं दे मरण. पण फक्त आईचें दर्शन होऊं दे, आईचें दर्शन ! '

केवळ मनाच्या निश्चयाच्या बळावर ती तशीच खुरडत खुरडत देवीच्या देवळाकडे निघाली. थोडें अंतर पुढें सरकली, कीं तिचें शरीर पुढें जायचें नाकारी. पण किंचित् विसांवा घेऊन ती पुनः पुढें सरके. थोड्या वेळानें ती पोर यात्रेच्या गर्दीत शिरली.

चहूं बाजूंनीं यात्रेकरूंची तोबा गर्दी उडाली होती. म्हातारे, म्हाताऱ्या, पोरेंसोरें, तरुण स्त्रीपुरुष, असे सगळे यात्री आपापल्याच गडबडींत देवीच्या देवळाकडे धांवत होते. गिरिबाला त्यांच्यामधूनच जिवाच्या शर्थीवर एक एक पाऊल पुढें सरकत होती. खोकल्यानें जणूं शेवटपर्यंत तिची साथ करायचें ठरविलें होतें.

एक म्हातारा घाईघाईनें चालत गिरिबालेला अडखळून पडायच्याच बेतांत आला. अगदीं कसोशीनें स्वतःचें शरीर सांभाळून तो मुखानें अभद्र शिव्यांचा उच्चार करीत म्हणाला,

' कशाला धडपडली रांड कोण जाणे वाटेंत ! आतां सगळे दांत पडत होते माझे ! अगदीं सगळे. कुठें चालली भीक मागायला ? एँ ? चल हो एका बाजूला ! एका बाजूला हो ! केशो, ए केशो ! हिला बाजूला काढा ! कोणी चांगल्या भद्र घराण्यांतल्या स्त्रिया जातील देवीचें दर्शन घ्यायला. ही हाडकुळी अंगांत ताकत नसल्याचें ढोंग करील आणि वेळेवर कुणाचें तरी कांहींतरी घेऊन पळेल ! चला, हटवा हिला ! '

गिरिबाला त्या अचानक संकटानें गांगरून जाऊन दीनवाण्या नजरेनें त्या म्हाताऱ्याकडे पाहूं लागली. पण तेवढ्यांत त्या म्हाताऱ्याचा तो हाकारा ऐकून दोनचार स्वयंसेवक पुढें झाले आणि त्यांनीं धसमुसळेपणानें गिरिबालेला उचलीत रस्त्याच्या कडेला नेऊन ठेवलें !

गिरिबाला तिथें कोसळली. ती प्राणांतींचा मूक आक्रोश करूं लागली. एवढ्या लांबून ती कालीमातेच्या चरणांपाशीं मरायला आली होती ; पण तेंहा तिला अशक्य झालें ! तिचे प्राण आंत आक्रसूं लागले. तिचें मुख विवर्ण होऊं लागलें आणि तिच्या घशांत कफ येऊन घोटाळूं लागला !

एवढ्यांत तिच्या कानांत जणूं कोण्या देवदूतानें अमृताचा घटच आणून ओतला. तिला तिच्या लाडक्या बिपिनचा आवाज अगदीं तिच्याजवळ ऐकू आला. तिचे जाऊं पहाणारे प्राण जणूं परत आले. ती उठून बसली—

आणि तिनें पाहिलें, कीं तिच्या शेजारून बनबिहारी, बिपिन आणि हेमू चाललीं होतीं !

हेमू म्हणत होती,

' बिपिन, माहीत आहे का तुला, सर्कशींतले वाघ कांहीं खरे नसतात ! माणसेंच बनतात वाघ. '

बिपिन हेमूची ती सर्कशीविषयींची अश्रद्धा पाहून तिचा निषेध करीत म्हणाला,

' हुडूत् ! तुला कांहीं माहीत नाहीं. ते खरेच असतात. मला दीदीनें सांगितलें होतें, कीं ते खरे असतात म्हणून. दीदी खोटें कसें सांगेल ? '

अहा ! अहा ! गिरिबालेचा अत्यंत आवडता धाकटा भाऊ आणि बहीण तिच्याविषयींच बोलत चाललीं होतीं ! आणि तींही तिच्या अगदीं जवळून !

अरे बिपिन ! इकडे बघ रे ! ही तुझी लाडकी दीदी तुझ्या शेजारीं आहे ! अगदीं शेजारीं !

मृत्यूशीं प्राणपणानें झुंजत मानसिक इच्छेच्या जोरावर गिरिबाला उभी राहिली. चाललीं ! तीं तिघें पलीकडे चाललीं ! त्यांच्या आवडतीला टाकून ! आतांच प्रयत्न केला तर त्यांच्यापर्यन्त हांक पोंचूं शकेल. नाहींतर शेवटींही अगदीं जवळ येऊन भेट होत नाहीं. शरिरांत केवळ हांक मारण्याइतकेच प्राण घोटाळताहेत ! मार हांक !

घशांत लुडबुडणारा कफ मागें सारीत गिरिबालेनें हांक फोडली,

' बिपिन ! रे माझ्या बिपिन ! बिपिन रे ! इकडे ये ना ! ही बघ तुझी दीदी ! बिपिन रेऽऽऽ ! '

त्या दुर्बळ हांकेचे पडसाद पुरेसे गिरिबालेच्या भोंवतींही घुमूं शकले नाहींत. मग त्या यात्रेच्या कोलाहलांत ते बिपिनपर्यंत कसे पोहोंचणार ?

तीं तिघें पुढेंच चाललीं.

परत एकदां गिरिबालेनें सगळे प्राण एकत्र करून हांक मारली,

' बिपिन रेऽऽ ! बिपिन रेऽऽऽ ! '

समोरून येणाऱ्या गर्दीच्या आड तीं तिघ दिसेनाशीं झालीं.

ओह ! शेवटींही भेट होऊं पावली नाहीं. तो अस्थींचा पिंजरा, तो निष्पाप देह, तें देवाघरचें फूल, ती महादुर्दैवी गिरिबाला कापलेल्या केळीप्रमाणें धाडकन् खालीं कोसळली. तिची प्राणज्योत शेवटीं या दुर्दैवाच्या तडाख्यानें मावळली !

संपलें एक दुर्दैवी जीवन ! समाजांतील रूढीनीं, आचारांनीं आपला निष्पाप बळी घेतला !

गिरिबाला कोसळली, हें पाहून ओरडा झाला.

' अरे ! पडली ! पडली ! मेली कीं काय ? '

भराभर माणसें गोळा झालीं. सगळे दुरूनच चिकित्सा करूं लागले,

' अरेरे ! मेली बिचारी ! '

' पार वाळली होती ! '

' नुसतीं हाडेंच उरलीं होतीं ! '

' इथें यात्रेंत मरायची होती. '

गिरिबाला मुख आकाशाकडे करून पडली होती. तिचे हात पसरलेले होते. खोल गेलेले डोळे पथरावले होते. मुखावर शेवटच्या मर्मांतिक वेदनाचीं पदचिन्हें अगदीं स्पष्ट दिसत होतीं.

तिच्या भोंवतींचा जमाव वाढत चालला. कुणी तरी बाई मेली असा गलगा जेव्हां शेजारील दुकानांत आपल्या बाहुलाकरितां मगी खरेदी करणाऱ्या हेमूच्या कानीं पडला, तेव्हां ती बिपिनला म्हणाली,

'बिपिन, ऐकलेंस का ? कोणीतरी बाई मेली.'

'चलतेस ? आपण पाहून येऊं.'

'नको बाई ! मला भीति वाटते !'

'एँ हॅं रे ! भ्यायचें काय त्यात ? नुसतें पाहून यायचें. चला ना बाबूजी !'

बनविहारींच्याही मनांत इतर चार सामान्य माणसांसारखें कुतूहल निर्माण झालें होतें.

'पोरांनो ! भ्याल बरें का रात्रीं !'

असें म्हणत तेही त्या पोरांबरोबर त्या प्रेताकडे निघाले.

गिरिबालेच्या भोंवतीं माणसें येत, क्षणभर चुक्चुक् करीत आणि नंतर आपापल्या कामाकडे निघत. हीं तिघेंही तिच्या जवळ जाऊन तिच्याकडे पाहूं लागलीं.

'अयाई ! कशी मेली रे !' हेमूनें सहानुभूति प्रदर्शित करीत बिपिनला म्हटलें. पण बिपिन टक लावून प्रेताकडे पहात होता. हळूहळू त्याची दृष्टि तिच्या उजव्या गालावर जाऊन स्थिरावली. तिथें एक तीळ होता ! अस्वस्थ होऊन त्यानें त्या प्रेताच्या जवळ जाऊन त्याचा डावा हात पाहिला. त्या दंडावर एक भला मोठा हिरवा डाग होता! त्याचा सुपरिचित हिरवा डाग!

'बाबूजी ! माझी दीदी !'

असें ओरडत बिपिन अत्यंत व्यथित होऊन त्या त्याच्या मृत दीदीच्या प्रेतावर जाऊन कोसळला. हेमूलाही तिच्या दीदीची ओळख पटली. तीही त्याच्या पाठोपाठ त्या दीदीला जाऊन चिकटली. दोघेंही अति हृदयस्पर्शी क्रंदन करूं लागलीं !

'दीदी गऽऽ ! ए दीदी गऽऽ ! मला घे ना तुझ्या कुशींत ! घे ना ग ! ए दीदी गऽऽऽ !'

त्यांची दीदी आतां त्यांचा आक्रोश ऐकूं येणार नाहीं, अशा ठिकाणीं जाऊन पोंचली होती. तिच्यावर त्यांच्या रडण्याचा कांहीं परिणाम होत नव्हता.

तीं दोन पाडसें तिच्या कुशींत शिरूं लागलीं, तिचे ते वाळलेले हात आपल्या शरीराभोंवतीं वेष्टून घेऊं लागलीं, आपले पाय जमिनीवर आपटूं लागलीं.

बनबिहारींनाही त्यांच्या लाडक्या गिरिबालेची ओळख पटली. तिचा चेहरा जरी बदलला होता, तरी ती त्यांची मुलगी होती. ते तिच्या मुखाजवळ जाऊन बसले आणि डोळयांतलीं आसवें पुशीत पुटपुटले,

'पोरी ! अशी भेटायची होतीस ना शेवटीं !'

तोंच एकानें विचारलें,

'कोण हो ती ?'

बनबिहारींच्या पोटांत भीतीचा गोळा उभा राहिला. त्यांना पोलीस, पंचनामा, चौकशी, लोकांचें टोचणें, हें सगळें स्पष्ट दिसलें. ते ताडकन् उठले. या सगळ्या भीतीपेक्षां आपला समाज आपल्याला काय म्हणेल या भीतीनें विवर्ण होत त्यांनीं दोन्ही पोरांच्या बकोटया धरल्या आणि बाबूजी काय करताहेत, हें त्यांना कळण्याच्या पूर्वींच ते त्यांना ओढीत धांवत सुटले. पोरांचा आक्रोश मंद मंद होत शेवटीं ऐकूं येईनासा झाला. गर्दीत बनबिहारी दिसेनासे झाले.

थोडया वेळानें पोलीस आले. पंचनामा झाला. त्या प्रेताच्या वारसाची चौकशी झाली. कुणीतरी सांगितलें कीं मघाशीं कोणी एक म्हातारा आणि दोन पोरें हिच्याजवळ रडत होतीं. पण एवढा मोठ्या यात्रेंत आतां त्यांचा शोध करणें अप्रशस्त समजून पोलिसांनीं प्रेत मुडदेफरासांच्या स्वाधीन केलें.

त्यांनीं तें प्रेत दूर एका ओढाच्या कांठीं नेऊन उगीच शपथेकरितां पुरल्यासारखें केलें आणि ते यात्रेचा आनंद उपभोगण्याकरितां निघून गेले

सायंकाळीं कोल्हीं तिथें गोळा झालीं. त्यांनीं माणसाची चाहूल घेत कोण नाहीं, असें पाहून तें प्रेत उकरून बाहेर काढलें आणि नंतर मजेंत दोन्ही पाय त्याच्या शुष्क छातीवर टाकून बसत तीं कोल्हीं त्या प्रेताच्या मांसाचा आस्वाद घेऊं लागलीं. त्याचे लचके तोडीत त्यांनीं त्या रात्रींत तें प्रेत संपविलें.

